


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

# *अनुक्रमणिका*





## संपादकीय

इ. स. २००० सालाच्या अखेरीला 'तपशील'चा १४ वा अंक आपल्या हाती येईल अशी उमेद बाळगून मी आहे.

या अंकात, बाल वा प्रौढ वाचकांनाही ज्या 'अरबी' भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टींनी नेहमीच आकर्षून घेतले होते त्याची कुळकथा वाचावयास मिळेल. त्याचबरोबर एखादा साहित्यिक आपल्या मातृभाषेत काही निर्मिती करतो, पण त्याला विशेष दाद मिळत नाही. काही कारणाने त्याची कलाकृती दुसऱ्या एका भाषेत अनुवादित होते व तिला प्रचंड प्रतिसाद मिळतो व हा लेखक मग आपल्या भाषेतही मान्यवर लेखक होतो. हे कशाचे द्योतक आहे? असेलच तर ते साहित्य, समीक्षा अगदी व्युत्पन्न अशा वाचकाला, किती चकविते याचे ते लक्षण आहे. 'निमित्त' मधील द झू स्टोरी हे सर्व मुद्दे अधोरेखित करते. मार्सेल प्रूस्त या लेखकाबद्दलचा पुढचा भाग या अंकात आहे. आल्बेर कामू आणि अल्जेरियन युद्ध या संबंधीचा **पहिला भाग** या अंकात आहे. या लेखाचे प्रयोजन काय? हा मुद्दा स्वाभाविकपणे उपस्थित होईल. आल्बेर कामू हे ज्या आव्हानाला सामोरे गेले व आपल्या मतांशी प्रामाणिक राहीले (असा प्रसंग जगातील सर्व लेखकांसमोर व राजकीय कार्यकर्त्यांसमोर कधीना कधी येतोच) फ्रेंच जनतेत त्यांना जी कमालीची लोकप्रियता होती ती पार रसातळाला गेली तरी त्याची चिंता त्यांनी केली नाही. नुकतीच रशियात 'पेन' या संघटनेची (लेखकांची जागतिक संघटना) परिषद झाली. या परिषदेत रशियात अंतर्भूत असलेल्या 'चेचन्यां' या ठिकाणी जे यादवी युद्ध चालू आहे, त्यात परिषदेने कोणाबद्दल सहानुभूती व्यक्त करावी हा प्रश्न आला, रशियन लेखक कामूसारखेच शृंगापत्तीत होते. 'चेचन्या'मध्ये असंख्य रशियन स्थायिक झालेले आहेत, शिवाय 'चेचन्या स्वतंत्र झाला' तर रशियासमोर दुसरे अनेक प्रश्न निर्माण होणार याची जाणीवही त्यांना आहे. या उलट कम्युनिस्ट रशियन साम्राज्यशाहीचा अनुभव असलेल्या, पोलंडमधील लेखकांचा अनुभव अगदी वेगळाच असल्याकारणाने ते चेचन्याला स्वातंत्र्य मिळावे या मताचे आहेत. कामू यांची भूमिका या संदर्भात उन्मेखून लक्षात घेण्याजोगी आहे. हा प्रश्न फक्त पाश्चिमात्य जगात निर्माण होतो असे नाही. संयुक्त महाराष्ट्र निर्माण होण्याअगोदर जे जहाल लेखन व भाषणे झाली त्यातील एक काँग्रेसचे (मुळातील शेतकरी कामगार पक्षातील पुढारी) खासदार शंकरराव मोरे यांची भाषणे व संयुक्त महाराष्ट्राचा मूळ ठराव मांडणारे मराठी लेखक ग. त्र्यं. माडखोलकर यांचे लेखन. ग. त्र्यं. माडखोलकर यांनी एस. एम. जोशी व त्यांचे साथी हे किती बोटचेपी भूमिका घेत आहेत यावर जोर दिला होता. साथी एस. एम. जोशी यांनी या संदर्भात भाई शंकरराव मोरे याना उद्देशून बोलताना, आल्बेर कामू यांची आठवण होईल असे विधान केले होते. "परकीयांशी (ब्रिटिशांशी) लढणे सोपे असते पण स्वकीयांशी दोन हात करणे कठीणच असते." संयुक्त महाराष्ट्राची चळवळ चालू झाल्यानंतर खासदार शंकरराव मोरे व श्री. माडखोलकर हे दोघेही पं. जवाहरलाल नेहरू यांच्या तंबूत अगदी तब्बेतीत आराम करीत होते ! कामूंचे विचार या संदर्भात महत्त्वाचे आहेत. क्लिओपात्रा या वाचकप्रिय लेखमालेतील एक लेख आणि 'तपशील'च्या वाचकांना परिचित असलेल्या कॅथरीन कुकसन या लेखिकेवरचा लेख वाचकांना पसंत पडेल याबद्दल खात्री आहे. इ. स. २००१ च्या 'तपशील'च्या वतीने शुभेच्छा!

**- नाना जोशी**

---

अनुक्रमणिका

# निमित्त

## १) अरेबिअन नाइट्स
## २) द झू स्टोरी

**–अ. ना. महाशब्दे**

**१. अरेबिअन नाइट्स**

कॅप्टन सर रिचर्ड फ्रान्सिस बर्टन (१८२१-१८९०) या प्रख्यात शोधक प्रवाश्यानं बरीच पुस्तके लिहिली. अभ्यासपूर्ण, परंतु त्याचं नाव आजही जोडलं जातं ते त्याने लिहिलेल्या 'अरेबिअन नाइट्स'शी. 'अरेबिअन नाइट्स'चा लेखक म्हणून तो जगभर मान्यता पावला आहे. 'अल्लादिन','अलीबाबा आणि चाळीस चोर' यांसारख्या कथा आजही बाळ-गोपाळांप्रमाणेच सिनेमावाल्यांनाही भुरळ घालत आहेत. प्रस्तुत पुस्तकाचं मूळ अरेबिक शीर्षक : 'अल्फ लैला वा लैला.' बर्टननं त्याचं भाषांतर केलं 'एक हजार रात्री आणि एक रात्र यांचा ग्रंथ.' ग्रंथात बऱ्याच कथा आहेत, कथेत आडकथा आहेत. या कथा एका तरुण मुलीनं शहरयार या भयंकर संशयी राजाला कथन केल्या आहेत. आपल्या आधीच्या हजार स्त्रियांचा त्यानं शिरच्छेद केला होता तशी पाळी आपल्यावर येऊ नये या आशेनं ती रोज रात्री त्याला कथा ऐकवत होती. या कथा आणि हिंदुस्थानात आपल्या होती लागलेल्या तोता-मैनाच्या कथा यांच्यात विलक्षण साम्य असल्याचं बर्टनला जाणवलं होतं. या कथाही कुठलंतरी अरिष्ट लांबणीवर टाकण्यासाठीच दररोज रात्री सांगितल्या गेल्या आहेत. 'अरेबिअन नाइट्स'मध्ये मौखिक आणि हस्तलिखित स्वरूपातील कथांचा प्रचंड साठा आहे. त्यात वैविध्य आहे. या कथांचे बर्टनच्या आधीही अनुवाद प्रसिद्ध झाले. पण बर्टनच्या हाती या कथांचं सोनं झालं. बर्टनच्या भाषांतराहून इतर भाषांतरे सरस असूनही विस्मृतीत गेली पण बर्टनचं भाषांतर आजही तगून आहे. त्यानं दिलेल्या विस्तृत अभ्यासपूर्ण टीपा, भाष्यं, तत्कालिन सामाजिक आणि धार्मिक परिस्थिती व रीतीरिवाज, त्या परिस्थितीमध्ये रचल्या गेलेल्या या कहाण्या, यासंबंधीचे त्याचे विवेचक निबंध, यामुळं त्याच्या ग्रंथाचं मोल आणि महत्त्व आजही टिकून आहे.

या कहाण्याचं भाषांतर करण्याचा विचार त्याच्या मनात बरीच वर्षं घोळत होता. तो सांगतो,"हिंदुस्थानात आणि मध्य पूर्वेत तो होता तेव्हापासून प्रत्येक कहाणी त्याला तोंडपाठ होती– त्या मध्यपूर्वेत कुठंही कानावर पडत होत्या : चौकात, बाजारात, कॉफी– गृहात." या कथा सांगणारे व्यावसायिक कथनकार होते व त्यांना **'रावी'** असं संबोधलं जात होतं. शिवाय त्या विविध हस्तलिखितांमध्ये संग्रहित करण्यात आल्या होत्या, कुठं संपूर्ण तर कुठे तुकड्यातुकड्यांनी मदिना आणि मक्का यांच्या यात्रा केल्यानंतर, १८५४च्या उन्हाळ्यात तो



अनुक्रमणिका

स्टेनहॉसरबरोबर एडनमध्ये राहात होता.' अरेबिया आणि अरब यांच्याविषयी बोलत असताना, आम्ही पटकन एकाच निष्कर्षाप्रत आलो की, मुस्लिम लोककथांच्या हा लोक-विलक्षण खजिना प्रत्येक इंग्रज बाळगोपाळांना परिचित असला तरी सर्वसामान्य वाचकाला त्यातील मौलिकतेची जाण नाही आणि अरेबिक अभ्यासकांव्यतिरिक्त त्याचे दरवाजे अन्य जनांना खुले नाहीत.' बर्टन आणि स्टेन हॉसर यांनी एकमेकांचा निरोप घेण्याआधी भाषांतरावर एकत्रित काम करण्याची आणि 'संपूर्ण, रंगसफेदी व काटछाट न केलेली, अशी श्रेष्ठ कृतीची मूळाबरहुकूम एक प्रत करण्याची, त्यांच्यात एकवाक्यता झाली होती. गद्य भागाचं काम स्टेन हॉसरनं करायचं आणि सुमारे दहा हजार ओळींच्या काव्याचं काम बर्टननं पाहायचं अशी त्यांच्या कामाची विभागणी झाली होती. परंतु स्टेन हॉसरचं आकस्मिक निधन झालं आणि एकत्रितपणे पार पाडण्याचा त्यांचा संकल्प बारगळला. तरीही बर्टनच्या मनात तो विचार रेंगाळत राहिला, सामग्रीची (बऱ्याचदा मौखिक) तो जमवाजमव करू लागला, हस्तलिखिताचा शोध घेत राहिला. आणि एखादा अरबी भाषिक श्रोतृवर्ग आढळला तर त्याला तो कहाण्या सांगू लागला. तो उत्कृष्ट **'रावी'** असावा. आपल्या विषयावर ज्याचं आत्यंतिक प्रेम आहे असा कथनकार. श्रोत्यांना पाहून उल्हसित होणारा. पारंपारिक कहाण्या त्याला त्यातील बारकाव्यांसकट, तपशीलांसकट ठाऊक होत्या. एवढंच नव्हे तर तो त्यात रंगतदार भर घालत असे, पात्रांचं व्यक्तित्त्व खुलवत असे, नाविन्य आणित असे आणि कहाण्यातील नैसर्गिक संगीत आणि काव्य, उच्च दर्जाचं नाट्य, गावरान दंतकथा यांनी तो श्रोत्यांना मंत्रमुग्ध करत असे. त्रियेस्ते वकिलातीमध्ये स्वास्थ्य लाभल्यामुळे 'अरेबिअन नाइट्स' कडे वळायला त्याला उसंत मिळाली. हे 'काम कष्टाचं दिसत असलं, तरी माझ्यालेखी कष्ट प्रेमाचे आहेत, सांत्वन आणि समाधान यांचा अथक मूलस्रोत.'. . . पश्चिम आफ्रिकेच्या उकाड्याच्या आणि खतरनाक वाळवंटात माझी हकालपट्टी करण्यात आली होती, आणि दक्षिण अमेरिकेतील सुस्त आणि कंटाळवाणं जिणं वाट्याला आलं होतं, या काळात त्यानं मोहिनी घातली होती, वैताग आणि कंटाळा यावरील एक अक्सर तोडगा. (अरेबिक हस्तलिखिताची) पानं उघडल्यानंतर साक्षात्कार घडावा हे अटळच होतं. माझ्या भोवतालच्या सुस्त वैशिष्ट्यहीन आणि "प्रशस्त" परिसरामधून जिनं मला तत्काळ माझ्या आवडीच्या प्रदेशात नेलं होतं. अरेबिया, हा प्रदेश माझ्या एवढ्या परिचयाचा होता की पहिल्याच दृष्टिक्षेपात, स्मृती जागी होत होती बऱ्याच वर्षांमागच्या आत्म्यानं कायाप्रवेश केलेल्या जीवनाची. पुन्हा एकदा मी पारदर्शक आभाळाखाली उभा होतो, ईथरगत बेहोषी असलेल्या हवेत, ज्याचा श्वास घेतल्यानं पुरुषाचा उत्साह फेसाळणाऱ्या मद्यासारखा उफाळून येतो. . . नंतर दृष्टिपथात यायचे लोकरी तंबू, खुजे आणि काळे, अस्सल बेदोविनचे, सिंहासारख्या पिवळसर रंगाच्या मृत्तिकेच्या आणि मृगाच्या रंगासारख्या तपकिरी कंकराच्या अमर्याद पडितावरील केवळ ठिपके, आणि छावणीची शेकोट्या काजव्यागत टिंबे. . .'

'स्टेन हॉसरच्या निधनानंतर त्याचं एडनला राहिलेलं मौल्यवान हस्तलिखित चहू दिशा गेलं होतं, आणि त्याचं फारच अल्प काम माझ्या हाती लागलं होतं.' तरीही बऱ्याच अन्य व्यापातापात अनियमितपणे का होईना बर्टनच्या भाषांतराच्या कामाला सुरुवात झाली. १८७९ च्या वसंतामध्ये, नक्कल करण्याचं किचकट काम सुरू झालं आणि पुस्तक आकाराला येत गेलं. नंतर एका अनपेक्षित बातमीनं त्याच्या कामाला खीळ पडली. . . '१८८१- ८२च्या हिवाळ्यात, **मिस्टर जॉन पेनच्या** नवीन खर्ड्याची नोटीस एका साहित्यिक जर्नलमध्ये माझ्या दृष्टीला पडली. इंग्रजी काव्यामधील त्याचे कर्तृत्व जाणकारांना ठाऊक होते. मी 'अथेनियम (१३ नोव्हेंबर १८८१) आणि मिस्टर पेन यांना लिहिलं. आम्ही दोघं एकाच कामात गुंतलो आहोत याची त्याला अजिबात कल्पना नव्हती, मला आता नको असलेल्या क्षेत्राचा मी त्याला मोकळेपणानं अग्रक्रम आणि ताबा देऊ केला.'

पेननं बर्टनची ऑफर स्वीकारली. त्यानंतर बरीच चालढकल होत राहिली. दरम्यान सोन्याच्या शोधात बर्टन 'पश्चिम आफ्रिकन सुवर्ण किनाऱ्याला' गेला आणि जेव्हा स्वत:च्या भाषांतराच्या कामाला तो पुन्हा लागला, तेव्हा त्याला धास्ती वाटू लागली की 'गांवढळ आणि अर्धशिक्षित यांना अप्रिय असलेले साहित्यिक परिश्रम पदोन्नतीच्या शिडीवर चढण्यासाठी कुण्या माणसाला सहाय्यभूत ठरण्याची शक्यता नाही. कारण 'स्वत:चाच विचार करण्याची धमक असणाऱ्या 'एखाद्या माणसासाठी 'कनिष्ठ मध्यम वर्गाची हुकूमशाही' अवघड अडथळे निर्माण करत होती.'

पेननं एक 'प्रॉस्पेक्टस' प्रसिद्ध केलं. त्यात त्यानं जाहीर केलं की काही विवक्षित 'रुची-हीन' भाग वगळून, ज्ञात असलेल्या समग्र कथांचे नऊ खंड प्रकाशित केले जाणार आहेत. बर्टनची योजना, दिवास्वप्नं, अव्यवस्थितपणे चाललेले भाषांतर, सारं काही कोलमडून पडलं.

पेनची अपेक्षा, जेमतेम पाचशे वर्गणीदारांची मागणी असेल, परंतु हजार ऑर्डरी आलेल्या पाहून त्याला आश्चर्याची धक्का बसला. परंतु आपण दिलेल्या शब्दाशी तो प्रामाणिक राहिला, आपला निर्णय त्याने बदलला नाही. त्यानं संचाच्या फक्त पाचशे प्रती छापण्यास आणि वितरणास मान्यता दिली. या संचांचं पुनर्मुद्रण होणार नसल्याचं आश्वासनही त्यानं दिलं आणि समग्र 'अरेबिअन नाइट्स'च्या लोकप्रिय भाषांतराची सांगता झाली. बर्टननं पेनला लिहिलं की पुढील आवृत्ती दिल्यास आपल्याला आनंद होईल, आपण ती स्वत: प्रकाशित करू आणि नफा मूळ लेखकाला दिला जाईल. परंतु स्वत:च्या शब्दाशी इमान राखणाऱ्या पेननं या प्रस्तावाला स्पष्ट नकार कळवला. पाचशे प्रती प्रसिद्ध झाल्या, त्यांचं वितरण झालं आणि बर्टन 'अरेबिअन नाइट्स'च्या स्वत:च्या भाषांतराच्या कामाला मोकळा झाला. हे काम पूर्ण करण्याच्या निश्चयानं त्यानं बैठक घातली. त्याला आशा होती की पेनच्या भाषांतराशी तो बरोबरी करीलच, नव्हे त्याहूनही त्याची कामगिरी सरस असेल. फायदेशीर ठराव्यात अशा बऱ्याच बाबी त्याच्यापाशी होत्या. गद्य संहितेमध्ये पेनहून आपण सरस ठरू शकणार

नाही याची जाणीव त्याला होती. पण दहा हजार ओळींच्या काव्यामध्ये तो पेनहून सरस ठरेल याची खात्री त्याला होती. शिवाय पौर्वात्य जगामधील अतुलनीय अनुभवांच्या आधारे लिहिलेल्या त्याच्या अभ्यासपूर्ण आणि तपशीलवार नोंदी पेनच्या अपुऱ्या आणि अननुभवी टीपांहून अधिक मौलिक ठरतील याबाबत तो निःशंक होता.

बर्टनचा पेनशी जो पत्रव्यवहार झाला तो सोन्याच्या खाणीच्या शोधमोहिमेवर तो असताना. लिस्बनहून त्यानं लिहिलं होतं की एप्रिलमध्ये 'अरेबिअन नाइट्स' संबंधी बोलणी करण्यासाठी तो इंग्लंडला परतेल आणि पर्शिअन आणि अरेबिक बोलीभाषेतील शब्दांच्या भाषांतरासाठी मदत करू शकेल अशा एका तज्ज्ञाचं नाव त्यानं सुचवलं होतं. तथापि एव्हाना पेनचा पहिला खंड छपाईच्या वाटेवर होता आणि पुढील खंडांची हस्तलिखितं बर्टनला दाखवण्याची त्यानं तयारी दर्शवली होती. १८८२ च्या मार्चच्या मध्यावर त्यानं पेनला कळवलं होतं की तो अन्य कामात गुंतला असल्यामुळे भाषांतराच्या कामी मदत करण्याइतपत उसंत आता त्याला नव्हती. पुढं पुस्ती जोडली होती,'मी तुम्हाला इशारा दिलाच पाहिजे की मी गडगडत जाणारा एक दगड आहे.' आणि हे अक्षरशः खरं होतं. चीनला जाणार असल्याचं त्यानं पेनला कळवलं होतं. परंतु ती सफर घडली नाही. सहा महिन्यांची सोन्याची मोहीमही अयशस्वी ठरली. बर्टन आणि त्याचे सहकारी १८८२ च्या मध्यावर माघारी आले. बर्टननं आपल्या अपेशी मोहिमेचा आढावा घेताना लिहिलं,'एका सुवर्ण देशाचा ज्यानं पुनर्शोध घेतला आणि दुसऱ्या एकाचे पुनर्वसन केले असा माणूस म्हणून इतिहासात माझी नोंद व्हायला पाहिजे.' बर्टनने पेनला लिहिलं तेव्हा त्याच्या वाया गेलेल्या प्रयत्नाचे मोजमाप करण्याइतपत त्याच्यापाशी वेळ होता. परंतु सर्व काही गमावलेलं नव्हतं. नेहमीप्रमाणे, या मोहिमेमधून एका पुस्तकाची निर्मिती झाली. कॅमरॉनच्या सहकार्याने त्यानं द्विखंडात्मक 'टु द गोल्ड कोस्ट फॉर गोल्ड' लिहिलं. हे पुस्तक बर्टनच्या चांगल्या पुस्तकांमध्ये गणले गेले नसले तरी स्वीकृत कार्यात ज्यांच्याविषयी त्याला तिटकारा होता अशा लोकांमध्ये केलेला सुवर्णाचा शोधातही, अष्टांगी बुडालेल्या एका माणसाचा तो वृत्तांत आहे.

बर्टनला वारंवार औदसिन्याचे झटके येत असत. जगावर राग काढण्याची त्याची प्रवृत्ती होती. परिणामी भावनिकदृष्ट्या मोडून पडण्याची व मानसिक संतुलन बिघण्याची शक्यता होती. परंतु प्रवाशांची सामाईक मालमत्ता नसलेल्या आठवणी आणि पूर्वस्मृती यांना उजाळा दिला गेल्यामुळे तो बहुधा स्वतःला सावरू शकत होता. 'अरेबिअन नाइट्स'वर काम करत असताना आठवणींच्या दृकप्रतिमानीच नव्हे तर नादांच्या स्मरणांनेही त्याचं मत व्यापलं होतं. मेंढपाळांच्या पोरांचे 'बेभान अपारंपारिक गाणे','यौद्ध्यांच्या तालबद्ध घोष', 'म्युएनिझनची प्रार्थनेसाठीची हाक', कोल्हेकुई,'खाली झेपावणाऱ्या पाण्याच्या सौम्य स्वरांसवे रात्रीच्या झुळकांच्या कुजबुजींना' प्रतिसाद देणारे तालवृक्षांचे संगीत. नंतर त्याला आठवत शेकोटी–



अनुक्रमणिका

भोवती बसलेले शेख आणि म्हातारे पुरुष 'तेव्हा त्यांच्या आवडत्या कहाण्यांची काही पानं मी वाचून वा गाऊन दाखवत होतो, त्यांच्या आदरातिथ्याची अशी बक्षिसी देत होतो आणि ते तसेच केले जाईल याची हमी मिळवत होतो.' जणू काही पुन्हा वाळवंटाच्या तप्त वाळूत किंवा प्राचीन शहरांच्या धूळ भरल्या रस्त्यात तो होता, अशा तऱ्हेनं, गूढ वाटावी अशा निर्मिती प्रक्रियेमध्ये पार गढून गेला होता.

बर्टनच्या इतर मोजक्या लिखाणांप्रमाणेच– 'कशिदा' हे एक मासलेवाईक उदाहरण– त्यानं कामाला सुरुवात केली आणि त्यानं काय काय उचललं आणि कोणाकडून– त्याच्या–वरील प्रभाव आणि त्याचे मूलस्रोत– या प्रश्नांबाबत लोकांमध्ये नेहमी–वाद चालत असेल. त्याच्यावर हल्ला करण्यासाठी त्याचे काही शत्रू आणि टीकाकार 'अरेबिअन नाइट्स'चा आधार घेत. त्याची सचोटी आणि विद्वत्ता याबद्दल संशय व्यक्त करत, त्याची निर्मितिक्षमता कमी लेखत, दावा करत की त्याने दुसऱ्यांकडून, विशेष करून पेनकडून, उघड उघड डल्ला मारलेला नसला तरी उसनवारी केलेली आहे. तथापि, 'नाइट्स'मध्ये त्याला फार पूर्वी–पासून स्वारस्य होतं, बऱ्याचशा कथा त्याला माहीत होत्या आणि त्यानं त्या मक्केच्या यात्रेवर असतानाच नव्हेतर सोमालिआ आणि अन्यत्र सांगितलेल्या होत्या, हे नि:संशय.

'नाइट्स'चे पुरेसे संच न देण्याची पेननं केलेली चूक न करण्याची खबरदारी बर्टननं घेतली. त्यानं निर्णय घेतला की संकल्पित दहा खंडाच्या संचाची हजाराची आवृत्ती काढावी आणि प्रत्येक संचाची किंमत दहा गिनी ठेवावी. 'सप्लिमेंटल नाइट्स'च्या सहा खंडांमधून त्याला १६,००० गिनी प्राप्ती करायची होती, त्यापैकी ६,००० छपाई, बाइंडिंग आणि इतर खर्चासाठी. बर्टनची पत्नी इसबेल हिनं ३६,००० लोकांना 'प्रास्पेक्टस' पाठवला आणि तिला अभूतपूर्व प्रतिसाद मिळाला. **या संकल्पामधील तिनं बजावलेली भूमिका नेहमीच कमी लेखली गेली आहे.** दोघांही बर्टनांनी एक विचित्र कल्पित जोपासलं होतं, ते असं की, तिने मजकूर वाचलेला नव्हता, मजकुरामधील अनुचितता आणि रासवटपणा इंग्रज बाईनं वाचता कामा नये, तरीही प्रत्येक खंडाची सूची करण्यास तिनं मदत केली आणि पुढं एक 'कौटुंबिक' आवृत्ती संपादित करून प्रकाशित केली. संहिता प्रत्यक्ष न वाचता संक्षेप करणं, गाळसाळ करणं आणि संपादन करणं तिला कसं शक्य झालं याचं विश्वासार्ह स्पष्टीकरण ती देऊ शकली नव्हती.

'नाइट्स' साठी हजार नव्हे तर दोन हजार वर्गणीदार मिळालेले पाहून दोघांही बर्टनांना आश्चर्याचा धक्का बसला. संभाव्य नफा आणि हाती न आलेली वर्गणी याबाबतचा पेचप्रसंग, पेनपुढे निर्माण झाला होता, तसाच यावेळीही उद्भवला. बर्टनला वाटले, हजारभर प्रतींच काढाव्यात : 'नाइट्स'च्या लोकप्रियतेचा आडाखा चुकल्यास, खबरदारी म्हणून तो लागलीच सहा खंडामधील 'सप्लिमेंटल नाइट्स'च्या कामाला लागला. पुढे ते सात खंडात पुनर्मुद्रित करण्यात आले. त्यांच्या मृत्यूनंतर लेखनाच्या कॉपीराइटबाबत निश्चित कायदे नसल्यामुळे,



अनुक्रमणिका

चाच्यांनी किती आवृत्त्या काढल्या त्याला गणतीच नाही.

प्रचंड कामगिरी पार पाडल्यानंतर बर्टन धास्तावला. बदफैलीपणा सर्रास असला तरी, व्हिक्टोरिअन नीतिमूल्ये कधी नव्हे एवढी कडक होती. त्यानं स्वत:च्या बचावाची तयारी केली. बायबल, Urquhart - Motteux चं राब्लेचं भाषांतर काखोटीला मारून, त्यासोबत पब्लिक स्कूलमध्ये शिकणाऱ्या इंग्रज विद्यार्थ्यांना माहिती असायला हवी अशी अपेक्षा असते असे लॅटिन आणि ग्रीक अभिजात साहित्यकृती घेऊन तो कोर्टात उभा राहील. तथापि, 'नाइट्स'च्या पहिल्या खंडाला लोकांचा दणदणीत प्रतिसाद मिळाला, पोलिसांचा, सेन्सॉर-शिपचा बडगा बसला नाही, याचं त्याला आश्चर्य वाटलं. तक्रारी, मुख्यत्वे केल्या गेल्या त्या साहित्यिक गुणवत्तेबद्दल. 'एडिंगबर्ग रिव्ह्यू'च्या १८८६च्या जुलैच्या अंकात परीक्षण- कारानं म्हटलं की, पेनची गद्य शैली सुदृढ आणि मर्दानी आहे. कॅप्टन बर्टनचं इंग्लिश म्हणजे पुरातत्त्वविद्या आणि अशिष्ट प्रयोग यांचा अवाचनीय संयोग आहे, अमेरिकनवादानं परिपूर्ण आणि अप्रचलित वा परदेशी शब्द आणि वाक्प्रचार यांचा वापर करण्याचा वारेमाप हव्यास त्याला आहे.

पेन आणि बर्टन यांची भाषांतरे युरोपमध्ये दाखल झालेली पहिलीच भाषांतरे नव्हती. एडवर्ड विल्यम लेन याने अरेबिकवरून केलेलं भाषांतर यापूर्वीच बाजारात आलं होतं. या माणसाविषयी बर्टनला मनस्वी तिटकारा होता. त्यानं म्हटलं आहे की 'लेन यश मिळवू शकला नाही... अरेबिकचं त्याचं ज्ञान जुजबी होतं... आणि त्याची पानं बऱ्याच पोरकट चुकांनी डागळलेली आहेत. सर्वात वाईट गोष्ट म्हणजे, तीन देखणे खंड अवाचनीय करण्यात आले आहेत... त्यांच्या आंग्लाळलेल्या लॅटिननं, त्यांच्या दीड फुटी इंग्रजी शब्दांने अर्ध शतकापूर्वीच्या, जेव्हा आमचं गद्य, बहुधा, युरोपमध्ये गचाळ मानलं जात होतं, तेव्हा लवचिक नसलेल्या, कृत्रिम असलेल्या शैलीनं.' 'नाईट्स'च्या आपल्या संपूर्ण भाषांतरभर, तळटीपा, टिपण्या आणि भाष्यं यांमधून जेव्हा जेव्हा शक्य झालं तेव्हा तेव्हा बर्टननं लेनवर हल्ला चढवलेला आहे, आणि जेव्हा लेनला लक्ष्य करणं जमत नसे तेव्हा त्यानं लेनचा नातू स्टॅन्ले लेन- पूल याच्यावर हल्ला चढवलेला आहे. परंतु पेनबद्दल तो म्हणतो, 'त्याचं भाषांतर अत्यंत वाचनीय आहे.... अत्यंत अवघड उताऱ्यांमध्ये त्यानं कौतुकास्पद यश मिळवलेलं आहे, आणि परके शब्द, खास संज्ञा यांसाठी अगदी नेमके व्हर्न्याक्युलर समतुल्य निवडण्यातले त्याचे कसबही वाखाण्याजोगे आहे.' पुढे त्यानं असंही म्हटलं की **'भाषांतराच्या कामी अडचण उद्भवली, तर भावी भाषांतरकाराला त्याचीच वाट पुसावी लागेल; त्याचेच शब्द, संज्ञा त्याला उचलाव्या लागतील.'** त्याच्या या विधानांनी, बर्टननं इतरांकडून, त्यातही विशेषत्वानं पेनकडून उचलेगिरी केलेली आहे या त्याच्यावर सातत्याने करण्यात येणाऱ्या आरोपाला खतपाणी घातलं आहे. पेनचा चरित्रकार राईट यानं बर्टनवर आरोप केला आहे, 'त्याचं भाषांतर म्हणजे बव्हंशी पेनचा अर्थानुवाद आहे',



अनुक्रमणिका

आणि पुढे पुस्ती जोडली आहे. 'एकही शब्दाचा बदल न करता त्यानं पेनकडून शेकडो नव्हे हजारो वाक्यं आणि वाक्यांश घेतले आहेत.' पुढं असंही नमूद केलं आहे', पेन अल्पाक्षरी आहे, बर्टन पाल्हाळिक.' त्याच्या पापांमध्ये भर घालण्यासाठी– नजरेला खुपणाऱ्या दोषांपैकी हा एक– त्याने 'बेढब, वेडेविद्रे, अ-पचनीय शिवाय कुचकामी अशा आर्ष शब्दांचा वापर करून त्याचे भाषांतर बिघडवलेलं आहे. **प्राचीन अरेबिक शब्दांना इंग्रजी समतुल्य शब्द शोधण्यासाठी बर्टननं परिश्रम घेतलेले आहेत ही वस्तुस्थिती नाकारता येत नाही.'** 'लांडगा आणि कोल्हा यांची कथा' यात आपल्याला पुढील वाक्यांश आढळतात 'O rare ! ab but swevens (dreams) prove true', sore pains to gar me dree', A garthh right sheen', follow not foowardness' इ. जेणेकरून वाचकाने अस्वस्थ व्हावं, संभ्रमात पडावं. परंतु आज, प्रदीर्घ काळानंतरही जग वाचतं, आठवतं आणि उद्‌धृत करतं ते बर्टनचं 'नाइट्स', पेनचं नव्हे.

'नाइट्स'चा गावरान, ग्राम्य आणि बिनधास्त सूर, नाट्यमय बचावाची बर्टननं तयारी केलेली असूनही, त्याला पछाडत राहिला. पब्लिकसाठी संहितेमधील वाईट भाग गाळून मेहरबानी त्याला करायची नव्हती, आणि ज्यांनी ती केली त्याबाबत त्याला तीव्र नापसंती होती. बऱ्याच किरकोळ घटना असलेली आणि त्रेपन्न रात्रीत पुरून उरलेली 'सर्पाची राणी' नामक कथा 'लेननं संपूर्ण गाळलेली होती कारण (लेनच्या मते) त्यात अत्यंत असंभाव्य घटनांची रेलचेल आहे.' वाचकांनी स्वत:ची मतं बनवण्याची मुभा त्यानं वाचकांना द्यायला हवी होती.'

'नाइट्स'ची संरचना, तोतामैनेच्या कहाण्या, पंचतंत्र, वेताळ पंचविशी आणि पिलपेच्या तात्पर्यकथा यांसारख्या पौर्वात्य कृतींशी मिळतीजुळती आहे. यात एका दीर्घ कथेमध्ये बऱ्याच आडकथा असतात आणि त्यांच्या श्रोत्याची वा वाचकांची उत्सुकता शेवटपर्यंत टिकवलेली असते. ही एक साधी तरीही नाट्यमय क्लृप्ती आहे आणि 'नाइट्स'मध्ये तिचा भरपूर वापर करण्यात आला आहे. इथं राजा शहरयार आणि त्याचा भाऊ राजा शाह झमन यांच्या पत्नींनी त्यांच्याशी दगाबाजी केलेली असते. एकदा झमन अनपेक्षितपणे आपल्या शयनगृहात येतो तेव्हा त्याला 'आढळतं, राणी, त्याची पत्नी स्वयंपाकघराच्या तेलानं आणि कचऱ्यानं माखलेल्या, शिसारी यावी अशा एका खानसाम्याला दोन्ही हातांनी कवटाळून, त्याच्या स्वत:च्या गालिचाच्छादित बिछायतीवर झोपली आहे.' झमन आपला जंबिया उपसून एकाच फटक्यात त्या दोघांचे चार तुकडे करतो.

राजा शहरयारची बेअदबी तर याहून वाईट. त्याची रात्रीच नव्हे तर त्याच्या दहा लाडक्या रखेल्याही प्रत्येक दिवशी त्याच्या पाठीमागे यारांबरोबर अंगसंग करत असतात. शहरयार या साऱ्यांना कंठस्नान घालतो आणि दर रात्रीला एका नवीन राणीची निवड करून स्त्रियांच्या दगाबाजीची समस्या सोडवतो. असं तीन वर्षं चालतं. शेवटी त्याची प्रजा याविरुद्ध आवाज उठवते आणि एका रात्रीसाठी राणी बनून आत्माहुती देण्यासाठी तयार असणाऱ्या

तरुण पोरी वझिराला मिळेनाश्या होतात. वझिर आपली मुलगी शहरझद राजाला वाहातो. ती एक युक्ती योजते. प्रत्येक रात्रीला राजाचं मनोरंजन करण्यासाठी ती कथा सांगते. कथेचा शेवट ती असा करायची की पुढं काय होणार याची उत्सुकता राजाला लागून राहते आणि तिचा शिरच्छेद करण्याचा हुकूम एका रात्रीनं लांबवला जाऊ लागतो. तिची ही खेळी यशस्वी होते. आजचे मरण अशा रीतीनं उद्या करता करता तीन वर्षं उलटून जातात. दरम्यान राजापासून तिला तीन मुलं होतात. एक हजार एक रात्री त्याचं मनोरंजन केल्यानंतर राजा तिचा राणी म्हणून स्वीकार करतो, जिच्याविषयी संशयाला जागा नाही अशी राणी.

पौर्वात्य प्रदेशातील आपला अफाट आणि आयुष्यभराचा अनुभव उपयोगात आणण्याची हरएक संधी काहण्यांनी त्याला दिली एवढंच नव्हे त्याचे आवडते बौद्धिक छंद तृप्त करण्याची, त्याचबरोबर त्याच्या पूर्वग्रहांचा अमर्याद साठा उघडा करण्याची संधीही त्याला प्राप्त करून दिली. – लैंगिकता, वंश, धर्म वा कातडीचा रंग, त्याला कुठलाही विषय वर्ज्य नव्हता. पहिल्या गोष्टीची सुरुवात होते न होते तोच भाषाविज्ञानाच्या प्रांतात तो शिरला आणि 'अरेबिअन नाइट्स'च्या विविध अरेबिक आवृत्त्यांचे शुद्धीकरण करणाऱ्या संपादकांवर, त्यांच्या गचाळ कामावर त्याने झोड उठवली, लेन आदिंचा धिक्कार केला. पेनच्या वाट्याला थोडं फार कौतुक आलं. त्याच्या तपशीलवार तळटीपांनी इंग्रजांची करमणूक केली आणि त्यांना हादरेही दिले. यात त्यानं 'वझिर' या शब्दाचं अचूक लेखन आणि त्याचा अचूक उच्चार यावर चर्चा केली आहे. जीन म्हणून ओळखल्या जाणाऱ्या अद्भुत भुताविषयीची त्याच्या पोतडीतली माहिती त्याने दिली आहे. त्यानंतर तो वळला आहे चावट विषयांकडे. त्यानं लिहिलं,'व्यभिचारी स्त्रिया निग्रो पसंत करतात कारण त्यांच्या जननेंद्रियाचा आकार. सोमाली लँडमधील एका पुरुषांचं माप मी घेतलं होतं, ते उद्दिपित नसताना जवळजवळ सहा इंच मापाचं होतं. हे भारदस्त भाग उद्दिपित झाल्यानंतर त्या प्रमाणात वाढत नाहीत. . . माझ्या काळात कुठलाही सच्चा हिंदी मुस्लिम त्यांच्या स्त्रियांना घेऊन झांजिबारला जात नसे कारण तिथं त्यांना आकर्षित करू शकणारी मोठमोठी प्रलोभनं असत.'

बर्टननं आपल्या पूर्वग्रहांना मोकाट सोडलेलं आहे. आपल्या हाताशी असलेल्या असंख्य अरेबिक हस्तलिखितांमधून त्यानं प्रसंग निवडले आणि त्यांचा सुयोग्य वापर केला आणि त्यामध्ये त्याने नैतिक आणि वांशिक पूर्वग्रह घुसडले. तरीही इथं बर्टन सर्वोत्कृष्ट रूपात दिसला, खटकेबाज, व्यासंगी, मर्मभेदक, गावरान. एखाद्या निष्णात जादुगारागत वाळवंटा–तील विलक्षण लय आणि व्यामिश्र प्रतिकं त्यानं लीलया हाताळली. परंतु इतिहास आणि भाषा याबाबतच्या धूसर बाबी विशद करताना काही वेळेला तो पांडित्यप्रचूर बनला. रावी आपली सामग्री आणि आपला श्रोतृवर्ग याविषयी नि:शंक असलेल्या बाजारातील कथेकऱ्याच्या – सहजसाध्या आरोहाअवरोहामधून गद्य उलगडत जातं, आणि ज्या युगाला उत्तम पद्याची जाण होती, त्याविषयी आदर होता त्या काळातील काव्य अत्युत्तम आहे.

प्रारंभीच्या एपिसोडसारख्या साऱ्याच कथा चावट नाहीत, अचकट-विचकटही नाहीत. त्यातील काही मोह पडावा अशा माधुर्यानं रसरसलेल्या आहेत; काही धार्मिक दृष्टांतकथा आहेत आणि काही कंगाल श्रोत्यांना आशा देणाऱ्या अद्भुतरम्य कथा आहेत– अनपेक्षित धन असलेल्या विलक्षण गुंफा किंवा अज्ञात जगाप्रत घेऊन जाणारे गुप्त दरवाजे, प्रासाद आणि प्रचंड गढ्या, सोन्याच्या वा चांदीच्या वा दुर्मिळ हिऱ्यांच्या एखाद्या पर्वताकडे घेऊन जाणारी भुयारं यांच्या हकिगती आहेत. इथं आहेत क्रूर आणि दयाळू सम्राट, हरामखोर धार्मिक माणसं, धूर्त व्यापारी, साहसी दर्यावर्दी, परदेसीयांना भुलवणाऱ्या विवाहयोग्य तरुण स्त्रिया, खलिफा, न्यायाधीश आणि राजे, अजाण तरुणांकडून कोडकौतुक करून घेण्यासाठी प्रतीक्षा करणाऱ्या कुमारिका, भयानक कुरूप आणि अतृप्त वासना असलेल्या स्त्रैण म्हाताऱ्या, वेगळी जनावरं, कपट कारस्थानं; इथं आहेत मुस्लिम, ज्यू, ख्रिश्चन आणि झोरोरिष्ट्रियन आणि रत्नं, सुवर्ण मुद्रिका, जादूचे ताईत, चकवे. बर्टनला आठवतं, वाळवंटात तो त्यांच्या श्रोत्यांना कथा सांगत असे तेव्हा ते 'श्वास रोधून एकाग्र' असत; वाटायचं ते दृष्टी आणि तोंड यांच्या बरोबरीनं कानांनीही शब्द प्राशन करत आहेत.'

भाषांतर म्हणून थोर असलं तरी बरेचसे वाचक प्रथम, प्रसिद्ध म्हणा वा कुप्रसिद्ध 'टर्मिनल एसे'कडे वळतात. हा निबंध म्हणजे एकोणिसाव्या शतकामधील सर्वात महत्त्वपूर्ण योगदानापैकी एक म्हणून समजला जातो. तो काही महिन्याच्या अवधीत लिहिलेला असला तरी, त्यात आयुष्यभराचा अभ्यास आणि अनुभव समाविष्ट आहे. यात इतिहास, रीतीरिवाज, नैतिक मूल्य, परंपरागत रूढ नीतिमत्ता, अरेबिक आणि पर्शियन जनता आणि त्यांचे राजे यांचे धर्म याबाबतच केवळ बर्टन सांगत नाहीत तर उर्वरित जग, मध्य पूर्वेचे अन्य लोक, इजिप्तशिअन्स ग्रीक आणि रोमन आणि मेसोपोटिअन्स यांची अभिजात युगं याच्या संदर्भात तो सारं आम जनतेला मागं ठेवतो. या 'निबंधा'मध्ये फक्त समलिंग प्रवृत्तीच प्रामुख्यानं हाताळण्यात आली आहे म्हणून गहजब केली जातो, परंतु हा विषय संपूर्ण खंडामधील केवळ एक भाग आहे, चार विभागात विभागलेली सुमारे दोनशे पृष्ठे. यामध्ये त्याचा गाढा व्यासंग आणि जटिल विषयाचं विश्लेषण करण्याची त्याची अतुलनीय क्षमता, हातोटी दृष्टोत्पत्तीस येते.

'नाइट्स'चं मूळ, त्यांच्या कहाण्यांचा काळ. याचबरोबर त्यांचे संकलक आणि लेखक यांच्याविषयी 'नाइट्स'च्या प्रत्येक स्कॉलरची आणि अभ्यासकाची स्वत:ची अशी मतं असतातच. 'टर्मिनल एसे'मध्ये 'अरेबिअन नाइट्स' हे एक किंवा दोन लेखकांनी लिहिलं आहे या लेनच्या मताचा बर्टननं उपहास केला आहे. वस्त्रं आणि पोषाखांची तऱ्हा, शस्त्रं किंवा ती नसणं (उदाहरणार्थ, बंदुक आणि तोफा), विवक्षित अन्नपदार्थांचा वापर (उदाहरणार्थ, दारू, साइडर-सफरचंदाची दारू, बार्ली बियर आणि कॉफी आणि तंबाखू यांची अनोळख) काही पात्रांना झालेल्या रोगांचे प्रकार आशियामध्ये आढळणाऱ्या कॉलऱ्याचे

विविक्षत प्रकार उल्लेखिलेले आहेत, आणि देवी हा रोग ज्ञात होता पण सिफीलीस नव्हता) आणि विविध ऐतिहासिक व्यक्तींचे संदर्भ- या संहितांर्गत बाबींचं विश्लेषण करून 'आज ज्या स्वरूपात ही कृती समोर आहे. ती इ. स. १४०० च्या आधी लिहिली गेली असला पाहिजे' असं विधान करणं बर्टनला शक्य झालं आहे. चौकट 'निखळ पर्शियन' आहे, काही कथा आठव्या दशकातील, काही दहाव्या शतकातील असू शकतात, पण कृतीचा बराचसा भाग तेराव्या शतकात एकत्रित करण्यात आला आहे, त्यात काही कथांची अठराव्या शतकापर्यंत भर पडत गेली आहे. 'लेखक अज्ञात आहे हे बरंच झालं : कुणी एक नव्हताच मुळी', कारण 'नाइट्स' अज्ञात संकलक आणि संपादक यांची ती निर्मिती आहे.

तथापि, 'टर्मिनल एसे'चे गुण काहीही असोत, त्यातला नेहमीच वाचला जाणारा आणि उद्धृत केला जाणारा विभाग आहे तो समलिंग-संभोगीवृत्तीवरील. यात समलिंग संभोगावर बर्टननं चर्चा केलेली आहे. स्पष्टीकरणाऱ्या मिषानं तो सांगतो की हा विभाग म्हणजे 'eclaircissement des obscenites' आहे. या वृत्तीचा उल्लेख तो 'excrabilis familial pathicorum', 'Le Vice', 'तिरस्करणीय', 'मनोविकृतिजन्य प्रेम', 'sotadic debauchery' इत्यादी शब्दात करतो. तो इथं तपशीलवार आहे पण सहानुभूतीदर्शक नाही. तो नमूद करतो की 'महमद जरी समलिंग-संभोगाकडे तात्त्विक उदासीनतेनं पाहात असला तरी तो कुराणानं निषिद्ध मानलेला आहे' (आणि बरेच संदर्भ देतो).

सर्वसामान्य लोकांसमोर अशी ही चर्चा बहुधा प्रथमच येत होती आणि व्हिक्टोरिया-कालीन इंग्लंडची मनोवृत्ती लक्षात घेता हे धाडसी साहस होतं (जसं कथांचं मूळाबरहुकूम भाषांतर केलं होतं). बर्टननं याविषयाकडे लक्षही कदाचित दिलं नसतं- त्या काळात त्याच्याविषयी जे काही प्रवाद होते त्यावर शिक्कामोर्तब करण्यास या चर्चेने हातभारच लावला होता) परंतु 'नाइट्स' तद्वतच हिंदुस्थानामधील विवाह आणि लैंगिकता यावरील भाषातरांमधील टीपांमधून सजातीय संभोगाच्या आचारांवर त्यानं खुल्लंखुल्ला लिहिलं होतं, आणि याच खुल्या वृत्तानं त्यानं सुंता, टोकं छाटण्याची क्रिया, हिजडे यांसारख्या अन्य लैंगिक बाबींवरही सडेतोडपणं लिहिलं होतं. एखाद्याचं असं इम्प्रेशन होतं की समलिंग-संभोगावरील विभागामध्ये बर्टन केवळ त्याच्या प्रकांड पांडित्याचं प्रदर्शन करत आहे- एखादी अभिजात वा समकालीन संहिता किंवा मानववंशीय घटित यामध्ये याचा उल्लेख आढळतो- तर अन्य लिखाणात समाविष्ट करणं त्याला शक्य नव्हतं अशा बऱ्याच चावट आख्यायिका, ज्या काही वाचकांना रिझवतील आणि इतरांना धक्के देतील, त्या अंतर्भूत करण्यासाठीही त्यानं या विभागाचा वापर केला आहे.

अशीच एक आख्यायिका बर्टननं सांगितली आहे. सिंधमध्ये पर्शियनांबरोबर असताना बहुधा त्यानं ही ऐकली असावी. शेख नस्त्र हा बसराचा गव्हर्नर होता. थट्टामस्करीच्या मिषानं बदमाषी करणारा अशी त्याची ख्याती होती. त्यानं 'त्याच्या पाहुणे मंडळींना विचारलं, "त्यांनी कधी मानवी तोफ पाहिली आहे का?", आणि त्यांनी नकारात्मक उत्तर दिल्यानंतर,

परमेश्वराचा उद्धार करणारा आणि सर्व शक्तीनिशी धडपडणारा एक पांढऱ्या दाढीचा गुलाम खेचून आणला. नंतर त्याला हात गुडघे जमिनीवर टेकवायला लावले आणि हातापायांना गच्च पकडून ठेवलं; त्याच्या कमरेखालची वस्त्रं उतरवण्यात आली आणि त्याच्या गुदद्वारात डझनभर मिरीची बुरखुडं घुसवण्यात आली; लक्ष्य म्हणून माफक अंतरावर कागदाचा एक तुकडा ठेवण्यात आला; तांबडी तिखट मिरपूड माखलेली कांडी त्याच्या नाकपुडीत सारण्यात आली; शिंकेने तोफेचे गोळे सुरू झाले आणि लक्ष्यावर बसलेल्या गोळ्यांच्या नंबरा पैजा ठरवल्या गेल्या.'

तथापि, अल-इस्लाम, समलिंगसंभोगाविषयीची चर्चा, मध्यपूर्वेचा वाङ्मयीन इतिहास, अरबी वृत्तबद्ध, काव्यरचनेची तपासणी (हा विभाग डॉ. स्टेनगासनं लिहिला होता) याहूनही बरंच काही 'टर्मिनल एसे'मध्ये आलेलं आहे. बर्टननं गूढ अनुभवाशी असलेली त्याची अत्यंत खाजगी बांधिलकी सूचित करण्यासाठी निबंधाचा वापर केला आहे. काहीशा आडवळणानं, 'कसिदा'मध्ये सूचित केले होते. तसे – स्वतःच्या सूफी श्रद्धांच्या विवरणासाठी त्यानं 'सर्पांची राणी' ही कथा घेतली आहे. हीच कथा सर्वसामान्य वाचकासाठी अयोग्य ठरवून लेननं गाळली होती. प्रस्तुत कथा दीर्घ आहे, जटील आहे. यात एकूण त्रेपन्न रात्री अंतर्भूत आहेत. शिवाय त्यात आडकथाही भरपूर आहेत. यात आत्म्याच्या शोधाचा अंतस्रोत आहे. बर्टनच्या स्वतःच्या गूढ यात्रेशी थेट संबंध असलेले विषय 'सर्पांची राणी'मध्ये येतात– हिंदुस्थानचे नाग राजे आणि राण्या, ज्यांच्याकडून त्यानं फार वर्षांपूर्वी दीक्षा घेतली होती त्या नागर ब्राह्मणांची पूर्वकुळी; रोमन कॅथोलिसिझमबरोबरच्या त्याच्या झगड्याचं प्रतीक असा सृष्टोत्पत्तीचा 'पुराण सर्प'; यहुदी आणि 'पिकॉक एन्जल कल्ट' यावर प्रभाव टाकणारा झोरोष्ट्रियन आणि मॅगियन द्वैतवाद काही कथांमध्ये एल खिद्रनामक एक लोकप्रिय मुस्लिम संत आहे– एक मार्गदर्शक वा गुरू– मंगल कुठं सुरू होतं आणि अमंगल कुठं संपतं हे त्याचे डोळे पाहू शकतात. बर्टन सांगतो एल खिद्र या नावाचा अर्थ 'हरितरंगी.' संताच्या चिरंतन तारुण्याचा निदर्शक असलेला हा रंग. कुराणात एल खिद्र = प्रेषित एलिजाह असं समीकरण आहे. १८व्या सुरामध्ये एल खिद्र मोझेसला दैवी न्यायाच्या अतर्क्याची दीक्षा देतो; दुबळे आणि दुर्दैवी यांना मदत करतो, अन्यायाचं निवारण करतो, आणि यात्रिकाला त्याच्या गूढ शोधामध्ये मार्गदर्शन करतो. या कथेनं बर्टनला गूढवादांच्या गाढ विश्लेषणाला प्रवृत्त केलं आहे, आणि त्याचे जे मुख्य स्वारस्य आहे त्याचा उलगडा करण्याची संधी मिळवून दिली आहे. त्याचं मुख्य स्वारस्य होतं पर्शियन सूफी महाकाव्य Mantiq ut-tayrr.'द कॉलोक्वी ऑफ द फ्लायर्स' (बाकीचे त्याचा उल्लेख करतात 'द कॉन्फरन्स (किंवा' पार्लमेंट) ऑफ द वर्ड्स) या नावाने त्याचे त्याने भाषांतर केले होते. थोडक्यात, हीच दोन गूढ पृष्ठे 'टर्मिनल एसे' पासून ठळकपणे अलग नजरेत भरतात आणि बर्टनच्या व्यक्तिगत धार्मिक श्रद्धांचा दुर्मिळ आविष्कार प्रकट करतात, दीर्घ काळ आचारलेल्या 'तकिआ' काही क्षणांसाठी बाजूला सारतात. बर्टन इथं पर्शियन इस्लामी गूढवादाचे अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण गूढ–

गहन स्वरूप मांडतो. अशा बाबतीत त्याची नित्याची फसवेगिरी थोड्या बहुत प्रमाणात लपवण्याची तो खबरदारी घेतो. त्याचे शब्द त्रोटक, प्रच्छन्नार्थी आणि अपरिचित आहेत, आणि त्याच्या वाचकांना गूढवादी प्रशिक्षणाचा परिचय नसेल तर ते गोंधळात टाकतात, अजिबात सहाय्यभूत ठरत नाहीत. तरीही त्याचं एक उद्दिष्ट होतं, एक संदेश त्याला द्यावयाचा होता आणि या उताऱ्याचं त्याच्या अन्य कृतीशी कुठल्याही प्रकारचं साधर्म्य नाही, त्यामुळं आपण गृहित धरायला हवं की ते समाविष्ट करण्यामागं त्याच्यापाशी एक कारण होतं.

पर्शियन गूढवादी कवी फरिदुद्दिन अत्तार हा Mantiq ut-tay या काव्याचा जनक. अत्तार या आडनावाचा अर्थ 'केमिस्ट'. औषधं बनवून ती विकणं हा त्याचा व्यवसाय होता. शिवाय लोकप्रिय आणि गूढ अशा दोन्ही ज्ञानांचा तो खजिना होता. ११६० मध्ये वृद्धापकाळाने त्याचे निधन होण्यापूर्वी (त्याच्या ११०व्या वर्षी मंगोलियनांनी त्याचा खून केला असं मानलं जातं), त्यानं ११५ पुस्तकं लिहिली होती, त्यातील काहींची लांबी महाकाव्याएवढी होती. त्यापैकी बरीचशी दैवी मीलनाच्या शोधाशी संबंधित होती. बऱ्याचदा तार्किक विश्लेषणाला त्यात फाटा दिलेला आढळतो. त्याच्या लेखनात पुन:पुन्हा येणारा विषय : आत्म्याचा निरंतर प्रवास. आपल्या मूळस्थानी आणि उद्दिष्टाप्रत जाणारा. Mantiqu सांगते :

'प्रत्येकाचा प्रवास त्याच्या परिपूर्णतेप्रत असतो –

– प्रत्येकाची उद्दिष्टाशी असलेली जवळीक त्याच्या "अवस्थे"नुसार असते'.

आयुष्य एक दीर्घ, अंतहीन यात्रा आहे, हा विषय सूफी लिखाणात नेहमी आढळून येतो आणि हेच सूत्र पाश्चात्यांनी उचललेलं आहे – 'होली ग्रेल' साठीचा शोध, 'द रोमान्स ऑफ द रोझ', कँन्टेरबरीकडे जाणारी चॉसरची यात्रा यावर Mantiq ut-tayr चा प्रभाव आहे असं पाश्चात्त्य विद्वानांचं म्हणणं आहे.

अध्यापनाच्या सच्च्या सूफी पद्धतीनं– मितव्ययी आणि मार्मिक– बर्टन 'क्ल्यू' देतो, ज्या आधारे इच्छुकांनी अर्थसंगती लावावी. विषय जटिल आणि ध्यानी येण्यास अवघड आहेत. मोजक्याच वाक्यात बर्टन कुराण 'अरेबिअन नाइट्स' आणि Mantique एकत्र गुंफतो. कुराणात सॉलोमन हा एक सम्राट आहे. त्याला पक्ष्यांची गुप्त भाषा अवगत असते आणि परमेश्वराच्या रहस्याबावत तो त्यांच्याशी बोलू शकतो – 'पक्षी' हे मानवी आत्म्याचे सर्व–सामान्य सूफी रूपक आहे, आणि सॉलोमन हा मनुष्य देहधारी आत्मा असल्याचं मानलं जातं. 'नाइट्स'मधील 'सर्पाची राणी' या कथेमध्ये अद्‌भुत रासायनिक आणि जादुभरी प्रतिकं आहेत. त्यापैकी एक सॉलोमनची अंगठी. अंतिम उद्दिष्टाचं एक चिन्ह. परंतु केंद्रस्थानी आहे 'काफ' या पवित्र पर्वतामधील सॉलोमनची कबर. 'काफ'चा उल्लेख बर्टन करतो : वर्तुळाकार पर्वत... पर्शियन अल्चोईचं पुढील (स्वरूप)' झोरोष्ट्रियन मुक्तदाता राजकुमार पेश-ओ-तान जगाच्या अंताची, 'दुजे आगमन' म्हणून परतण्यासाठी जिथे प्रतीक्षा करत असतो तो पर्वत

म्हणजे अल्बोर्झ. बर्टन त्याच्या वाचकांना आठवण करून देतो की भाविक समजतात तशी सॉलोमनची शवपेटी जेरुसलेममध्ये नव्हे सात गूढ समुद्रापार नेण्यात आली होती, दिव्यत्वाशी अंतिम मीलन होण्यासाठीच्या शोधामधील अंतिम स्थान म्हणून तिथं ती विसावलेली आहे. कुराणामध्ये हूपो (Hoopoe) नामक एक गूढ पक्षी शेबाच्या प्रदेशाला आपण भेट देऊन आल्याचे सांगण्यासाठी सॉलोमनकडे येतो. त्या प्रदेशात एक स्त्री राज्य करत असते. सच्च्या धर्माद्वारे, म्हणजे इस्लामद्वारे जे धन केवळ अल्ला प्रदान करू शकता त्याची प्रतीक्षा करणाऱ्या आत्म्याचं राणी हे एक रूपक आहे. Mantiq मध्ये (अन्य इस्लामी गूढविद्येप्रमाणं) हूपो हा पूर्ण ज्ञानी सूफीचं प्रतिक आहे आणि तो काफ पर्वतावर वास्तव्य करणाऱ्या पक्षी श्रेष्ठ सिमुर्गचा शोध घेण्यासाठी तीस पक्ष्यांना– म्हणजेच आत्म्यांना– मार्गदर्शन करणार असतो. दिसतं तेवढं काहीही सोपं नाही– बर्टन विशद करतो की 'सिमुर्ग' म्हणजे तीस पक्षी – सी = तीस आणि मुर्ग = पक्षी – आणि प्रयोजन लवकरच उघड होतं, जेव्हा त्याच्या आयुष्याच्या खालावत जाणाऱ्या वर्षांमध्ये पवित्र प्रवासाचा अर्थ त्याला उलगडतो हे अखेरीस त्याच्या विवरणामधून दृष्टोत्पत्तीस पडतं. पक्ष्यांप्रमाणंच तो एक यात्रिक होता, एक 'प्रवासी'–'कसिदा' मध्ये त्यानं तशी स्वत:ची ओळख करून दिली आहे– एक भटक्या, ज्याच्या लेखी गूढ उद्दिष्टाव्यतिरिक्त अन्य कशालाही महत्त्व नसतं.

Mantiq सांगतो,'तळपत्या सूर्यानं जग उजळलेलं असलं तरी आपले नेत्र आंधळे आहेत. त्याच्याकडे ओझरती नजर टाकण्यात तुम्ही यशस्वी झालात तर, तुमची सुज्ञता तुम्ही गमावता; तुम्ही त्याला पूर्णपणे पाहिलंत तर, तुम्ही तुम्हालाच गमावता.' बर्टन परमेश्वरा–विषयी नेहमीच साशंक होता, परंतु गुप्त शोध कधीच दूर नव्हता. 'अत्तार'च्या श्रेष्ठ कृतीवरील त्याचा अंतिम अभिप्राय पुढीलप्रमाणे होता :

'एवम Mantak al-Tayr मध्ये. . . पक्षी, आत्म्यांची प्रतिकं, त्यांचा परमेश्वर, भव्य पिसाऱ्याच्या द्वीपाद सिमुर्गचं सान्निध्य मिळवण्यासाठी, शोध, प्रेम, ज्ञान, क्षमता, ऐक्य, बेहोषी आणि परहितनिष्ठा (म्हणजे अहंचा उच्छेद). हे सप्त सागर, चिंतनशील आयुष्याचे असंख्य टप्पे पार करतात. अखेरीस, सिमुर्गच्या गूढ बेटावर उभं राहून आणि "त्याच्याकडे एक चोरटा दृष्टिक्षेप टाकून ते पहातात त्याच्यामध्ये तीस पक्षी; आणि जेव्हा ते त्यांची नजर स्वत:कडे वळवतात तेव्हा तीस पक्षी एका सिमुर्गगत भासतात; ते स्वत:मध्ये पाहतात संपूर्ण सिमुर्ग; त्यांनी सिमुर्गमध्ये पाहिलं सर्व तीस पक्षी." म्हणून "आम्ही आणि तू" म्हणजेच परमेश्वर आणि मानव यांची एकरूपता, या समस्येच्या तोडग्यापाशी ते पोहोचले; ते सिमुर्गमध्ये कायमचे लोप पावले, आणि छाया सूर्यामध्ये अंतर्धान पावली.'

आदरणीय पूर्वजांची थडगी जिथं गाडली गेली होती ते अनोखे प्रदेश, मक्का, त्याचा पूर्वसूरी एकनेत्री साहसी Camoes जिथं राहिला होता आणि खितपत पडला होता ती धुर-कांडलेली अशियार आणि आफ्रिकन बंदरं यांच्या यात्रा बर्टन सतत का करत होता

यामागील कारण आता आपल्या ध्यानी येतं. तीर्थक स्पष्टीकरणाच्या रूपानं बर्टन त्याच्या वाचकांना सांगत होता : जेव्हा लेडी इसबेल 'व्हर्जिन', भाविक संत, भला स्वामी येशू यांचा सन्मान करत होती तेव्हा अपार्टमेंट आणि निवासस्थानं यातील अगणित खोल्यामधील त्याच्या इस्लामी पवित्र स्थळांच्या दरवाजांआड काय चाललं होतं 'आम्ही आणि तू' या प्रश्नाच्या तोडग्याप्रत तो अखेरीस पोहोचला होता. ते 'सिमुर्गमध्ये कायमचे लोप पावले होते आणि छाया सूर्यामध्ये अंतर्धान पावली होती.'

तो निरंतर भटक्या होता, भटक्याचा पुत्र (त्याचे वडील एक भटके नव्हते का?), 'मंगलाची सुरुवात कुठे होते आणि अमंगलाची अखेर कुठे होते हे ज्याचे नेत्र पाहू शकतील' असा एल-खिद्र, 'हरितरंगी', एन्जिाचं प्रतीक त्याचा मार्गदर्शक होता.

## २.द झू स्टोरी

१९५८चा प्रारंभ. **एडवर्ड आल्बी** विशीकडे झुकलेला. मनी हताशपणाच्या सीमारेषेवरील असमाधान. अंगी नावलौकिक मिळवण्याइतपत लेखनगुण. महत्त्वाकांक्षी, पण भरीव, लक्षणीय असं हातून लिहून न झालेलं. तो लेखक होता की केवळ एक निरीक्षक? इतरांच्या जीवनात एक दुय्यम भूमिका बजावणं एवढंच त्याच्या नशिबी होतं? रुक्षरिकामीपणाची भावना वाढीला लागली होती. वाटत होतं, बहुधा आपण विल्यम फ्लॅनागन होणार. विल्यम त्याचा पहिला सदुपदेशक, मार्गदर्शक. कंपोझरचे सुप्त गुण अंगी असूनही त्या गुणाचे चीज न झालेला. पुढं अनेक वर्षांनी आल्बी म्हणाला, त्याला 'प्रत्येक गोष्टीचा उबग आला होता, माझासुद्धा.' तो दारूही बरीच पीत होता.

जानेवारी संपला. फेब्रुवारी उजाडला. म्हणजेच त्याच्या वाढदिवसाआधी एक महिना स्थळ: ग्रिनविच व्हिलेजधमील २३८ वेस्ट फोर्थ स्ट्रीटवरील त्याचं अपार्टमेंट. दुमडल्या जाणाऱ्या खुर्चीवर तो बसलेला. समोर डगमगणारं टेबल त्यावर स्टँडर्ड टाइपरायटर. 'वेस्टर्न युनियन'मध्ये निरोप्याचं काम करत असताना तिथून 'हस्तगत' केलेला. टाइपरायटरमध्ये पिवळा कॉपी पेपर सरकवलेला. त्यावर नाटक टाइप करायचंय. बोटं कीबोर्डवर फिरू लागली. शब्द उमटले :

'प्राणिसंग्रहालयात गेलो होतो मी. मी म्हणालोय प्राणिसंग्रहालयात गेलो होतो मी. मिस्टर, प्राणिसंग्रहालयात गेलो होतो मी.'

शब्दांचा ओघ सुरू झाला. सिंगल स्पेसमध्ये समास न सोडता. एकाग्रचित्तानं. त्याच्या आयुष्यात प्रथमच कुठल्यातरी आंतरिक गरजेपायी, निष्ठेपोटी लेखनाचा ओघ सुरू झाला. 'उस्फोट झाल्यागत' शब्दामागून शब्द कागदांवर उमटत गेले. अनवरत. नाटक पूर्ण झाले. 'द झू स्टोरी.' बोलणाऱ्या व्यक्तीचं नाव : जेरी. 'गृहस्थ चाळिशीचा; पोषाख गबाळा नाही, पण निष्काळजीपणे चढवलेला. एकेकाळी सडसडीत आणि पिळदार असणारा देह स्थूल होत चाललेला; आणि तो देखणा नव्हता पण एके काळी तो देखणा असल्याचं जाणवतं,

त्याच्या शारीरिक रुबाबाच्या ऱ्हासामधून व्यभिचारीपणा सूचित होता कामा नये; नेमकं सांगायचं तर, तो फार थकलेला होता.'

समय : उन्हाळ्यातील एका रविवारची दुपार. स्थळ : सेंट्रल पार्क. पीटर नामक एक गृहस्थ बाकड्यावर बसलेला.' चाळिशीच्या घरातला माणूस, जाडा नाही, हाडकुळा नाही, देखणा नाही, घरेलू नाही. अंगावर ट्वीडचा पोषाख. पाईप ओढत आहे. शिंगाकृती काठाचा चष्मा नाकावर. मध्यमवयीन असूनही त्याचा पेहराव आणि त्याची वागण्याची पद्धत यावरून वयाच्या मानानं तरुण दिसतो.'

एकांकिकेची सुरुवात होते तेव्हा पीटर पुस्तक वाचत असतो. जेरी बोलू लागतो तेव्हा प्रारंभी पीटरचे त्याच्याकडे लक्ष जात नाही. अखेरीस, जेरी त्याचं लक्ष स्वत:कडे वेधून घेतो. जेरी त्याची टर उडवतो, त्याला टोमणे मारतो आणि दरडावतो. हळूहळू पीटर आत्म–रक्षणाचा पवित्रा घेतो. त्यानंतर घडतो तो विरोधी प्रवृत्तीमधील बोचरा संघर्ष. जेरीच्या लेखी, आयुष्य हे एक प्राणिसंग्रहालय आहे, आणि लोक एकमेकांविरुद्ध युद्धाच्या पवित्र्यात असतात, झगडतात आणि अंती बाकड्याच्या ताब्यासाठी तो पीटरला दोन हात करण्याचे आव्हान देतो.

'द झू स्टोरी' लिहायला आल्बीनं अडीच आठवडे घेतले. टंकलेखित मजकुरावर त्यानं पेन्सिलीनं संस्करण केलं, नंतर ते पुन्हा टाइप केलं. एकांकिका १० मार्च रोजी पूर्ण झाली. त्याच्या जन्मदिनाआधी दोन दिवस. स्वत:वर लादून घेतलेली 'डेडलाइन' त्यानं जेमतेम सांभाळली. तो अधूनमधून थांबत होता, सुरुवात करत होता, क्वचित कल्पना बदलत होत्या. तरीही, एकांकिका बव्हंशी एक निखळ उद्रेक होता. पहिल्या ओळीपासून, अखेरच्या ओळीपर्यंत ती झरझरत होती. त्यानं म्हटल्याप्रमाणं,'देअर वॉज अ क्लिक.' एकांकिकेला काळ्याकुट्ट विनोदाचा पोत आहे. तीत भन्नाटपणा आहे. प्रतिमांचा स्वर खालचा असला तरी ती अत्यंत रोखठोक कबुलीजबाबागत भासते. नागरी जीवन आणि मृत्यू यांच्या आघाडीवरून बाहेर पडलेला एक वृत्तांत. 'द झू स्टोरी' आधी आल्बीनं शेकडो कविता (त्यातील काही त्याच्या शालेय मासिकात छापून आल्या होत्या), दोन कादंबऱ्या आणि नऊ नाटकं लिहिली होती. नाटकं रंगभूमीवर कधी आली नव्हती. दोन नाटकं पूर्ण लांबीची होती, परंतु तो ही एकांकिका लिहित असताना पहिल्यांदाच त्रिपरिणामात्मक लोकं पाहू शकत होता आणि रंगमंचावरील त्याचा प्रयोग डोळ्यांपुढं उभा करू शकत होता. आधीची नाटकं एक प्रकारच्या कृत्रिमतेनं सीमित झालेली होती. आल्बी म्हणतो,'ही अन्य नाटकं 'sturm und drang आणि स्वत:ची कीव यांनी भरलेली आहेत.' आणि त्यात एक पात्र असायचं जे 'काहीसं छुप्या लेखकाचं.' ती नाटकं म्हणजे एका नवोदिताचं लेखन होतं आणि ती ज्यानं लिहिली होती ती व्यक्ती 'पृथ्वीवरून पूर्णपणे नाहीशी झाली होती कारण मी ती व्यक्ती राहिलेलो नव्हतोच मुळी.'

काही वर्षांनी माघारी वळून 'द डिसपझेस्ड' या प्रारंभीच्या एका नाटकावरून आल्बीनं नजर फिरवली. तो म्हणतो, 'मी ते त्रयस्थपणानं वाचलं आणि ते मला माझं वाटलं नाही. सॅलिंजर आणि इतर बऱ्याचजणांचा त्यावर प्रभाव असल्याचं जाणवत होतं. 'द झू स्टोरी'च्या वेळी अशी गोष्ट घडली होती की मला अचानक आढळून आलं होतं माझ्या स्वत:च्या आवाजात मी लिहितोय. 'ते एवढं साधं होतं.'

एक निश्चित बदल झालेला होता आणि तो म्हणजे त्याला त्याची विनोदबुद्धी गवसली होती. किंबहुना त्याचा रंगमंचीय वापर करण्याचा मार्ग त्याला सापडला होता. परिणामी, त्यानं त्याचं असं पहिलं नाटक लिहिलं होतं. तो सांगातो, 'माझ्या तिसाव्या वाढदिवशी मीच मला दिलेली' ती भेट होती. तिनं त्याचं आयुष्य बदलून टाकलं होतं. एडवर्ड आल्बी एक नाटककार बनला होता.

न्यूयॉर्कमधील त्याचं आयुष्य आणि तारा पोचत्या करताना भेटलेली माणसं यातून मिळालेल्या अनुभवांमधून त्यानं कल्पक झेप घेतली होती. जेरी हा आल्बीवर बेतलेला आहे, किंवा फ्लॅनगनवर अशा निष्कर्षाप्रत त्या दोघांना ओळखणारी माणसं स्वाभाविकपणं येतात. एके काळचं देखणेपण आता हरवून गेलेले आहे, हे पात्राचं शारीरिक लक्षण फ्लॅनगनला लागू पडणारं होतं. आल्बीच्या दृष्टिकोनानुसार, दोन्ही व्यक्तित्वं त्याच्या स्वत:वरच आधारलेली होती. तो सांगतो, इथं 'दोन एडवर्ड्स आहेत, एक, जो लार्चमाँटमध्ये राहात असतो; दुसरा, जो न्यूयॉर्क शहरात राहात असतो'. जे आयुष्य त्यानं व्यतित केलं होतं, आणि त्यानं घर सोडलं नसतं तर, तेच आयुष्य तो जगत राहिला असता त्यावर हे नाटक म्हणजे आडवळणाने केलेला हल्ला होता.

नाटक पहिल्या प्रथम वाचलं फ्लॅनगननं. तो म्हणतो, 'पूर्ण विकसित "टॅलेन्ट" असा अचानक उफाळून यावा अशी काही पूर्वतयारी नव्हती. काहीही समोर नसताना तो इथं पोहोचला होता. मी त्यानं अतिशय प्रभावित होऊन गेलो होतो. जणू काही तिशीच्या आधी सर्जनशील म्हणून त्याला अस्तित्वच नव्हतं, याचं ते निदर्शक होतं'. सर्जनशीलता अशी अचानक उसळून यावी याला कारण काय? या प्रश्नाला फ्लॅनगन उत्तर देतो, 'त्याची स्वत:ची उद्देशहीनतेची भावना आणि कशातही स्वत:ला गुंतवून न घेण्याची त्याची भावना यामधून उद्भवलेला 'क्रायसिस'. त्याची भावनिक साधनसंपत्ती तो दूषित करत होता. त्याच्या कुटुंबाशी संबंधित अशा बऱ्याच कारणास्तव तो व्यक्तिगत उलाघालीच्या बजबजपुरीच्या क्षेत्राप्रत घसरत होता.'

फ्लॅनगनच्या मदतीनं, आल्बी नाटक इकडेतिकडे पाठवू लागला. मागं वळून पाहता आश्चर्य वाटतं की त्याच्या नाटकाविषयीची प्रारंभीची मतं किती अदूरदृष्टीची होती. मॅकडॉवेल कॉलनी येथे थॉर्टन वाइल्डरनं त्याला प्रोत्साहन दिलं होतं, त्या वयोवृद्धानं त्याला सल्ला दिला की त्यानं कवितेकडून नाट्यलेखनाकडे वळावं. आल्बीला हे आठवलं आणि नाटकाची

एक प्रत त्यानं त्याच्याकडे पाठवून दिली. नाटकानं आपल्याला प्रभावित केलं, त्यात सूक्ष्म-दृष्टीचा प्रत्यय येतो असं त्यानं उत्तरादाखल पाठवलेल्या पत्रात लिहिलं. त्यानं आल्बीचं अभिनंदन केलं आणि नाटकाची चिरफाड करायला सुरुवात केली : 'वाचताना ते जेवढं चांगलं वाटतं त्याच्या निम्म्यानंही त्याचा प्रयोग चांगला होईल असं मला वाटत नाही – पुरुष– तिथले मूर्त स्वरुपातले पुरुष – मार्गातील अडथळे ठरतील... गोची अशी आहे की तुझा आशय सच्चा आहे, आंतरिक, आणि तुझा स्वत:चा आणि तुझा घाट आहे तो थकलेल्या म्हाताऱ्या आजोबाचा.' पुढं त्यानं पुस्ती जोडली की नाटकाला शैली नाही आणि ते उपरोधिकही नाही.

वाइल्डरनं त्याची अशी पुरती वासलात लावली तरीसुद्धा त्या वृद्ध नाटककाराबद्दलचा त्याचा आदर ओसरला नव्हता. ॲरन कोपलँड, विल्यम इंग आणि इतर बऱ्याच जणांच्या प्रतिकूल मतांनंतर फ्लॅनगननं त्याला सुचवलं की त्यानं फ्लॉरेन्समधील डेव्हीड डायमंड या संगती– रचनाकाराकडे एक प्रत पाठवावी. डायमंड हा फ्लॅनगनचा घनिष्ट स्नेही होता आणि त्याच्या शिक्षकांपैकी एक होता. परंतु डायमंडबरोबरचे त्याचे संबंध सलोख्याचे नव्हते, भीत-भीतच त्यानं नाटक त्याच्याकडे पाठवून दिलं.

त्यानंतर तीन आठवड्यांनी प्रतिक्रिया आल्या. डायमंडनं उतू जाणाऱ्या त्याच्या उत्साहाला बांध घातला नव्हता आणि त्यांच्या मागील मतभेदांकडे दुर्लक्ष केलं होतं. आल्बीच्या लेखी ही बाब म्हणजे वॉल्ट व्हिटमनला पाठवलेल्या राल्फ वाल्डो इमर्सनच्या पत्रासमान होती. लक्षणीय कारकिर्दीच्या प्रारंभी त्याचं अभिनंदन करण्यात आलं होतं आणि हे अनपेक्षित होतं.

डायमंडनं लिहिलं,'अत्यंत हलवून टाकणारं, अस्वस्थ करणारं आणि मानवी संघर्ष आणि व्यक्तिगत संवाद यांची दयनीय असमर्थता कठोरपणे उघड करणारं एक नाटक लिहिल्याबद्दल तुझं आदरपूर्वक आणि भरभरून अभिनंदन मला करायचं आहे.' पुढं म्हटलं की ते 'एक सुत्र करणारी (आणि या क्रियापदाचा वापर मी जाणीवपूर्वक करत आहे) यशस्वी पूर्ती आहे.' नाटकाची स्तुती करूनच डायमंड थांबला नाही तर ते रंगभूमीवर आणण्यासाठी काहीही करायची त्यानं तयारी दर्शवली, त्या दिशेनं हालचाल केली, आणि आल्बीच्या करीयरची वाट मोकळी केली, नाटककार म्हणून त्याच्या कारकीर्दीच्या ओनामा घातला.

डायमंडच्या सूचनेनुसार आल्बीनं नाटक जिंकास ब्रॉनकडे पाठवलं. ब्रॉन हा स्विस नट, दिग्दर्शक आणि भाषांतरकार. त्यानं विनाविलंब दाद दिली. लिहिलं,'माझी खात्री झालेली आहे, डेव्हिड डायमंडच्या कृपेनं, एका रंगमंचीय मास्टर पीसशी माझा परिचय झाला आहे.' ब्रॉननं नाटकाचा जर्मन भाषेत अनुवाद केला आणि दोन्ही भूमिका स्वत:करून त्याचं ध्वनी मुद्रण केलं. त्यानंतर फ्रँकफुर्ट येथील एस. फिशर प्रकाशन संस्थेच्या नाट्यविभागाच्या प्रमुख



अनुक्रमणिका

स्टेफनी हनझिंगर हिला टेलिफोनवर बोलावून घेतलं आणि टेलिफोनवर तिला टेप वाजूवन दाखवली. मिसेस हनझिंगरनं पुढचं पाऊल उचललं. तिनं बर्लिनमधील शिलर थिएटरचा दिग्दर्शक बोलेस्लॉ बालोंग याला बोलावून घेतलं. 'द झू स्टोरी' वाचल्यानंतर सॅम्युअल बेकेटच्या 'क्रॅप्स लास्ट टेप'च्या जोडीनं 'वर्ल्ड प्रिमिअर'मध्ये ते सादर करण्यास मान्यता दिली.

सोमवार, दिनांक २८ सप्टेंबर १९५९. यादिवशी शिलर थिएटरचं 'स्टुडिओ थिएटर' असलेल्या Werkstatt येथे 'Die Zoo-Geschichte' चा पहिला प्रयोग सादर करण्यात आला. प्रयोग जर्मन भाषेत झाला. जर्मन भाषा नाटककाराला परकी. आल्बी बॉक्समध्ये स्थानापन्न झाला. त्यानं नाटाकाची एक रंगीत तालीम पाहिलेली होती, पण आता पहिल्यांदाच प्रेक्षकांसमवेत तो ते पाहू लागला. रंगमंचाकडे न बघता बराच काळ त्याची नजर प्रेक्षकांवर खिळलेली. तो म्हणतो, 'माझ्या नाटकाचा नटांकरवी प्रेक्षकांवर काय परिणाम होतोय यात मला स्वारस्य होतं. ते रंगून गेले होते आणि ज्या ठिकाणी त्यांनी हसायला हवं अशी अपेक्षा होती तिथंच ते हसत होते. अगदी थक्क करून टाकणारी गोष्ट म्हणजे नाटकाच्या अखेरीस जेव्हा जेरी सुरा खुपसून घेतो आणि पीटर धूम ठोकतो आणि जेरी तिथं एकटाच अखेरच्या घटका मोजत, नीरव शांतता पसरली होती, मला ती मिनिटभर असल्याच जाणवलं, कदाचित ती काही सेकंदाचीही असेल आणि त्यानंतर टाळ्यांचा कडकडाट सुरू झाला होता... त्यांनी टाळ्यांचा कडकडाट करण्यापूर्वीच्या नीरव शांततेमध्ये मला आठवतं विचार करत होतो "ओह्-ओह्."

नटांनी त्यांची मानवंदना स्वीकारल्यानंतर लेखकाच्या नावाने पुकारा झाला. युरोपिअन रिवाजानुसार आल्बीला रंगमंचावर आणण्यात आलं. तो सांगतो, 'मी रंगमंचावर चढलो तेव्हा "चिअर्स" झाल्या असणारच, पण मला त्या स्मरत नाहीत. टाळ्यांचा गजर बराच काळ होत होता आणि मी बऱ्याच वेळा मानवंदना स्वीकारली होती, एकट्यानं आणि नट आणि दिग्दर्शक यांच्यासमवेत.'

पहिला प्रयोग संपल्यानंतर, अत्यानंदाच्या लाटांवर तरंगत तो स्टेफनी हनझिंगर, पिंकास ब्रॉन आणि त्याची पत्नी यांच्याबरोबर डिनरला गेला. एव्हाना या तिघांशी त्याची चांगली मैत्री झाली होती. हॉटेलमध्ये त्यांनी शांपेन घेतली, कालवं खाल्ली, त्यानंतर क्रीमनं आच्छादिलेलं नासपती आणि व्हॅनिला आइसक्रिम झालं. त्यानंतर आल्बी आपल्या 'पॉन्सिऑन'मध्ये परतला आणि त्या संध्याकाळच्या आठवणींवर विचार करू लागला : 'मी माझ्या बाल्कनीत आहे, तिथं चंद्र आहे. मी जिथं बसलोय. तिथून कैसर विल्हेम कॅथिड्रलची छिन्नविछिन्न वास्तू मी पाहतोय – उभी, भग्नावस्थेत, युद्धाची एक साक्ष असल्यासारखी, जवळजवळ पुन्हा उभारलेल्या शहराच्या मध्यभागी. झापडल्यागत मला थकवा आलाय; मी गोंधळलोच, अगदी एकाकी, होमसिक, मी समजून चाललोय अत्यंत सुखी आहे.'



अनुक्रमणिका

३० सप्टेंबरला बर्लिनच्या वृत्तपत्रांमधून परीक्षणं आली. आल्बीसाठी ती घाईघाईनं आणि ढिसाळपणानं अनुवादित केली गेली. त्याच्या कृतीबद्दलची अशी व्यावसायिक समीक्षणात्मक भाष्यं तो प्रथमत:च ऐकत होता, आणि त्यापैकी बव्हंशी सारीच कौतुक करणारी होती. घरी पाठवलेल्या पत्रात त्यानं त्यातील काही उद्धृत केली आणि पुढं पुस्ती जोडली की नाटक बऱ्यापैकी धंदा करत आहे आणि जर्मनीमधील इतर शहरांतून ते सादर करण्यासाठी ऑफर्स आहेत.

बर्लिन इथल्या अनुभवाकडे वळून बघताना तो म्हणतो : 'महिन्यापूर्वी,'वेस्टर्न युनियन' साठी मी तारा पोहोचवत होतो, आणि तिथं बर्लिनमध्ये मी होतो, जी भाषा मला समजत नव्हती त्या भाषेतील एका अत्यंत यशस्वी नाटकाचा लेखक म्हणून. 'वेस्टर्न युनियन'चा निरोप्या मी राहिलेलो नव्हतो. मी एक नाटककार होतो. तो (अनुभव) बेभान आणि संभ्रमित करणारा होता ! त्याच्या भाषेत सांगायचं तर 'my own faintly idiotic but damn gratifying happy-making play-success.

या क्षणी, त्याला यश लाभलं होतं ते जर्मनीत. अमेरिकेत परतल्यानंतर आल्बीचा एजंट एडवर्ड पॅरोन न्यूयॉर्कमध्ये कुठं प्रयोग होतो का हे चाचपू लागला, त्यासाठी प्रयत्नही करू लागला. बऱ्याच जणांकडून नकार घंटा ऐकल्यानंतर, नाटक रंगभूमीवर आलं,'ॲक्टर्स स्टुडिओ' येथील 'वर्कशॉप'साठी, केवळ एका प्रयोगासाठी. पहिल्यांदाच अमेरिकेमध्ये प्रेक्षकांसमोर नाटक सादर करण्यात आलं. लू ॲन्टोनिओ आणि शेपर्ड स्ट्रडक्कि यांनी संहिता हातात घेऊन प्रयोग केला. नेपथ्य म्हणून बाकड्यांचा वापर करण्यात आला. प्रथेनुसार, प्रयोगानंतर स्टुडिओचे सदस्य चर्चेमध्ये सहभागी झाले. परंपरेनुसार, या बैठकांमध्ये कठोर टीका केली जात असे, कैकदा नाटककाराला घायाळ करण्याइतपत. 'द झू स्टोरी'चा प्रयोग संपला. क्षणभरच्या नि:शब्दतेनंतर काही जणांनी नाटकावर हल्ला चढवला, काहींचं म्हणणं,'वेल, तुम्ही असं करायला हवं', तर काहींचं,'ते भरकटत गेलंय.'

अचानक, स्टुडिओच्या 'नाट्यलेखक– युनिट'चा सदस्य, नॉर्मन मेलर ताड्कन उठून उभा राहिला. क्षणाची उसंत न घेता म्हणाला,'मी आजवर बघितलेल्या एक अंकी नाटकां-मधलं ते अत्युत्कृष्ट आहे.' आणि सर्वांची आवाजी बसवली.

अखेरीस, पॅरोननं नाटक रिचर्ड बारच्या हाती सुपूर्द केलं. बार ब्रॉडवे येथील एक निर्माता. सांप्रत,'ऑफ ब्रॉडवे'कडे वळलेला. आपल्या अप्रकाशित आत्मकथनात त्यानं म्हटलं आहे,'नवीन लेखकाच्या नव्या संहितेकडे मी नेहमीच ज्या तुच्छतादर्शक नजरेने मी पाहातो त्याच नजरेनं मी ते वाचायला सुरुवात केली.' ती वाचून संपवली आणि त्यानंतर त्याचं मत बदललं आणि ती रंगभूमीवर आणण्याची निर्णय त्यानं घेतला.

१४ जानेवारी १९६० रोजी 'क्रॅप्स लास्ट टेप'च्या जोडीनं 'द झू स्टोरी' रंगमंचावर सादर झालं. यातील भूमिका जार्ज महारिस् आणि विल्यम डॅनियल्स यांनी केल्या. जिथं युजिन



अनुक्रमणिका

ओनिलच्या नाटकांनी त्याला यश मिळवून दिलं होतं त्या खेड्यामधील 'प्रॉव्हिन्सटाउन प्लेहाउस'मध्ये प्रयोग झाले. प्रयोग संपल्यानंतर, बार त्याची भागीदार, आल्बी आणि काही स्नेहीमंडळी बारच्या अपार्टमेंटमध्ये जमली. प्रारंभीची तक्रारीचा सूर असणारी परीक्षणं वाचून बार 'तत्काळ कोसळला आणि रंगभूमीला रामराम ठोकण्याची त्यानं पुन्हा धमकावणीही दिली.' दुसऱ्या दिवशी दुपारच्या वृत्तपत्रांमधील अनुकूल परीक्षण त्यानं पाहिलं आणि त्याचं औदासिन्य ओसरलं. पहिल्या प्रयोगाच्या रात्री आल्बीलाही नैराश्यानं घेरलं होतं. परंतु 'दुसऱ्या दिवशीची सकाळ उजाडली होती आणि मला आढळून आलं होतं की नाटकाला घवघवीत यश मिळालं होतं.'

जॉन ऑस्बोर्नच्या 'लुक बॅक इन अँगर'नं इंग्लंडमधल्या नव्या कामगार वर्गातील नाटककारांच्या तुकडीला जागं केलं होतं आणि नोएल कॉवर्ड आणि टेरेन्स रॅट्गिन यांच्या नाट्यपरंपरेवर पोसलेल्या उच्चभ्र कुलीनतेची पार हकालपट्टी केली होती; असंच परिवर्तन आल्बीच्या नाटकानं अमेरिकन नाट्यसृष्टीत घडवून आणलं, उघडंवाघडं वास्तव आणि तात्कालिकता आणली.

आर्थर मिलर आणि टेनेसी विल्यम्य यांनी ब्रॉडेवेवर रंगभूमिविषयक क्रांती घडवून आणली होते हे नि:संशय. पण आल्बीनं 'द झू स्टोरी'द्वारे दरवाजे आणखीनच खुले केले, असंतुष्ट आणि स्वातंत्र्यहीन यांच्याशी थेट संबंध जोडले. तासाहूनही कमी चालणाऱ्या एका छोट्या नाटकाच्या आधारे अमेरिकन रंगभूमीचा त्राता म्हणून नाटककार आल्बीचा पुकारा झाला.

---

लिपीबद्ध शब्दाच्याद्वारा साधलेल्या संपर्कातून नाही तर मौखिककेतून संपर्क साधून, मानवी समाजाने सुरुवातीच्या काळातरी आपली स्वत:ची निर्मिती केलेली आहे. मानवाच्या एकंदर इतिहासाच्या अगदी अलीकडच्या काळात, मानवी समाज साक्षर झाला. सध्या दूरचित्रवाणीवरच्या 'टॉकशोज'ना (मौखिक संपर्क) श्रोतांचा व प्रेक्षकांची उत्कट अशी बांधिलकी (Passion) आहे; आणि त्यावर अगदी स्वाभाविक अशा अनऔपचारिकपणे करण्यात येणारा उपदेश, या दोन्ही गोष्टी पाहिल्यानंतर कदाचित् आपण पुन्हा एकदा मौखिकतेकडे परत जात आहोत का? हा विचार स्वाभाविकपणे मनात येतो. तसेच जर असले, तर मानव हा प्राणी पुन्हा एकदा मौखिकतेकडे परत जात आहे असे मानावयाचे का? या प्रश्नास होकारार्थी उत्तरे असली तर मानव हा प्राणी दुसऱ्या बालपणाकडे परतण्याच्या दिशेने आगेकूच करीत आहे असाच त्याचा अर्थ होईल. या कृतीत मानवाला विद्यमान समाजातील बुद्धीजीवी – विचारवंतांचे सहाय्य आहेच. याचे कारण बुद्धीजीवी–विचारवंत कोणतीही चळवळ असो, त्याच्या आघाडीवर नेहमीच असतात, वा त्या ठिकाणी असण्यासाठी प्रयत्नशील असतात.

**–प्रा. वाल्टर जे ओंग**

# एका लेखकाचा परिचय

## मार्सेल प्रूस्त

- विष्णू सदाशिव ब्रह्मे

**चार**

१८९२ च्या ऑगस्टच्या उत्तरार्धात प्रूस्तची तरुण पुरुषांबरोबरची अशारिर मैत्री पुन्हा मूळ धरू लागली होती. त्याची ही उपजत प्रवृत्ती मध्यंतरीच्या तीन वर्षांच्या काळात खंडित झाली होती. कारण : स्त्रियांवर 'नॉर्मल' प्रेम करण्याचा त्याचा प्रयत्न. शक्यता आहे, त्याच्या विशीमध्ये त्याला स्वतःच्या विधिलिखिताची चाहूल लागलेली नसावी. समलिंगी प्रेमाच्या अस्तित्वाची बहुधा त्याला तेव्हा कल्पनाही नसावी. 'लिसे, काँदोसे'मध्ये त्याचे शिक्षक दार्लू मृदू भाषेत चौकशी करत, 'तुझ्या हृदयाच्या दरवाजामधून तो बाहेर पडला तेव्हा त्याला तू कितवा क्रमांक दिला होतास?' परंतु असं दिसतं, त्यांच्या या विद्यार्थ्याला बुद्धिमत्ता आणि नैतिक गुणविशेष यांचंच केवळ आकर्षण होतं, खरं वा काल्पनिक. त्याची आत्यंतिक इच्छा : ज्याच्यावर जीव जडावला आहे त्याच्याकडूनही आपल्याएवढाच उत्कट प्रतिसाद मिळावा, या मैत्रीत अन्य कुणाचा सहभाग नसावा आणि साहित्यिक चर्चेमध्ये त्याला रस असावा. जाक बिझे वा दानिएल हालेव्ही यांच्यामधील ही पवित्र ज्वाला क्षीण झाल्यानं आपली तृष्णा भागवण्यासाठी तो अन्यत्र वळला होता, आशेनं आणि विश्वासानं. लष्करी सेवेत असताना हे प्रकरण मागील पानावरून पुढं चालू राहिलं होतं. होरेस फिन्लेच्या पाठोपाठ गास्ताँ द केइल्लावेट. ओरलऑं येथील शेतकरी मित्रांचा साधेपणा, त्यांची 'ओरिजिनॅलिटी' त्याला भावली होती. परंतु, त्यावेळी त्यानं 'तो' मार्ग अनुसरला नव्हता. पंधरा वर्षांनी त्यानं 'त्या' मार्गावर पाऊल टाकलं कारण तोवर त्याची आई मृत्यू पावली होती आणि कामगार वर्गातील मित्र जोडण्यास तो मोकळा झाला होता. दरम्यानच्या काळात, 'ल बानक्वेत' साठी लिहीत होता, खानदानी यजमानीणींच्या घरच्या मेजवान्यांना हजेरी लावत होता आणि जाक पुनचे, मादम स्ट्रॉस, लोरे हेमन, कॉमपतेस्स द रोव्हिग्न आणि मारी फिन्ले यांच्यामध्ये त्याचा जीव गुंतला होता. पुरुष मित्रांबरोबरच्या मैत्रीचा उल्लेख मात्र कुठं आढळत नव्हता. परंतु १८९२ च्या शरदापासून देखणे तरुण पुरुष त्याच्या जीवनात एकापाठोपाठ येत राहिले. प्रूस्त त्याच्या आयुष्याच्या ज्या टप्प्यावर आता आला होता तिथं मॉसिअ द चार्लसच्या खऱ्या वृत्तीचा शोध लागलेला होता.

१८९२ च्या ऑगस्टच्या प्रारंभी प्रूस्त राज्यशास्त्रात चांगल्या रितीनं उत्तीर्ण झाला होता, पण कायद्यात त्याला अपयश आलं होतं. त्याच्या आईवडलांची घोर निराशा झाली होती.

याच काळात त्याच्यामध्ये परिवर्तन घडून येत होतं. अर्थात त्याची जाणीव त्याला झालेली नव्हती. त्याच्या नव्या दोस्तींमध्ये समलिंग रतीची लक्षणं डोकावू लागली होती आणि याला नकळत निमित्त झाला होता, रॉबेर द बिल्ली. बिल्ली हा लष्करी सेवेतील त्याचा सह-सैनिक. तत्पूर्वी सह-अध्यायी. १८९१ च्या उन्हाळ्याच्या सुट्टीत तो जिनेवाला गेला असता एडगर ओबेर नामक एका स्वीस तरुणाशी त्याचा स्नेह जुळून आला होता. हिवाळ्यात बिल्लीच्या भेटीची परतफेड करण्याकरता ओबेर आला तेव्हा त्याचा प्रूस्तशी परिचय झाला होता. त्याचा रुबाब, प्रामाणिकपणा आणि त्याची 'कॉस्मॉपॉलिटन' संस्कृती यांनी प्रूस्त प्रभावित झाला होता. त्याच्या बरोबरच्या संभाषणांच्या आधारे त्यानं स्वत:चा शोध घेतला होता. आदरणीय त्यूगोनॉट कुटुंबामधील काही खळबळजनक गुपितांचा शोध लागल्यावर त्याला आनंद झाला होता. निष्पापपणे त्यानं बिल्लीला लिहिलं होतं, 'माँ पती रॉबेर, तुझ्याच भल्यासाठी मी हे तुला सांगत आहे. काहीतरी भयानक *गफलत* करण्यापासून तुला वाचवण्यासाठी.'

एडगर ओबेरचं अत्यंत लक्षणीय स्वभाव वैशिष्ट्य होतं : त्याची धार्मिक कळकळ. त्याच्या निश्चल नजरेत प्रूस्तला आढळून आलं होतं : जिव्हाळा आणि भ्रमनिरास, श्रद्धेची दिप्ती. त्याला आठवली होती आपल्या आजी-आईची प्रतिष्ठा आणि सत्कृत्ये आणि त्याला संदिग्धपणे जाणवली होती, पश्चातापाची भावना, अद्याप त्यानं न केलेल्या पापांबद्दल. तो बिल्ली आणि एडगर यांच्याबरोबर स्वच्छंदपणे हिंडत होता. दिवसरात्र. प्रूस्तची भावविवशता आणि जिज्ञासा यांची एडगर क्वचित प्रसंगी धारदार उपरोधानं कान उघाडणी करत होता. तरीसुद्धा एखाद्या प्रेमळ दृष्टिक्षेपानं वा हस्तांदोलनानं त्याची तो नेहमी भरपाईही करत होता. निरोप घेतेसमयी तो म्हणाला होता, 'पुढल्या वर्षी मी येईन, *काहीही झालं तरी.*' परंतु तसं घडायचं नव्हतं. १८ सप्टेंबर १८९२ रोजी अपेन्डिसायटिसनं त्याचा बळी घेतला होता. प्रूस्तनं बिल्लीला लिहिलेल्या सांत्वनापर पत्रात हळहळ व्यक्त झाली होती पण शोकाचा लवलेशही नव्हता. तो आपला मित्र नव्हता, बिल्लीचा होता. याची त्याला काहीशी असूया वाटत होती. आता त्याला स्वत:चा ओबेर शोधायचा होता. तो शोधल्यावर त्याबाबत बिल्लीला कळायला हवं होतं आणि त्याला असूया वाटायला हवी होती. ले फ्रेमाँतला असताना त्याला दहा पानी पत्र आलं होतं. निनावी. त्यानंतर त्यानं बिल्लीला एक थट्टेखोर पत्र लिहिलं होतं, आवर्जून कळवलं होतं, 'अखेर माझ्या स्वप्नातील एक कनवाळू पत्रलेखक मला मिळाला. खरं आहे की आपल्या पाकिटावर तो फक्त स्टॅम्प डकवतो, त्यामुळे मला नेहमी ३० सेन्तीम भरावे लागतात. परंतु एखादी व्यक्ती आवडल्यानंतर हे करायलाच हवं नाही का?' १८९३ च्या प्रारंभी बिल्ली बर्लिनमधील फ्रेंच वकिलातीत नोकरीत असताना, प्रूस्तला आणखीन एक मित्र मिळाला होता. त्याचं नाव होतं, रॉबेर द फ्लेर. तरुण, मोहक, बुद्धिमान आणि प्रेमळ. प्रूस्तचा तो सर्वस्व बनला होता. वसंतामध्ये हळूवार सूर्यकिरणांच्या पुनरागमनानं', 'घरी एडगर ओबेरला आपण भेटत होतो, त्या

काळाची भ्रांती निर्माण व्हावी' असा 'नेमका आभास' त्याला दिला होता. ओवेरसारखाच एक नवा तरुण त्याला भेटला होता. जणू काही 'काही झालं तरी' पुढील वर्षी येण्याचं ओबेरनं दिलेल्या आश्वासनाची पूर्ती झाली होती. हा तरुण इंग्रज होता. विली होथ. ओबेर प्रमाणंच धार्मिक प्रवृत्तीचा. प्रॉटेस्टंट म्हणून जन्मला पण वयाच्या बाराव्या वर्षी त्यानं कॅथॉलिसिझमची दीक्षा घेतली होती. त्याच्या नजरेत ओबेरप्रमाणंच अशुभाच्या पूर्वसूचनेची उदास झाक होती, स्थितप्रज्ञता होती. त्यांच्या वर्तुळात तो सर्वांत गंभीर प्रकृतीचा. बालकागत निष्पाप, निर्मळ ह्रदयाचा. त्याचं हसणं दिलखुलास. आत्मभान नसलेला त्याचा मुसमुसणारा उल्हास. या दोघांची भेट झाली होती बु द् बुलोग्न येथे. सकाळची सूर्यकिरणं नव्यानं फुटलेल्या पानांमधून ओघळत होती. एका वृक्षातळी तो उभा. त्याची सचिंत नजर प्रूस्तवर रोखलेली. त्याला पाहताच एक चमत्कारिक विचार प्रूस्तच्या मनात डोकावला होता. १८९१ मधील एका प्रसंगाची त्याला याद आली होती. बिल्लीबरोबर तो लुर्व्हला गेला असताना व्हॅन डायक्नं चितारलेल्या तरुण इंग्रज घोडदळाच्या काही सैनिकाच्या पोर्ट्रेटकडे बिल्लीनं त्याचं लक्ष वेधलं होतं. तो म्हणाला होता, 'मार्सेल, हे बघ, हे सारेजण यादवी युद्धात मारले जाणार आहेत, आणि हे त्यांच्या चेहऱ्यावरून तुम्ही सांगू शकता.' विनाश अटळ असणाऱ्या रिचमंडच्या ड्यूकप्रमाणं, विली गर्द हिरव्या पर्णसंभाराखाली उभा होता. अशा व्यक्तींचा 'रुवाब, तुमच्या प्रमाणं त्यांच्या पोषाखात नसतो, तो असतो त्यांच्या देहांत, आणि वाटतं, त्यांच्या देहांना तो प्राप्त झालेला असतो, आणि त्यांच्या आत्म्याकडून त्याचा लाभ त्यांना अव्यावहतपणे होणार असतो. तो नैतिक रुबाब असतो.' नंतर विलीचं आणखीन एका वैशिष्टानं त्याचं लक्ष वेधून घेतलं होतं : कुठल्यातरी स्वर्गीय रहस्याच्या दिशेनं उंचावलेलं त्याचं बोट, अनाकलनीय हसरे डोळे. त्याला आठवलं होतं लुर्व्हमधील आणखीन एक चित्र. त्याला आवडणारं. या चित्रात धार्मिकता, गूढ आणि लैंगिक असंदिग्धता याची बेमालूम एकरूपता झाली होती. विली अगदी लिओनार्दोच्या त्या बाप्तिस्त जॉनसारखाच होता. हिरव्यागार कुरणावर रंगलेल्या त्या संभाषणामध्ये त्यांनी एक संकल्प योजला होता : अधिकाधिक एकत्र रहायचं, ध्येयवादी स्त्री-पुरुषांच्या वेचक वर्तुळात, निर्बुद्धपणा, दुर्गुण आणि द्वेष यांच्यापासून कित्येक योजनं, दूर कुठंतरी, जिथं त्यांचे अशिष्ट बाण आपल्यापर्यंत पोचणार नाहीत.' परंतु या संकल्पाची पूर्ती होण्याआधीच, ३ ऑक्टोबर १८९३ रोजी विली टायफॉडनं पॅरिसलाच निधन पावला होता. एडगर ओबेरशी असलेल्या त्याच्या साम्याची अशी पूर्तता झाली होती.

दरम्यान, १८९३ च्या वसंतात मादलीन लमेरच्या दरबारात प्रूस्तला भेटला होता. त्याच्या कादंबरीमधील बॅरॉं द चार्लसचं मुख्य मॉडेल : कॉम्प्त रोबेर द मॉन्तेस्केइऊ - फ्रेझेनसाक

मादम लमेर ही प्रूस्त ओळखत असलेल्या यजमानीणींहून सर्वस्वी वेगळी होती. तिच्या

पार्ट्या माद्‌म स्ट्रासच्या पार्ट्यांएवढ्या सलगीच्या नसत किंवा मादम द केइल्लावेटच्या पार्ट्यांएवढ्या धाक वाटण्याइतपत बौद्धिक नसत. मादम लमेर ही एक व्यावसायिक चित्रकार होती. एक स्मार्ट सोसायटी पेंटर. तिची गिऱ्हाईकं होती फॅशनेबल समाजातील. ती पोर्ट्रेट्‌स, निसर्गदृश्यं आणि समाजातील घटनादृश्यं चितारत असे. पण तिची खरी आवड होती, फुलं रंगवणं. असं सांगितलं जात असे की, तिनं जेवढी गुलाबं निर्माण केली होती तेवढी अन्य कुणीही निर्माण केली नसतील, अपवाद फक्त परमेश्वराचा. आपल्या कलाकार मित्रांच्या मदतीनं ती आपल्या स्टुडियोमध्ये पार्ट्या देत असे. अशा प्रसंगी मास्सेने, साँ-साएन यांसारख्या संगीतकारांनी, रेजानसारख्या नट्यांनी अगदी उत्स्फूर्तपणे आपल्या कलागुणांचं प्रदर्शन केलं होतं. इथल्या पार्ट्या उत्सफूर्त असत, रंगेल असत. त्या एवढ्या नावारूपाला आल्या होत्या की समाजातील प्रतिष्ठित लोक तिकडे आकर्षित झाले होते. फ्रेंच अमीर उमरावांमधील सदस्य रूद माँसोवरील गार्डन-स्टुडियोला भेट देण्याची इच्छा मनी बाळगून असत. अन्य खानदानी पार्ट्यांना ते हजेरी लावत होते तरीही, हे विशेष. मादम लमेरच्या ध्यानीमनी नसतानाही तिच्या सॅलॉंला अनन्य स्थान प्राप्त झालं होतं. पॅरिसमधील अन्य ख्यातनाम सॅलॉंएवढे आश्रयदाते तिला लाभले होते. एप्रिल ते जून या महिन्यांमधील दर मंगळवारी तिचं छोटं घर जीव गुदमरून जावा एवढ्या पाव्हण्यांनी भरून जात असे. बाहेरील रस्त्यांवर गाड्या दाटीवाटीनं उभ्या असत. पादचाऱ्यांना गटाराच्या कडेकडेनं जावं लागत असे. ला रोशफुकोल्ड, हॉस्सॉंव्हिल, शेव्हीग्न, लूइनेस यां सारखे थोर कुळींचे फ्रेंच समाज-धुरीण आवर्जुन उपस्थित रहात. वेळेआधी आलेले पाव्हणे तिच्या बागेतील तालवृक्षांमधून फेरफटका मारत, इझेलवरील पूर्ण न केलेला कॅनव्हास किंवा भिंतीवरील मादमच्या मुलीचा सुरेख पोर्ट्रेट बारकाईनं न्याहाळत. मादमच्या घरची सायंसभा ही एक संगीतमय पर्वणी असे. संगीत चालू असताना कुणी बोलण्याचं धारिष्ट्य केलं तर यजमानीणीची करडी नजर त्याच्यावर रोखली जाई. समारंभाची सांगता झाल्यानंतर प्रूस्तसारखे तिचे जिगरी दोस्त मागं रेंगाळत. प्रूस्तच्या लेखी मादम लमेरला विशेष महत्त्व होतं कारण तिचं सॅलॉं हे त्याच्या 'गॅर्मांत मार्गा' प्रत नेणार सहज साध्य प्रवेशद्वार होतं. १८९२ च्या वसंतात तो अशा लोकांना भेटत होता. ज्यांची ख्याती, मोठेपणा आपल्यातील ज्यू रक्ताबद्दलची अपराधी भावना, जागी होऊ लागलेली विकृती आणि ओत्तय येथील चांदण्या रात्रीची स्मृती यांचं उपशमन करू शकेल अशी आशा तो कुठंतरी बाळगून होता.

आणि आयुष्याच्या या टप्प्यावर त्याला भेटला होता मॉन्तेस्कुइऊ. ज्याची भेट व्हावी म्हणून प्रूस्त उतावीळ झाला होता अशी व्यक्ती. अडतीस वर्षाचा एक कवी. फ्रेंच उमरावांमधील अत्यंत प्राचीन घराण्यांपैकी एका घराण्याचा सदस्य. बड्या बड्या घराण्यांशी त्याची जवळीक. ज्या मातबर वर्तुळांचे दरवाजे आजवर प्रूस्तसाठी कडेकोट बंद होते ते त्याच्या मार्फत उघडले जाऊन त्यात शिरकाव करणं त्याला शक्य होणार होतं.

मॉन्तेस्कुइउचं आकर्षण तो जसा होता यात सामावलेलं नव्हतं, तर आपण 'असे'

आहोत असं तो भासवत होता यात बरचसं सामावलेलं होतं. मुळातच तो दिमाखदार. अंगीकारलेलं सोंग वठवण्यात निष्णात. 'शोमनशिप' आणि आत्मस्तुती यात त्याच्याशी तुलना होऊ शकेल असा साहित्य जगतात अन्य कुणी नव्हता. त्यात प्रतिभावंतांची सफाई होती. उमरावांमधील सर्वांत उद्धट, एका वैभवशाली युगाचा एक श्रेष्ठ जहागिरदार अशी स्वत:ची प्रतिमा त्यानं स्वत:च निर्माण केली होती. त्याला हे सहज साध्य झालं होतं. कारण उद्धटपणाचं प्रदर्शन करण्याकरता, स्वत:च्या स्वाभाविक माथेफिरूपणाला त्याला केवळ वाट मोकळी करून घ्यावी लागत होती. शिवाय सौंदर्याचा प्रवर्तक, कला आणि तिचे समस्त आविष्कार यांच्याविषयी संवेदना असलेला व कलात्मक आहारावरच जगणारा, एक माणूस अशी 'पोझ' त्यानं घेतलेली होती. त्याचं घर म्हणजे कलांचं एक मंदिर होतं. दुर्मिळ आणि महागड्या वस्तूंनी ते सजवलेलं होतं. त्याच्या चोखंदळ अभिरुचीला साजेसं. परंतु त्या वस्तू वेड्यासारख्या प्रतिकात्मक आकृतीबंधांमध्ये एकत्रित केलेल्या आणि मांडलेल्या असत. असं सांगितलं जात होतं की, अग्निज्वाला म्हणूनच अग्निज्वालांच्या सौंदर्याचा आपण आस्वाद घेतो हे दाखवण्यासाठी भर उन्हाळ्यात तो शेकोटी पेटवत असे. गुलाबांच्या पाकळ्यांनी भरलेल्या बाऊलमध्ये काळजीपूर्वक लपवलेल्या दौतीत लेखणी बुडवून तो लिहीत असे. त्याच्या खानदानी दोस्तांना आणि प्रुस्तला तूर्त तरी, तो भासत होता, संपन्न संस्कृतीचं आणि मागील युगांतील कौटुंबिक स्वाभिमानाचं एक मूर्तिमंत रूप. परंतु सूक्ष्मदर्शी निरीक्षकांच्या लेखी तो फ्रेंच ऱ्हासाचा एक नमुना होता.

इतरांना खुपणारी अशी 'पोझ' सातत्यानं सांभाळणं कुणा येरागबाळ्याला जमणारं नव्हतं. मॉन्तेस्कुइउच ते करू जाणत होता. त्याचं व्यक्तिमत्त्वच विलक्षण छाप पाडणारं होतं. उंचापुरं सडसडीत बांधा. दिमाखदार 'प्रोफाइल'. सरळ नाक. लाटांगत मागं फिरवलेले केस. त्याचे कान एवढ्या नाजूक नजाकतीनं आकारलेले होते की ते इतरांच्या दृष्टीला पडावेत म्हणून स्वत:चं डोकं वेळोवेळी वळवण्याच्या मोहाला आवर घालणं त्याला जमत नसे. त्याची बोकडदाढी नजरेत भरणारी नव्हती, पण मिशा भरदार, त्यांची टोकं नाजूकपणे वर वळवलेली. हसताना आपले काळे दात कुणाच्या नजरेला पडू नयेत म्हणून तो आपलं तोंड एका हातानं झाकून घेत असे. प्रारंभी थोडीशी पावडर, किंचित रंगरंगोटी यांचा वापर तो करत असे. आपली प्रत्येक कृती लक्षणीय असावी याची अभ्यासपूर्ण खबरदारी जो घेत असे. त्याच्या किंमती फ्रॉककोटचे रंग सौम्य असत. त्याचे गळपट्टे, स्कार्फ मोठाले पण नेत्रसुखद रंगांनी झगझगणारे असत. त्याच्या हातात नेहमीच वेताची एक काठी असे. तिच्या मुठीवरील कासव लक्ष वेधून घेत असे. एके काळी ती चौदाव्या लुईच्या मालकीची होती. त्याच्या मते, प्रत्येक कलाकार हा स्वत:च एक कलाकृती असायला हवी.

मॉन्तेस्कुइउचं संभाषण कानांना आणि डोळ्यांनाही सुखद वाटत असे. एखाद्या श्रेष्ठ गायकानं सांगितिकेत गायिलेल्या पदागत वा थोर नटाच्या भाषणागत ते असे. तरीही त्यात

काहीसे विदूषकी चाळे वा पागलाची पिसाट बडबडही क्वचित असायची. पांढरे शुभ्र हातमोजे घातलेल्या हातांनी तो अशा काही हालचाली करे की त्या पाहात रहाव्यात. काही वेळानं हातमोजे काढून आपल्या बोटातील साध्या पण आगळ्यावेगळ्या अंगठीचं प्रदर्शन तो करत असे. बोलण्याच्या ओघात त्याच्या हालचाली अकस्मात आवेगी होत. आकाशाच्या दिशेनं नाट्यपूर्ण निर्देश केला जाई. ऑर्केस्ट्रामधील ट्रम्पेटसारखा आवाज वर चढे. सर्वांग थरथरू लागे. नंतर तो आपला पाय आदळत असे. माथा मागे झुकवत असे आणि किंचाळल्यागत हास्याच्या लकेरी सोडत असे. त्याच्या बोलण्याचे विषय असत, काव्य आणि पेंटिंग, काऊंटेसांच्या हॅटी, त्याच्या वंशाचं आणि स्वत:चं वैभव. आपल्या कुटुंबापाशी असलेला बुद्धिचा साठा माझ्या पूर्वजांनी खर्ची केला, स्वत:च्या ऐश्वर्याची जाणीव वगळता माझ्या वडलांपाशी काही उरलं नव्हतं. माझ्या भावाकडे तीही जाणीव नव्हती. परंतु तरुणपणीच इहलोक सोडून जाण्याइतपत तो सभ्य होता. आणि मी - आमच्या उमरावी टोपावर एका कवीचा गौरवशाली तुरा खोवला !' ह्याचा आवाज भरदार आणि भावदर्शी होता. त्याचे काव्यगायन रंगत असे. परपीडकवृत्तीचा अंश त्याच्यामध्ये होता. शत्रू करण्यात त्याला आनंद वाटे. चाटुक्ती करण्याखातीर आपल्या जिवलग मित्रांचा रोष ओढवून घेण्याचीही फिकीर त्याला नसे. आपल्या छोट्या पुतण्यांकडे तो जायचा, म्हणायचा, 'माझ्या लाडक्यांनो, आज आपण रडण्याचं नाटक करू या.' आणि तो रडण्याची नक्कल करायचा. त्याच्या पुतण्या गंमत म्हणून त्याच्या रडण्याची नक्कल करू लागत. खेळ रंगायचा आणि त्या खरोखरीच रडू लागायच्या आणि तो हळूच तिथून निसटायचा. हिस्टेरिया झाल्यागत त्यांना खिदखिदळत ठेवत.

स्त्रियांच्या सौंदर्याबाबत मॉन्तेस्क्युइउ आंधळा वा भावनाशून्य नव्हता सारा बेर्नहार्ड देखणी होती, तरुण होती तेव्हा त्यानं तिच्याशी शय्यासोबत केली होती. आणि त्या संगाच्या अनुभवानंतर आठवडाभर ओकाऱ्यांनी त्रस्त झाला होता. पुढं एले आनोरा ड्यूस, इसाडोरा डंकन आणि इडा रुबेन्स्टाईन यांच्याशीही त्याची सलगी होती. त्याची लैंगिक विकृती डोळ्यात भरणारी होती तरी त्याच्या निधनानंतर त्याला चांगलं ओळखणाऱ्या बऱ्याच लोकांनी तशी वस्तुस्थिती नसल्याचा हवाला दिला होता. त्यांचं म्हणणं : ही वॉज नॉट ॲन इनव्हर्ट, बट मिअरली ॲन इन्ट्रोव्हर्ट' वस्तुत: त्याची समलिंग संभोगवृत्ती मुख्यत्वे त्याच्या सेक्रेटरीबरोबरच्या त्याच्या दांपत्यसदृश नात्यामध्ये मर्यादित होती. इतर तरुण पुरुषांबरोबरचे त्याचे संबंध बहुधा बऱ्याचदा 'प्लेटॉनिक' असण्याची शक्यता आहे. 'आ ला रशार्श' मध्ये निवेदक क्वचित प्रसंगी विस्मयानं अंदाज करतो की मोरेल बरोबरचे चार्लसचा स्नेहसंबंध पूर्णपणे निष्पाप असावा. वेटर, कॅबवाले आणि अन्य बाजारबुणगे यांच्याशी मॉन्तेस्क्युइउचे चुटपुटते संबंध असल्याचे पुरावे नाहीत. चार्लस्चे हे स्वभाव वैशिष्ट्य, त्याच्या आडव्या देहाप्रमाणं, बारॉं डोआसॉंकडून घेतलेले होते. मादम ऑबेरतोनचा हा 'कझिन' समलिंगरती

होता. या यजमानीणीच्या सँलाँमध्ये प्रथमच एका बुधवारी प्रूस्त गेला असता या बॅरनचे भयानक डोळे आपल्यावर रोखले गेले असल्याचं त्याच्या ध्यानी आलं होतं. त्याची शून्य नजर त्याला पाहात नसल्याचा बहाणा करत होती. ही घटना वीस वर्षानंतर बाल्बेक येथील चार्लस आणि निवेदक यांच्या भेटीचं वर्णन करताना त्याला आठवली होती. परंतु १८९२ मधील घटनेचं महत्त्व काहीसं वेगळं होतं : बाराँ डोआसाँचे डोळे एखादी संशयास्पद वासना व्यक्त करत नव्हते तर प्रूस्तमध्ये कार्यरत असलेला समलिंगरती त्या नजरेनं हेरला होता. कामी येईल असा तो 'पोट्ट्या' नव्हता तर तो होता एक संभाव्य प्रतिस्पर्धी, किंबहुना एक दगाबाज आणि म्हणूनच 'त्या छोट्या मार्सेल'ला आपल्या सॅलाँमध्ये प्रवेश न देण्याचा इशारा त्यानं मादमला दिला होता. अर्थात मादमनं तिकडे दुर्लक्ष केलं होतं मॉन्तेस्क्युइउ या सँलाँमध्ये क्वचित येत असे. चार्लस म्हणजे मॉन्तेस्कुइउ आणि डोआसाँ या दोन समलिंग रतींच्या व्यक्तित्वाचा संयोग होता. वस्तुत: त्या दोघांमधून विस्तव जात नसे.

एकंदरीत, मॉन्तेस्क्युइउ हा एक पोकळ माणूस होता. त्याची पोकळ बढाई, त्याचं औधत्य, त्याची विकृती या साऱ्यांचा भयानक आणि अभेद्य असा दर्शनी भाग काहीही दडवून ठेवत नव्हता. तो फक्त छपवत होता एक भयभीत लहान मुलगा, ज्याच्याबरोबरचा संपर्क ते पार हरवून बसला होता असा. आपली अस्सल संवेदनशीलता आणि बुद्धिमत्ता यांचा जर का त्यानं वापर केला असता- जसा प्रूस्तनं केला होता, काही बाबतीत प्रूस्तचं त्याच्याशी साम्य होतं- तर ज्यावर त्याचा ठाम विश्वास होता ती प्रतिभा तो संपादन करू शकला असता. त्याऐवजी तो भपकेबाज पोषाख करत राहिला, वस्तूंचा संग्रह करत राहिला, गिरबटवीत राहिला, भांडणं उकरत राहिला, इतरांना दुग्ध्यात टाकत राहिला आणि दहशत घालत राहिला. चार्लसच्या लियरसदृश भव्यतेचा थोडासा अंशही त्याच्या अंगी नव्हता. तो होता एक दयनीय व्यक्ती, शोकात्म्य व्यक्ती नव्हे. चार्लसची व्यक्तिरेखा म्हणजे प्रूस्तनं काही प्रमाणात मॉन्तेस्क्युइउवर उगवलेला सूड, असं समजण्यात येतं त्यात तथ्य आहे, परंतु मॉन्तेस्क्युइउच्या गाडल्या गेलेल्या अंत:सामर्थ्याची केलेली उदार आणि प्रामाणिक प्रशंसाही त्यात आहे हे सुद्धा तितकंच खरं आहे.

मादम लमेरच्या दरबारात मॉन्तेस्क्युइउ आणि प्रूस्त यांची जेव्हा भेट झाली तेव्हा दोघंही एकमेकांकडे ओढले गेले होते. याचं कारण दोघंही आत्मकेंद्रित होते. आपल्या अभिरुची आणि प्रवृत्ती समान असल्याचं त्यांना आढळून आलं होतं. एकाच क्लबचे वा एकाच राजकीय पक्षाचे सभासद असल्यागत दोघांमध्ये जवळीक निर्माण झाली होती. परंतु बहुधा ते प्रेमिक नसावेत, मित्र तर खचितच नव्हते, कारण मैत्री जोडणं मॉन्तेस्क्युइउला जमणारं नव्हतं. इतर पुरुषापासून स्वत:ला अलग करणारी औपचारिकतेची बंधनं क्षणभरही शिथिल करण्यास तो कधीच तयार नसे. प्रूस्तशी वागताना तो सदैव गुरु आणि आश्रयदाता या भूमिकेत असायचा; प्रूस्त नेहमीच आज्ञाधारक शिष्याची भूमिका वठवायचा. त्यांचे संबंध

टिकून राहिले होते याचं कारण त्यांच्यामध्ये अधिक जवळीक निर्माण झाली होती. म्हणून नव्हे तर एकमेकांच्या गाढ गरजा अंतर राखून भागवण्याची शक्कल त्यांनी शोधून काढली होती म्हणून. प्रूस्तचा हा 'पेट्रन' स्तुतीसाठी सदैव हपापलेला असे. तो एक प्रतिभावंत आहे याचं सातत्यानं स्मरण करून देणाऱ्या उत्साही चाहत्यांचा गराडा त्याच्याभोवती पडलेला असेल तर स्वत:च्या तऱ्हेवाईकपणाची पोझ सांभाळणं त्याला शक्य होत असे. प्रूस्त त्याची स्तुती करत होता आणि त्या मोबदल्यात थोरामोठ्यांच्या ओळखी करून घेत होता, आमंत्रणं मिळवत होता. प्रारंभी आमंत्रणं फारशी मिळत नव्हती, पण धीमें धीमे त्यात वाढ होत गेली होती.

या दोघांमध्ये मैत्री जुळून आल्यानंतरच्या सुरुवातीच्या महिन्यात, प्रूस्त काहीसा तटस्थ राहिला होता कारण आपण कुठवर मजल गाठू शकू याची त्याला अद्याप पुरती खात्री बहुधा झाली नव्हती. 'ले शोव्ह सूरीस' आणि 'ले शेफ डे ओडर सूआव्ह' या त्याच्या कविता संग्रहाच्या भेट-प्रती हाती पडल्यानंतर, त्यांची पोच देताना प्रूस्तनं त्यातील काव्यरचनेची तुलना बॉदलेर, कोर्नइल, वॅग्नर आणि द विंची यांच्या काव्यरचनेशी केली होती.' आणि त्यातील जोष, कल्पना शक्ती, बौद्धिक ताकद आणि अतुलनीय सफाई या गोष्टींकडेच केवळ त्यानं लक्ष वेधलं होतं. परंतु त्या कविराजाशी त्याचा परिचय जसजसां वाढत गेला तसतसं त्याच्या ध्यानी आलं की, स्तुतीचा तो किती भुकेला आहे ! आणि त्यानं त्याची खुषामत जारी ठेवली होती. एका पत्रात त्यानं म्हटलं होतं की त्यानं जे सांगितलं आहे त्याहून चांगल्या रितीनं अन्य कुणालाही सांगता येणं अशक्यच. दुसऱ्या एका पत्रात लिहिलं होतं; 'मी तुम्हाला जेव्हा जेव्हा भेटतो तेव्हा तेव्हा मला तुमचं दर्शन अधिकाधिक स्पष्ट होत जातं. मला आढळून येतं की मी समजत होतो त्याहून तुम्ही कितीतरी महान आहात. मी आश्चर्यचकित होणाऱ्या एखाद्या प्रवाश्यासारखा आहे, ज्याला डोंगर चढता चढता अधिकाधिक चांगला प्रदेश दिसू लागतो. परवाच्या दिवशी जे दृश्य सामोरं आलं ते आजवरच्या दृश्यांहून अधिक सुंदर होतं. मी शिखर तरी गाठलं आहे का?' कवी बाहेरगावी जाताच प्रूस्तमध्ये शेक्सपिअर संचारला होता, त्याच्या वियोगाच्या यातनांनी तो विव्हल झाला होता, परंतु त्यानं स्वत:चं सांत्वन केलं होतं की त्याच्या आश्रयदाता आपली प्रतिमा आपल्या पुस्तकांमध्ये सोडून गेला होता. आणखीन एकदा त्यानं कळवलं होतं की, तो नजरेपल्याड गेला की त्याच्या दृष्टाक्षेपाच्या उर्जेला, त्याच्या आवाजाच्या वादळी जागृतीला, त्याच्या 'प्रोफाईल'मुळं होणाऱ्या उद्दिपनाला तो पारखा झालेला असतो. अशा वेळी, 'मी सतत तुमचं लिखाण आणि तुमच्या उक्ती यांचा सल्ला घेतो, त्यांची ज्योत एक दिप्ती म्हणून माझ्या स्मृतीमध्ये काळजीपूर्वक जपतो.'

दरम्यान गुरुच्या 'स्पॉन्सरशिप'चा तो लाभ उठवत होता. आपण उधळलेल्या स्तुतिसुमनांच्या मोबदल्यात इनामं वसूल करत होता. संधी साधून आपलं घोडं पुढं दामटत

होता, ज्यांच्याशी ओळख होण्यात आपल्याला स्वारस्य आहे हे चतुराईनं सूचित करत होता. एके दिवशी त्यानं दोन नावांचा उल्लेख केला. प्रिन्सेस द ले आँ आणि कॉम्प्तेस्स ग्रेफ्यूल्हे. ही नावं त्यानं निवडायची म्हणून निवडलेली नव्हती. यांपैकी पहिली होती, फ्रेंच सोसायटीमधील एक थोर 'लेडी', ड्यूक द रोहांची सून. त्यांच्या ऐतिहासिक किताबतीची ती लौकरच वारस ठरणार होती. दुसरी, तिच्याहूनही अधिक लखलखीत व्यक्ती होती, उमरावांमधील यजमानीणींमध्ये ती सर्वात 'स्मार्ट' होती आणि अत्यंत देखण्या स्त्रियांमधील एक लावण्यवती होती. तिचा नवरा गडगंज संपत्तीचा धनी होता. जुन्या पठडीतला हा 'जंटलमन' राजकारणात लुडबुड करत होता, प्रिन्स ऑफ वेल्सबरोबर शिकारीला जात होता आणि आपल्या बायकोहून रूपानं डाव्या असलेल्या 'अंगवस्त्रां'चा ताफा बाळगून होता. या अमिराला जुने स्नेही आणि परिचित चेहरेच आवडत. पोर्तुगालचा आणि स्पेनचा राजा यांसारखे असामान्य गुणविशेष असलेले पुरुष वगळता बुआ-बुरदां येथील आपल्या प्रसिद्ध संरक्षित वनात शिकार करण्यासाठी तो क्वचितच एखाद्या नवख्या परिचिताला आमंत्रण देत असे. त्याची पत्नी मात्र त्याच्याहून वेगळी होती. तिच्या आवडी सर्वसमावेशक होत्या. तिला कवी, संगीतकार, डॉक्टर, रसायन शास्त्रज्ञ, खगोल शास्त्रज्ञ-वस्तुतः तिच्या ख्यातनाम 'परफॉर्मन्ससाठी जे कुणी आस्वादक प्रेक्षकाची भूमिका स्वीकारत ते सारेच तिला आवडत असत. निगरगट्ट वाटावी एवढी ती नाटकी होती. सोंगं वठवण्यात ती कधी खंड पडू देत नव्हती. तिचं आयुष्य एक नाट्यप्रयोग व्हावा हे अगदी स्वाभाविक होतं या प्रयोगात ती सदैव केंद्रस्थानी असे. नामवंत गणितज्ज्ञांना 'एन्टरटेन' करताना संभाषणाची सूत्रं ती स्वतःकडे घेत असे, त्यातही आपल्याला गती आहे हे दाखवून देण्यासाठी. जे विषय बहुधा तिच्या आकलनापलिकडचे असत त्यावरही ती बिनदिक्कतपणे बोलत असे. प्रत्येकाचं समाधान होईस्तोवर. संगीतामध्ये आपल्याला रुची असल्याचं तिनं दर्शवलं मात्र, एका नामवंत संगीत-सभेची ती चक्क प्रेसिडेन्ट झाली होती. सुधारणांचा प्रश्‍न तिनं हाती घेतला होता. थिएटरमध्ये छोट्या हॅटी वापराव्यात, म्हणून खानदानी स्त्रियांना राजी करण्याची मोहीम तिनं उघडली होती. छोट्या धाडसी पार्ट्या ती आयोजित करत होती. तिच्या दरबारात पॅरिसमधील 'मॉड' एकत्र जमत आणि फॅशनच्या क्षेत्रातील जाणकारांशी विचारविनिमय करत. तिची उपस्थिती एवढी राजेशाही असे, तिचा पेहराव एवढा लक्ष्यवेधी असे, समयोचितता एवढी अचूक असे की प्रदर्शनात संगीत-सभेत वा दिवाणखान्यात प्रवेश करताच ती सनसनाटी हवा निर्माण करत असे. आपल्या भावाच्या लग्नसोहळ्यात मध्ययुगीन सुवर्णजडित पोषाख तिनं परिधान केला होता. या सोहळ्यात वधूनं नव्हे तर तिनं साऱ्यांचं लक्ष वेधून घेतलं होतं. घनिष्ट मित्रांसमवेत असतानाही अनपेक्षिताबद्दलची हौस प्रदर्शित करण्याचा तिचा सतत प्रयत्न असे. मॉन्तेस्क्युईउ हा तिचा 'कझिन'. एकदा त्यानं तिच्या घड्याळाची स्तुती केली होती. तिनं त्याला लागलीच आश्वासन दिलं होतं की आपल्या मृत्यूपत्रात ती त्याला देऊन

टाकील. परंतु तेवढाही धीर तिला धरवला नव्हता. दुसऱ्याच दिवशी तिनं ते घड्याळ त्याच्याकडे पाठवून दिलं होतं. त्यासोबत पाठवलेल्या चिठ्ठीत लिहिलं होतं, 'ते सांभाळणं आता मला अशक्य आहे. कारण ते मला आठवण करून देते की मी मेलंच पाहिजे.'

एवढ्या विलोभनीय व्यक्तीला भेटण्याची उत्सुकता प्रूस्तता नसती तरच नवल ! तिची भेट घडवून आणावी म्हणून तो मॉन्तेस्क्युइउला आडवळणानं सुचवत होता. परंतु त्याच्या सूचना दुर्लक्षिल्या जात होत्या. तेव्हा एक धूर्त खेळी तो खेळला. त्यानं एका पत्रात गुरूला लिहिलं की प्रिन्सेस्स द वाग्रामकडे त्यानं तिला पाहिलं होतं. तिची केशरचना तेव्हा अगदी थेट 'पोलिनेशियन' होती, केसात फिक्कट जांभळी आमरी फुलं खोवलेली होती.' तिच्याबद्दल मत देणं मुष्किल आहे यात शंका नाही. कारण मत देणं म्हणजे तुलना करणं; आणि तिच्यामध्ये जे दृष्टीत्पत्तीस येतं ते अन्य कुठल्याही स्त्रियांमध्ये, वा अन्यत्र कुठंही नजरेस पडणार नाही. तिच्या लावण्याचं गूढ, दिप्तीमध्ये आणि विशेषत्वानं तिच्या डोळ्यांच्या रहस्यमयतेमध्ये केंद्रिभूत झाल्यासारखं भासतं. अशी सौंदर्यवती स्त्री मी अद्याप पाहिलेली नाही.' पुढं पुस्ती जोडली की तिची ओळख करून देण्याविषयी विचारणा करण्याइतपत तो काही विवेकशून्य नाही. परंतु आपल्यावर तिनं किती प्रभाव टाकला आहे हे तिला कळवलं गेलं तर आपल्याला आवडेल. समारोप करताना लिहिलं : 'ज्या स्त्रीविषयी तुम्हाला सर्वाधिक कौतुक आहे तिचं कौतुक केल्यानं, मला आशा आहे की मी फार नाखूष केलं नसणार. इत:पर मी कौतुक करीन पण आपल्या मागून, तुमच्या म्हणण्यानुसार' एवढ्या कौशल्यापूर्ण विनंतीकडे काणाडोळा करणं मॉन्तेस्क्युइउला आता अवघडच गेलं. बऱ्याच विलंबानं का होईना, ज्या ओळखीसाठी त्याचा चेला आतुरतेनं वाट पाहात होता तो योग त्यानं जुळवून आणला. त्यांची भेट झाली असेल तेव्हा, शक्यता आहे, त्या थोर बाईसाहेबांनी तिचं गूढ हास्य केलं असेल, काही शब्द बोलण्यासाठी ती रेंगाळली असेल, तिच्या दिवाणखान्यात एखादी भेटही सूचित केली असेल. काहीही असो, प्रूस्त बेहद्द खूष झाला होता एवढं बरीक खरं.

१८९३ चा वसंत आणि ग्रीष्म यांच्या दरम्यान युनिव्हर्सिटीच्या अभ्यासावरून प्रूस्तचं लक्ष उडालं होतं. कायद्याच्या अंतीम अभ्यासक्रमाची त्याची तयारी चालू होती. प्रत्यक्ष व्यावहारिक अनुभव, कायदेविषयक ज्ञान संपादन करत होता. त्यानं बिल्लीला लिहिलं होतं : 'मला वाटतं ऑगस्ट महिन्यात (मी कायद्याच्या परीक्षेत उत्तीर्ण झालो तर) सां मोरतिझला जावं. रॉबेर द मॉन्तेस्क्युइउ आणि मादम हाउलँड यांनी मला तशी जोरदार शिफारस केली आहे. या दोघांनाही तू बहुधा सां मोरतिझला पाहिलं असशील; दोघंही लोभस आहेत. तिथं आणखीन इतर बऱ्याच स्त्रियांशी माझा परिचय होईल, आणि मी जर का गेलो तर ला साल तिथं येईल आणि माझ्यावरोबर रहील.' आदल्या वर्षीच्या उन्हाळ्यात तो ले फ्रेमाँतला ज्या

तरुण पुरुषांबरोबर राहिला होता, त्यात ला साल होता.

प्रूस्त परीक्षा उत्तीर्ण झाला, कायद्याची पदवी त्यानं संपादन केली. सां मोरतिझ आणि लेक जिनिव्हा या ठिकाणी तो महिनाभर राहिला तिथून तो हुव्हीलला गेला. तिथं आईबरोबर पंधरवडाभर राहिला. या काळात व्यवसायासंबंधीचा निर्णय त्यानं एकदाचा काय तो घेऊन टाकावा म्हणून आईनं त्याच्यामागं लकडा लावला. आता निर्णय घेणं प्राप्त होतं. रटाळ, कंटाळवाण्या शक्यता त्यानं वगळल्या आणि ज्या रटाळ नाहीत यावरच लक्ष केंद्रित केलं. त्यानं बिल्लीला सांगितले : 'परदेशी जाण्याचा माझा विचार नाही.' कारण उघड होतं, सोसायटीमधील जीवनाला त्याला वंचित व्हावं लागलं असतं. शिवाय या समाजाच्या लेखी जे पद कमी लेखलं जात असे ते स्वीकारण्याची त्याची तयारी नव्हती. 'मॅजिस्ट्रेटकडेही तुच्छतेनंच पाहिलं जात नाही का?' अशी शंका प्रदर्शित करून आपला मनोदय त्यानं व्यक्त केला की 'कूर द कॉम्प्तचं 'त्याला अधिक आकर्षण आहे. सरकारच्या लेखा-कचेरीत काम करणाऱ्याला समाजात थोडाफार भाव मिळतो हे तो जाणून होता.' माझा विचार येणेप्रमाणं : जर का परदेशात जाऊन नोकरी करण्याची माझी इच्छा नसल्यास, मला पॅरिसमधल्या परराष्ट्रीय कचेरीत वैतागवाणं काम करावं लागेल.' 'कूर द कॉम्प्त'मध्ये काम करणं बहुधा अधिक जिकरीचं ठरेल. पण त्यात समाधानाची बाब एवढीच की माझा त्यात थोडाच वेळ जाईल आणि उरलेल्या वेळात मला जे आवडेल ते मी करू शकेन. आह, माझ्या प्रिय मित्रा, याबाबतीत तुझा सल्ला माझ्यासाठी मौल्यवान आहे आणि तुझ्यागैरहजेरीत मी अतिशय दु:खी आहे. मनामधील संवादाच्या अद्भुताची ताकद असलेल्या एखाद्या झकास पत्रानं त्याची भरपाई होऊ दे. कोर्टाचा बेंच बराच बदनाम आहे नाही? मग उरलं काय, कारण मी निर्णय घेतला आहे की मी वकील होणार नाही, किंवा डॉक्टर, वा पाद्री .....'

घरी परतल्यानंतर बाहेरगावी असलेल्या आपल्या वडलांना पत्र लिहिलं. पत्र दीर्घ होतं आणि चलाखीनं लिहिलेलं होतं. एखादा व्यवसाय निवडण्याची तयारी त्यानं दर्शवली, त्याच बरोबर साहित्यावरील आपली अपार निष्ठाही व्यक्त केली. आणि काही विवक्षित व्यवसायासंबंधी, विशेषत: कायद्यासंबंधी अंगावर शहारे आणल्यागत नापसंती दर्शवली.' मला नेहमीच आशा वाटत आली आहे की अंतीमत: माझा साहित्यविषयक आणि तत्त्वज्ञानविषयक अभ्यास पुढं चालू ठेवण्यास तुम्ही मला अनुमती द्याल आणि मला वाटतं त्यासाठी मी पात्र आहे. परंतु मी पहातोय की दरवर्षी माझ्यावरील व्यावहारिक शिस्तीचा मारा वाढतोच आहे. तुम्ही मला द्याल त्या सुयोग्य व्यवसायांमधून एखादा निवडणं मी तत्काळ पसंत करीन. 'फॉरेन अफेअर्स' किंवा 'लेकॉल डे शार्त' यांच्या परीक्षांसाठी मी कसून अभ्यास करीन- कायद्याच्या बाबतीत म्हणाल तर एखाद्या स्टॉकब्रोकरच्या ऑफिसात जाणं माझ्या लेखी हजारपटीनं बरं. काहीही असो, माझी खातरजमा झालेली आहे की कायद्याला मी तीन दिवसही चिकटून राहू शकणार नाही ! - याचा अर्थ असा नाही की साहित्य आणि

तत्त्वज्ञान याव्यतिरिक्त मी जे काही करेन तेथे कालापव्यय होणार नाही. परंतु बहुसंख्य अमंगलांमध्ये, काही असे असतात जे तरतम भावानं चांगले असतात आणि काही अत्यंत वाईट. माझ्या अगदी हलाखीच्या क्षणीही वकील बनण्याहून अधिक किळसवाणं अन्य काही असू शकेल ही कल्पना करणंही मला अशक्य आहे. जर का वकिलातीनं ते टाळता येण्यासाठी मला सहाय्य केलं, तर तो स्वागतार्ह पर्याय ठरेल, मी निवडलेला व्यवसाय नसला तरी.'

या पत्राच्या अनुषंगानं बहुधा आणखीन काही वाटाघाटी झाल्या असाव्यात आणि अखेरीस सवलती मिळवण्यासाठी आईवडिलांचे मन वळवण्यात प्रूस्त यशस्वी झाला असावा. निदान त्याच्या व्यवसायासंबंधीचा निर्णय, त्याच्या संमतीनं असेल वा नसेलही, बेमुदत पुढं ढकलला गेला. त्यानं आपले जुने शिक्षक दार्लू यांच्या हाताखाली तत्त्वज्ञानाच्या शिक्षणाला सुरुवात केली. कुठल्याही व्यावसायिक प्रशिक्षणाचा प्रयत्न त्यानं केला नाही. परंतु साहित्याबद्दल आपण किती गंभीर आहोत हे आपल्या आईवडिलांच्या निदर्शनास आणून देण्याचे प्रयत्न मात्र केले.

१८९३ च्या मार्चमध्ये 'ला बानक्वेत' बंद पडलं होतं. त्याचे संपादक आणि लेखक यांना 'रव्ह्यू ब्लाश'नं आसरा दिला होता. श्रीमंत पोलिश बंधूंनी हे मासिक १८९१ मध्ये सुरू केलं होतं. व्हेरलेन, मालार्मे, तरुण आन्द्रे जिद यासारख्यांचे लिखाण त्यात प्रसिद्ध होत होते. ऑगस्ट ते डिसेंबर १८९३ या काळात प्रूस्तचं स्फुट लिखाण यात प्रसिद्ध झालं. त्याच्या आधीच्या लिखाणाहून हे लिखाण निश्चितच सरस होतं. त्यात पूर्वीसारखं विचारांना प्राधान्य देण्यात आलं नव्हतं. आता निवेदन आणि व्यक्तिरेखाटन यांच्यावर अधिक लक्ष केंद्रित केलेलं होतं. 'मेलान्कोलिक व्हिजिआतूर द मादम द ब्रेय' मधील नायिकेचा जीव एकदाच भेटलेल्या एका फडतूस उमरावावर जडावतो. पण पुढं तो तिच्या मनातून उतरतो. इथं तिच्या मनातील प्रेमाच्या विकासाचा शोध प्रूस्तनं घेतला आहे. दुसऱ्या एका कथेत आपल्या लैंगिक जीवनाचं सिंहावलोकन करण्यात व्यग्र असणाऱ्या एका वयस्कर कॅप्टनच्या मनाचा मागोवा मौलिक प्रतिमांच्या आधारे घेतला आहे. कॅप्टन आपल्या मोठ्या कपाटाचा खण उघडतो आणि स्वत:विषयीची कागदपत्रं बाहेर काढतो : पत्रं, पोस्टकार्ड, वाळलेली फुलं, ओळखू येणार नाहीत अशी काही फिक्कुटलेली छायाचित्रं संतांच्या पवित्र वस्तूंप्रमाणं त्यांची असंख्य वेळा चुंबनं घेण्यात आल्यानं त्यांची अशी दशा झाली होती. त्याला रडू येतं. कारण इंद्रिय सौख्याचा तो अनुभव आता त्याला घेता येत नव्हता. ज्या स्त्रियांनी त्याच्यावर लोभ केला होता त्यांना काही केल्या तो धडपणे आठवू शकत नव्हता. ते अनुभव होते फुलपाखरांसरखे - त्यांना पकडण्याचा तो प्रयत्न करतो आणि दर खेपेला त्यांच्या नाजूक पंखांना तो दुखवतो. ते आहेत एखाद्या छबीमधील प्रतिमांगत. त्यांना आपल्या बोटांनी स्पष्ट करण्याचा प्रयत्न करताना पृष्ठभाग मळकट केला जातो. परिणामी, त्याचा लोभसपणा

हळूहळू कमी कमी होत जातो, अंती लोप पावतो. अखेरीस तो प्रयत्न सोडून देतो, त्याबाबत यत्किंचितही काळजी करत नाही, आणि इतर पुरुषांप्रमाणंच नंतर मरून जातो.

'आवाँ ल न्यूई' मध्ये एका समलिंगरती स्त्रीचं चित्रण प्रूस्तनं केलं आहे. निवेदकाला तिच्या नैतिक संघर्षात रस आहे. तिचे उद्‌गार तो उद्‌धृत करतो : 'बऱ्याच लोकांना लाल वस्तू लाल दिसतात, म्हणून काही, ज्यांना त्या जांभळ्या दिसतात ते चुकत आहेत असं कुणी म्हणू शकणार नाही.' प्रसंग प्रत्यक्षातील आहे की काल्पनिक, प्रूस्त एका तरुण पुरुषासमोर कबुली देत आहे की एक तरुण पुरुष प्रूस्तसमोर कबुली देत आहे हे सांगणं अवघड असलं तरी इथं स्थानांतर उघड आहे. 'झाँ सान्तेय' आणि 'आ ला रशार्श' या दोन्ही कादंबऱ्यांमध्ये प्रामुख्यानं आलेल्या स्त्रियांच्या समलिंगसंभोगी प्रवृत्तीचा इथं प्रथमतःच उल्लेख केलेला आढळतो.

'रव्ह्यू ब्लाँश' मध्ये लिखाण प्रसिद्ध होत असतानाच प्रूस्तनं ठरवलं की त्याचं आजवर प्रसिद्ध झालेलं लिखाण एकत्र करून ते पुस्तकरूपानं प्रसिद्ध करायचं. १८९३ च्या अखेरपर्यंत आपण ते प्रकाशित करू शकू याबाबत तो निःशंक होता. आपलं पुस्तक एडगर ऑनेर किंवा विली स्मिथ या नुकत्याच दिवंगत झालेल्या मित्रांना अर्पण करावं असा त्याच्या मनात विचार आला. परंतु आपला हा विचार त्यानं बदलला, कारण हे लिखाण इतकं सामान्य होतं, शिवाय त्यांना अर्पण करणं उचितही ठरलं नसतं. 'परंतु, मादम लमेर या पुस्तकासाठी चित्रं रेखाटणार हे निश्चित झालं. त्यानं बिल्लीला तसं लिहिलंही. पुढं पुस्तीजोडली की 'सामान्यतः या पुस्तकाकडे ज्यांनी ढुंकुनही पाहिलं नसतं अशा बऱ्याच साहित्यिकांच्या, कलावंतांच्या आणि मान्यवरांच्या लायब्ररीपर्यंत हे पुस्तक पोचेल, केवळ त्यातील रेखाटनांसाठी.' पत्राच्या शेवटी आशा व्यक्त केली की जर का तो पॅरिसला आला तर व्यवसायानिमित्त योग्य तो सल्ला आपल्याला देईल.

परंतु पुस्तकाचं प्रकाशन आणि प्रूस्त स्वीकारू इच्छित असलेल्या व्यवसायासंबंधीचा निर्णय, दोन्हीही लांबणीवर टाकण्यात आले. दरम्यान त्यानं आपलं लक्ष एका नव्या प्रकल्पावर केंद्रित केलं. त्यानं ठरवलं, समीक्षात्मक लेखमालिका लिहायची. प्रारंभ करायचा अर्थात् मॉन्तेस्क्युइउ वरील लेखानं. आपल्या या नामवंत मित्राला त्यानं सांगितलं, 'आपल्यासारख्या कृपावंतानं जर का मला मदत केली तर मी दाखवून देईन की आमच्या काळच्या सर्वसाधारण अवनतीहून तुम्ही किती भिन्न आहात, तुमची इच्छाशक्ती किती कणखर आहे आणि तुमची बुद्धिमत्ता किती समृद्ध आहे, जी तुम्ही सतराव्या शतकाकडून वारसा हक्कानं प्राप्त केली आहे.' कवींनं मान्यता दिली. प्रूस्तनं लेख लिहिला. परंतु, तो प्रसिद्ध होण्यात नाना विघ्नं आली. 'ल रव्ह्यू द पारी' सुरू करण्याच्या व्यापात गुंतलेला प्रूस्तचा स्नेही लुई गानदेरा यानं तो स्वीकारण्यास पत्र इतरांकडे त्याची शिफारस करण्यास नकार दिला. 'रव्ह्यू ब्लाश'नं तो स्वीकारला पण छापणं लांबवत अखेर तो नाकारला. इतर

वृत्तपत्रांच्या संपादकांना त्यात निश्चितच स्वारस्य नव्हतं. अखेर तो कमनशिबी लेख त्यानं मॉन्तेस्क्युइउच्या हवाली केला आणि त्याला विनंती केली की शक्य असेल तर त्यांनीच तो कुठंतरी छापून आणावा. लिहिलं, हा शेवटचा प्रयत्न जर अयशस्वी झाला तर सुरुवातीला मी जे बहुधा केलं असतं ते शेवटी करीन : माझा स्वत:चा पेपर सुरू करीन.' हे लिहिणं सोपं होतं, प्रत्यक्षात आणणं अवघड होतं. परिणामी हा नवीन संकल्प रेंगाळला आणि इतर समीक्षात्मक लेख लिहिले गेले नाहीत.

छापील स्वरूपात मॉन्तेस्क्युइउची स्तुती करण्याचा त्याचा प्रयत्न असफल झाला तरी १८९४ च्या प्रारंभी ज्याला स्पॉन्सर करणं त्याच्या या पेट्रनला आवडलं असतं असा एक नवीन आणि नेमका प्रतिभावंत त्याच्यापुढं सादर करण्यात तो यशस्वी झाला. हा प्रतिभावंत म्हणजे पियानोवादक लेऑं द लाफोस्स. एक महत्त्वाकांक्षी तरुण. 'कॉन्सर्ट परफॉरमर' म्हणून स्वत:ला सुप्रतिष्ठित करण्यासाठी त्याची धडपड चालू होती, आपलं नाव होईल अशी प्रसिद्धी मिळावी याची ओढ त्याला लागली होती. 'ले शोव्ह सूरीस' मधील काही कविता त्यानं स्वरबद्ध केल्या होत्या. प्रूस्तनं त्या ऐकल्या आणि त्याची शिफारस त्यानं मॉन्तेस्क्युइउपाशी केली; त्याची संमती मिळवली आणि त्याच्या महाली दलाफोस्सला घेऊन गेला. सुरुवातीला कवी थंडा थंडाच राहिला, कारण पियानो वादकाच्या दर्शनानं त्याला शिसारी आली होती. 'त्याचा आवाज म्हणजे कॅब अंगावरून गेलेल्या मांजरासारखा.' परंतु त्या तरुणाच्या अतुलनीय वादनावर तो फिदा झाला. त्याची खात्री झाली की हा कार्यक्रम म्हणजे 'प्रॅक्टिकल जोक' नव्हता तर आपल्या प्रतिभेला वाहिलेली आदरांजली होती. पियानो समोर बसलेल्या संगीतकाराचं एका विलक्षण देखण्या व्यक्तीत रूपांतर झाल्याचा भास त्याला वादन ऐकताना झाला असावा. त्याच्या प्रतिक्रियांबद्दल नाहक संशय घेण्याचं कारण नाही, कारण तरुण पुरुषांमध्ये त्याला स्वारस्य असायचं हे खरं असलं तरी या प्रतिभावंतामधील स्वारस्य वेगळ्या प्रकारचं होतं, ते विकारवश नव्हतं. शिवाय आधीच गाब्रिएल डीयुरी या दक्षिण अमेरिकन तरुणाशी त्याची सलगी जुळून आली होती. बारौं डोआसां या कुविख्यात समलिंगरतीपासून त्यानं त्याला पळवून आणला होता.

दलाफोस्स आणि मॉन्तेस्क्युइउ यांच्यामध्ये जुळून आलेल्या नात्याचं नेमकं स्वरूप काहीही असो. एका अतुलनीय संगीतकाराचा शोध लागला असल्याची त्याची खात्री झाली होती आणि हा शोध प्रूस्तमुळे लागला. यासाठी तो त्याचाही कृतज्ञ होता. स्वत:ला शक्य होईल तेवढ्या त्वरेनं तो आता संगीतकाराच्या हाकेला ओ देत होता, तो सराव करत असताना त्याच्या शेजारी बसत होता, त्याच्या कामात सहभागी होत होता. 'आ ला रशार्थ' मधील चार्ल्स मोरेल हा बव्हंशी द ला फोस्सवर बेतलेला असला तरी मोरेल चार्लसच्या क्लेशाला आणि नैतिक अध:पतनाला कारणीभूत झाल्याचं त्यात दाखवलं गेलं आहे ते मात्र बारौंडी आसां आणि त्याचा पोलिश व्हायोलिन वादक यांच्या संबंधावरून.



अनुक्रमणिका

मॉन्तेस्क्युइउ भपकेबाज सार्वजनिक प्रयोगाद्वारे द ला फोस्सला अभिजनांसमोर सादर करण्याच्या तयारीला लागला. नामवंतांना निमंत्रणं रवाना झाली. ३० मे १८९४ रोजी त्यांनी व्हर्साइलमध्ये गर्दी केली. बऱ्याच वर्षात नामवंतांचा असा मेळावा तिथं झाला नव्हता. कवीरायाच्या बागेतील थिएटरमध्ये दाटीवाटी झाली. अशा खास समारंभासाठीच ते बांधण्यात आलं होतं. आज 'थिआत्र एफेमेर' हे त्याचं नाव सार्थ ठरलं होतं. प्रूस्त गर्दीतून फिरत होता, पाव्हण्यांची नावं टिपत होता, गाऊनच्या नोंदी करत होता, 'ल गोलोई'साठी तपशीलवार वृत्तांत देण्याच्या पूर्व तयारीत व्यग्र होता. कार्यक्रम बराच वेळ चालला. त्यात विविधताही होती. यात्र निबोरनं स्वत:च्या सागर-कविता वाचल्या. बेर्नहार्ड, बार्ते आणि रिशेनबर्ग या पॅरिसच्या रंगभूमीवरील प्रख्यात नट्यांनी कवितांचे वाचन केले. शिवाय तिघींनी मिळून आन्द्रे शेनिअर याची व्हर्साइलवरील उद्देशिका म्हटली. परंतु यजमानाच्या लेखी त्या दो-प्रहरीचा उत्कर्ष बिंदू होत, लक्षणीय अशा एका नव्या प्रतिभावंताचं पदार्पण. त्याने संगीतकाराचा परिचय करून दिल्यानंतर बाख, चॉपिन आणि रुबिन्स्टाइन यांनी द ला फोस्सनं सुरुवात केली आणि नंतर 'ले शोव्ह सूरीस' मधील गीतं गाणाऱ्या एका सोसायटी गायकाला साथ केली. लिझ्तनं समारंभाची सांगता केली 'इन्ट्रोडक्शन' पूर्णपणे समाधानकारक झाली हे नि:संशय.

हा समारंभ म्हणजे प्रूस्तच्या तारुण्यातील निर्णायक घटनांमधील एक दिवस होता. अखेरीस बऱ्याच ख्यातनाम यजमानीणींना तो भेटला होता. विशेष म्हणजे त्यात 'डचेस्स आणि प्रिन्सेस्स द गॅर्मांत' या दोघींचीही वैशिष्ट्यं पुरवणारी स्त्रीही होती. दुसऱ्या दिवशी ब्रेकफास्ट करता करता आपलं सौंदर्य आणि आपला पेहराव यावरील प्रशंसापट वृत्तांत त्या वाचणार होत्या; लौकरच ९ बुलव्हा द गालशेर्ब येथील डायनिंग रूममधील आरशाला त्यांच्याकडून आलेली निमंत्रणं डकवली जाणार होती आणि आपला दणकेबाज दोस्त आणि प्रायोजक यांच्या ताज्या समलिंगरती संबंधाला मूक आदरांजली वाहण्यासही त्यांना एकत्रित आलेलं त्यानं पाहिलं होतं. पुढील काही महिन्यात प्रूस्त 'गॅर्मांत मार्गां'च्या शिखरावर पोचणार होता आणि तिथून 'सोदॉम एक गॉमॉर'च्या दरीत उतरणार होता.

प्रस्तुत समारंभ यशस्वीरित्या पार पडला. तथापि, इथंच मॉन्तेस्क्युइउची भलाइकी संपुष्टात आली नाही. त्यानं राजधानीतील सॅलाँमधून आणि संगीत हॉलमधून द ला फोस्सला प्रेक्षकांसमोर आणला. त्याला मार्गदर्शनपर सल्ले दिले, त्याची शैली परिपूर्ण व्हावी यासाठी स्वत: खपला, आपल्या एका गीतामध्ये त्याचा गौरव केला. परंतु प्रसिद्धीची हवा द ला फोस्सच्या डोक्यात शिरली. आपण सर्वस्वी स्व-कर्तृत्वावर हे यश संपादन केलं आहे अशा मिजाशीत तो वावरू लागला. आपल्या उपकारकर्त्याबद्दलही त्याला कृतज्ञता वाटेनाशी झाली आणि त्या दोघांचे संबंध तुटू लागले. परंतु कवीनं शक्य होईल तेवढी चालढकल केली, स्वत:ला सावरलं, परंतु अखेर असह्य झाल्यानं संबंध कायमचे तोडून टाकले आणि भाकीत



अनुक्रमणिका

वर्तवलं की एका प्रतिभावंताच्या मार्गदर्शनाला मुकल्यामुळं द ला फोस्सची प्रगती सुमारच राहील. (वस्तुतः पाव शतकं एक यशस्वी पियानोवादक म्हणून तो नावाजला जात होता.)

दरम्यान प्रूस्त स्वतःच संकटात सापडला. मॉन्तेस्क्युइउच्या लक्षात आलं की आपला हा चेलासुद्धा कृतघ्नच निपजला. पूर्वीसारखा तो पूर्णपणे एकनिष्ठ राहिलेला नाही. आश्रयदाता सांगेल ते प्रमाण मानण्याची त्याची वृत्ती आणि गुरुविषयीचा आदर लोप पावले आहेत. गुरुचं कौतुक आणि त्याच्या लकबी आत्मसात करण्याची त्याची इच्छा उरलेली नाही. उलट त्याच्या लकबींच्या नकला करून आपल्या मित्रांची करमणूक करण्यात आता तो दंग आहे- त्याचं हात हलवणं, पायानं ताल धरणं, आपली काळी दंतपक्ती लपवण्यासाठी तोंडावर हात धरून हसणं आणि काल्पनिक शिष्यांची हकालपट्टी करतेसमयीचं किंचाळणं. प्रूस्तचा हा कार्यक्रम एवढा प्रसिद्धी पावला की त्याची वार्ता सर्वत्र पसरली, थेट मॉन्तेस्क्युइउच्या कानापर्यंत पोचली. तो रागानं खवळला. प्रूस्तला अद्दल घडवण्याची धमकीही त्यानं बहुधा दिली असावी. खरं खोटं काय असेल ते असो, त्यानं प्रूस्तकडून खुलाशाची मागणी केली. प्रूस्तसमोर बाका प्रसंग उद्‌भवला. टोलवाटोलवीची उत्तरं देणं आता भाग होतं. त्यानं मान्य केलं की मन अजाणता देहावर प्रभाव पाडत असल्यानं शक्यता आहे, क्वचित प्रसंगी त्यानं त्याचा आवाज काढला असेल. पण यात त्याच्यावर निष्ठूरपणे प्रहार करण्याचा विचार आपल्या मनात निश्चितच नसल्याचा दावा केला. लिहिलं, 'तुमच्या मित्रांनी जर का तुम्हाला काही अधिक उणं सांगितलं असेल, व्यंगाचं प्रदर्शन केल्याचं जर का ते म्हणाले असतील तर मी तुमचे नीतिवचन समर्थनार्थ वापरतो. "पुनः पुन्हा उच्चारलेला शब्द कधीच खरा नसतो." माझी सद्‌सद्‌विवेकबुद्धी इतर बाबींनी बऱ्याचदा गढुळलेली असली, तरी तुमच्या बाबतीत ती अगदी साफ आहे. मी इतरांसमोर तुमच्याविषयीचा माझा आदरभाव व्यक्त करत आलो आहे. यँक गॉड, तो अगदी अबाधित आहे.'

त्याचा खुलासा विश्वासार्ह ठरला असता, पण दुर्दैवानं अशी एक घटना घडली, तिच्यामुळं त्या खुलाशावर बोळा फिरवला. घडलं जे असं : प्रूस्तला कैकदा फिदीफिदी खिदळण्याचे झटके येत. त्याच्या विनोदबुद्धीवर निहायत फिदा असलेल्या त्याच्या मित्रांच्या कोंडाळ्यात त्याच्या कोट्यांना उधाण येई. वारंवार सांगितल्यानं नीरस बनलेल्या विनोदी आख्यायिकाही तो अशा काही खुलवून सांगत असे की त्याचे स्नेही मनमुराद हसून त्याला दाद देत. मॉन्तेस्क्युइउच्या उपस्थितीत स्वतःवर ताबा ठेवणं आपल्याला नेहमीच शक्य होणार नाही याची जाणीव त्याला होती. एका कार्यक्रमाच्या वेळी तो आपल्याला भेटणार हे त्याला ठाऊक होतं. यावेळी आपल्या हातून एखादी गफलत झाल्यास आपल्या आश्रयदात्याची मर्जी खफा व्हायला नको म्हणून त्याच्यापाशी जाऊन आपली बाजू स्पष्ट करण्याची व आगाऊ माफी मागण्याची खबरदारी त्यानं घेतली. संध्याकाळी प्रूस्तनं आपल्या तरुण मित्राबरोबर दालनात प्रवेश केला, दोघंही कवीला सामोरे गेले तेव्हा तो चिंताग्रस्त आणि साशंक

असल्याचं त्यांना आढळून आलं. संभाव्य अरिष्टाला तोंड देण्यासाठी पूर्वतयारीनिशी तो बसला असल्याचं त्यांच्या ध्यानी आलं. तेवढं निमित्त त्यांच्या खिदखिदण्याला पुरेसं झालं. त्यांनी एकमेकांकडे पाहिलं, एकमेकांच्या डोळ्यात उतरलेला अंतस्थ भाव हेरला आणि त्यांचा संयम सुटला. खबरदारी म्हणून ते घाईघाईनं 'बुफे'च्या आडोशाला गेले आणि उन्माद चढल्यासारखे हसू लागले आणि ते हसणं कानी पडताच कवीराज तडकाफडकी बाहेर पडले.

प्रूस्तचं हे हास्यप्रदर्शन खचितच लज्जास्पद होतं. परंतु द ला फोस्सचं नशीब त्याच्या वाट्याला आलं नाही हे त्याचं सुदैव. तो बचावला याचं मुख्य कारण या घटनेनंतर तो अतिशय दिलगीर बनला. त्यानं ठरवून टाकलं की इत:पर कवीनं केलेले अपमान निमूट सहन करायचे. त्याचा राग मानायचा नाही. तो त्याला भेटत राहिला, त्याच्यावर स्तुति सुमनांची बरसात करत राहिला, त्याची नक्कल करत राहिला आणि त्याचा तऱ्हेवाईकपणा बारकाईनं अभ्यासत राहिला. त्यानं त्याच्यामध्ये पाहिला एक नमुनेदार खानदानी माणूस : त्याचं घराणं आणि त्याचा वर्ग यांच्या परंपरांनी घडवलेला, आनुवंशिक प्रेरकतेनं दुऱ्या युगाचा सुसंस्कृतपणा आणि उर्मटपणा प्रदर्शित करणारा; याशिवाय त्यानं त्याच्यामध्ये पाहिला एक मासलेवाईक समलिंगरती; ज्याच्याविषयी आशा बाळगता येणार नाहीत असा एक 'न्युरॉटिक', परस्पर विरोधी प्रेरणांनी दुभंगलेला एक पुरुष, ज्या प्रेरणा तो निवारू शकत नव्हता वा आवरू शकत नव्हता या दोन्ही 'नमुन्यां'मध्ये प्रूस्तला भारी स्वारस्य आणि पुढं हे दोन्हीही तो बारां द चार्लसमध्ये एकत्र आणणार होता आणि हा बॅरन मॉन्तेस्क्युइउची स्मृती जागी ठेवणार होता.

**पाच**

द ला फोस्ससाठी मॉन्तेस्क्युइउनं पार्टी आयोजित केली होती त्यावेळी प्रूस्तचं वय होतं ते वीस. हाडकुळा, फिकुटलेला एक तरुण. डोळ्याभोवती वर्तुळं. आणि भरदार मिशा. त्यांना पीळ भरून त्यांची टोकं प्रयत्नपूर्वक वर करूनही खाली झुकलेल्या. बदलत्या भाववृत्तीनुसार बदलणारे त्याच्या चेहऱ्यावरचे भाव. खिदखिदण्याचे झटके येणारा एक तरुण. बऱ्याचदा तो अगदी अनोळख्या व्यक्तीसारखा भासायचा. बराच विचार करणारी एक अंतर्मुख व्यक्ती. प्रूस्त तसा होता खरा. बऱ्याच गोष्टींचा तो विचार करत असे : हळूहळू खालावत चाललेली त्याची प्रकृती, वाटायचं कायमचं अपंगत्व येण्याचा धोका आहे. तो विचार करायचा, स्वत:च्या लैंगिक जीवनाविषयी, जे चोरटं आणि धोकादायक होतं. तो विचार करायचा स्वत:च्या करीयरचा. वस्तुत: तिचा प्रारंभही झालेला नव्हता. तो पैसे कमावत नव्हता आणि नावही त्याला कमावता आलं नव्हतं. आपल्या पहिल्या पुस्तकाचा घोळही त्याला निस्तरता येत नव्हते. अडथळे येत होते पण त्याला जबाबदार, होता तो स्वत:च, त्यावर मात करणं तसं सोपं नव्हतं.

१८९३ च्या शरदात त्याला आशा वाटत होती की वर्षअखेर आपलं पुस्तक तयार होईल. पण वर्ष उलटलं तरी चिन्हे दिसत नव्हती. त्या संग्रहासाठी त्यानं आणखीन एक कथा लिहिली होती, पुस्तकातील रेखाटनांच्या अनुषंगानं मादम लमेरसमवेत काम केलं होतं, कच्च्या स्वरूपात अर्पणपत्रिका तयार केल्या होत्या आणि कथा कुणा कुणाला अर्पण करायची त्या आपल्या मित्रांची निवडही झाली होती. हे काम तसं जिकीरीचं होतं. मॉन्तेस्कुईउला एक कथा अर्पण करण्याचं निश्चित होतं. परंतु चित्रकार एमिल ब्लांशलाही एक कथा अर्पण करण्याची त्याची इच्छा होती. या चित्रकाराशी कवीरायाची कट्टर दुष्मनी होती. साहजिकच त्याचं नाव दिसताच कवीराय हंगामा करणार हे ठरलेलं होतं. परंतु संग्रहाचं काम गोगलगाईच्या गतीनं पुढं सरकत असल्यानं आजचं मरण उद्यावर ढकललं गेलं होतं.

परिस्थिती तशी नाऊमेद करणारी. यातून दिलासा कसा आणि कुठं मिळेल? प्रूस्तनं आपला मोर्चा सोसायटीकडे वळवला. इथं काही तरी काम केल्याचं, साध्य केल्याचं समाधान त्याला मिळत असे. काही तासांपुरती का होईना! आयुष्याच्या अटळ निरर्थकतेचा विसर पडण्यास ती सहाय्यभूत ठरत होती. परंतु कायमचं विसरून जाणाऱ्यांपैकी तो नव्हता. ३ जानेवारी १८९५ ला मॉन्तेस्क्युइउला पाठवलेल्या पत्रात त्यानं लिहिले होतं, दोन वर्षांपूर्वी आणि गेल्या वर्षीही, नवीन वर्षदिनी, माझ्यासाठी आणि इतरांसाठीही, कुठल्याही गोष्टीची अपेक्षा करणं मी सोडून दिलं आहे. माझी अशी भावना झालेली आहे की वर्षं बदलली तरी माणसं बदलत नाहीत आणि आपल्या इच्छांना स्वप्नं रंगवण्यास प्रवृत्त करणारा भविष्यकाळ म्हणजे गतकाळाचा केवळ विस्तार, जो बदललेला पाहण्यासाठी आपण किती उत्सुक असतो, पण आपण ऐकतो पूर्वी आम्ही स्वतःच बडवलेल्या मंगल आणि अमंगल घंटांचे एकसुरी गजर.' पुढं तो असंही म्हणाला होता की चालू वर्षी तो अधिक आशा बाळगून आहे, परंतु त्याचा आशावाद सरड्याच्या रंगाप्रमाणं तीन दिवसच टिकतो.

आपण काहीतरी करत आहोत ही भावना सोसायटी त्याच्या मनामध्ये रुजवत होती, त्याच्या बुद्धिमत्तेला वाव देत होती ज्यावर काम करावं असं साहित्य त्याच्या मनाला पुरवत होती; पुस्तकांमधील साहित्याहून अधिक ताजं टवटवीत आणि व्यक्तिगत असं इथं तो मनमुराद अवलोकन करू शकत होता. त्याच्या नजरेनं जे जे टिपलं होतं त्याचं विश्लेषण तो करू शकत होता. त्याच्या काळाचा एक सामाजिक इतिहासकार बनण्याची अप्रत्यक्षरित्या त्याची तयारी चालू होती. अंतीमतः त्याचं काम हेच असेल याची पुसटतीही कल्पना यावेळी त्याला असणं अर्थातच शक्य नव्हतं. स्वारस्य वाटावा असा एखादा चेहरा दृष्टीला पडला, किंवा एखाद्या यजमानिणीच्या कृपाप्रसादाचा लाभ झाला, किंवा एखाद्या नव्या 'केस हिस्टरी'ची घटितं एकत्र जुळवता आली, किंवा सामाजिक वर्तणुकीसंबंधी एखादा लक्षणीय असा नवा व्यापक नियम गवसला की त्याच्या लेखी ती पार्टी यशस्वी ठरायची. त्याच्यासमोर सतत चेहरे झळकत

त्याच्या स्मृतिपटलावर ठसठशीत ठसे उमटवणारे, त्याच्या कादंबऱ्यांच्या वेगवेगळ्या खंडांमध्ये खऱ्या वा काल्पनिक नावानं एक दिवस जे दृष्टीला पडणार होते असे चेहरे.

काही चेहरे त्यानं पाहिले होते, गेली काही वर्षं त्यानं भेटी दिलेल्या दिवाणखान्यात, काही अलिकडच्या काळातील दिवाणखान्यात– उदाहरणार्थ मादम ऑबेरनॉन द नेरव्हिलचा दिवाणखाना. समस्त मध्यमवर्गीय यजमानीणींमध्ये मादम ऑबेरनॉन ही सर्वात प्रभावी, धाक वाटावा अशी बुद्धिमान बाई. भोजनसमयी अतिशय गंभीर चर्चेला ती प्रारंभ करायची. व्यक्तिगत संभाषणाचा आवाज बंद करण्यासाठी आपल्या शेजारी ती घंटी ठेवायची. तिच्या टेबलाभोवतीच्या चेहऱ्यांमध्ये दोन चेहरे प्रूस्तला खास करून स्वास्थ्यपूर्ण वाटले होते. त्यापैकी एक होता व्हिक्टर बोचार्ड याचा. अतिशय बुद्धिमान पण कींव करावी असा माणूस. सॉरबॉन-मध्ये प्राध्यापक आणि ग्रीक संशयवाद्यांवरील एका लक्षवेधी पुस्तकाचा लेखक. त्याच्या हालचाली बेभरवशाच्या आणि झटक्यागत, दृष्टी अतिशय अधू जवळजवळ आंधळाच. डाव्या डोळ्यामधून गळणाऱ्या पाण्यानं झाकोळलेला चष्मा नाकावर. दुसरा चेहरा. बारॉं डोआसॉं याचा. ऑबेरनॉनचा 'कझिन' मॉन्तेस्क्युइउचा कट्टर प्रतिस्पर्धी ईतूरीचा पोट्ट्या कविरायानं पळवल्यामुळं त्यांची दुष्मनी होती. बारॉं उंचापुरा. मिशा कलप केलेल्या. पण अंगी पुरुषी खुमखुमी. तरुणपणी एका देखण्या तरुण व्हायोलिन वादकाची मर्जी सांभाळण्यासाठी त्यांन आपली दौलत उधळली होती असं सांगतात. या कृतघ्न माणसासाठी थिएटरमधील बॉक्स त्यानं गुलाबांनी आच्छादलेलं होतं. सांप्रत, ऑबेरनॉनच्या औदार्यावर तो जगत होता. त्याच्या समोर तिनं पसरलेल्या बौद्धिक श्रीमंतीची मजा लुटत होता. पोट्ट्यांचा पौकिन. चारचौघांमध्ये समलिंगरतीविषयी तो अविरत बडबडायचा. भीडभाड न बाळगता. त्याची टीकाटिप्पणी जहरी. इतर पाव्हणे म्हणायचे, हा पठ्ठ्या न येईल तर बरा. परंतु ढळवता न येणारा तो 'पवित्र हैवान' होता. क्वचित प्रसंगी त्याच्यात सुधारणा घडवून आणण्याचे प्रयत्न केले जात. समजुतीच्या चार गोष्टी त्याला सांगण्याची कामगिरी एकदा प्राध्यापक बोचार्डवर सोपवण्यात आली. तो म्हणाला, 'हे बघ, जी पत तू घालवून बसला आहेस ती तू पुन्हा मिळवू शकशील. शत्रू बनवण्यास तू जेवढा तत्पर असतोस तेवढीच तत्परता तू त्यांच्याशी चांगलं वागण्यात दाखवलीस तर तुझी भयानक भाषा आणि *इतर सारं काही,* लोकं लौकरच विसरूनही जातील.' प्राध्यापक महाशयाचं सर्व बोलणं त्यानं निमूट ऐकून घेतलं आणि नंतर एवढंच म्हणाला, 'त्याला इलाज नाही. माझ्या मित्रांपेक्षा माझे दुर्गुण मी अधिक पसंत करतो.' पार्टीला जमलेल्या तरुण पोरांना डोळे घालणे त्या त्याचा छंदात कधी खंड पडला नव्हता. या पोरांमधील प्रूस्तही त्याच्या अनुभवी नजरेनं हेरला होता. पण तो आपल्यासारखाच 'ॲक्टिव्ह' समलिंगरती असणार हे सुद्धा त्यानं अचूक हेरलं होतं. तो गळाला लागणं संभवनीय होते. तो होता एक संभाव्य प्रतिस्पर्धी, किंवा विश्वासघातकीही. म्हणूनच पार्टीला येण्यापासून त्याला मज्जाव करावा म्हणून तो सतत मादम ऑबेरनॉनला सांगायचा. अर्थात् तिनं त्याच्या सांगण्याकडे दुर्लक्ष केलं होतं.

खानदानी सोसायटीमधील चेहरे वेगळे असत पण स्वाभाविकपणे आवडतील असे ते बहुधा नसत. प्रूस्तसारख्या तरुण शिष्टमन्यांना ते स्वारस्यपूर्ण वाटत. शिष्टमन्य म्हणजे 'स्नॉब' असे तरुण त्यांच्यामध्ये पाहात, खानदानी घराण्यांचे दुवे, गतकालीन पोर्ट्रेटमध्ये पाहिलेल्या रूपाचे नवे अवतार. कॉम्प्त द बोनी हुस्सोनव्हिल, कॉम्प्त लुई द तुरेन्न, राजपुत्र एडमॉन्ड द पोलिग्नाक यांचे चेहरे असे होते. यात आणखीन ही एक लक्षवेधी चेहरा होता, कॉम्प्त बोनी द कास्टेल्लान याचा. १८९५ च्या वसंतात मादम सेमिनारिओनं आयोजलेल्या नृत्यसमारंभात प्रूस्तनं त्याला प्रथम पाहिलं होतं आणि हां हां म्हणता प्रूस्तच्या जगावर त्यानं आपला ठसा उमटवला होता. ही व्यक्ती म्हणजे खानदानी घराण्याची एक परिपूर्ण निर्मिती होती. त्याचा चेहरामोहरा आणि रुबाब अस्सल खानदानी. वागण्यात एकाच वेळी मोहक विनम्रता आणि बिनधास्त औधत्य. त्या काळातील अत्यंत प्रसिद्ध 'डॅन्डी' प्रिन्स्स द सागाँचा हा मान्यता प्राप्त वारसदार. वर्तमानकालीन सवंगपणा आणि व्यापारीकरण यांची त्याला आत्यंतिक घृणा. यांच्यापासून सुटका करून घेण्यासाठी आणि स्वत:साठी गतकाळाचं सौंदर्य आणि थाटमाट यांची पुनर्निर्मिती करण्यात सांप्रत तो गुंतला होता. या दृष्टीनं त्याच्या बाबतीत महत्त्वपूर्ण असे पाहिले पाऊल त्यानं अलिकडेच उचलले होते. कास्टेल्लान मूळचे गरीब. आणि त्यानं लग्न केलं होतं ते गडगंज संपत्ती असलेल्या जे गुल्डच्या वारसदारणीशी. जे गुल्डनं आपल्या ऐश्वर्याचा पाया घातला होता, उंदराच्या सापळ्याच्या पेटंटनं (असं बोनी समजत होता). ॲन्ना गुल्ड ही काही तशी सुंदर म्हणता येण्याजोगी नव्हती. परंतु ती अत्यंत लावण्यवती असल्यागत बोनीनं तिच्याशी प्रियाराधन केलं होतं. तिच्या खिडकी समोरून तो घोड्यावरून रपेट करायचा, फिकट जांभळ्या रंगाच्या लायलॅक फुलांचे आकर्षक गुच्छ तिला पाठवायचा. पॅरिस सोडून ती न्यूयॉर्कला गेली तेव्हा बोनीनं तडक तिथं धडक मारली हाती. धक्क्यापासून वॉल्डॉर्फ – ॲस्टोरियाला जाण्याएवढेही टॅक्सीचे पैसे त्याच्या खिशात नव्हते. बेचव थाळ्या त्याला खाव्या लागत होत्या. गुल्डच्या महालाची झगमगी सजावट पाहून निर्माण झालेला उद्वेग त्यानं दडपून टाकला होता. एक दिवस त्यानं तिला लग्नाची मागणी घातली होती. तिच्याकडून संमती मिळताच राजेशाही थाटात लग्न पार पडलं होतं. त्यानंतर तरुण वर पॅरिसला परतला होता आणि अठराव्या शतकात प्रवेश करण्यासाठी त्यानं उंबरठ्यावर पाऊल टाकलं होतं. रेनॉल्डची पेंटिंग्ज आणि बुशेरची टॅपेस्ट्री तो विकत घेत होता, त्याच्या दारवानांना किरमिजी पोषाखांनी मढवत होता आणि त्यांच्या केसांवर पावडर फवारत होता. आव्हेन्यू ड्यू बोईवर व्हर्साइल येथील ग्राँ त्रिआनाँच्या तोडीस तोड असा प्रासाद उभारण्यासाठी तो प्रयत्नशील होता. समस्त सोसायटी दिपून गेली होती, तरुण प्रूस्तही दिपून गेला होता. गतकाळात गेलेल्या या 'एक्झायलला' त्यानं प्रथम पाहिला त्याच वेळी त्यानं आपली 'इम्प्रेशन्स' नोंदवून ठेवली नव्हती. परंतु पुढं काही वर्षांनी मार्क्विस द साँ लूपॉब्रे या खानदानी तरुणाची व्यक्तिरेखा निर्माण करते समयी त्यानं या पूर्व स्मृतींना निश्चितच उजाळा दिला होता.

दरम्यान प्रूस्तचं लेखन अगदी गोगलगाईच्या गतीनं पुढं सरकत होतं. परंतु आता कामाला थोडासा दिलचस्प वेग आला होता. याला कारणीभूत झाली होती, प्रूस्त आणि रेनाल्डो हान यांनी मादम लमेर हिच्याकडे एकत्रित घालवलेली संध्याकाळ. हान हा तरुण दक्षिण अमेरिकन संगीतकार. संगीत विद्यापीठामधून तो अद्याप बाहेर पडलेला नसला तरी एव्हाना आपल्या संगीतानं दिवाणखान्यांवर मोहिनी घालत होता. सँलाँमधील श्रोत्यांसाठी खास तयार केलेली त्याची मैफलीची शैली मात्र तद्दन कृत्रिम होती. त्याच्या अनेक हिकमतींपैकी एक : तोंडात सिगारेट ठेवून संभाषण केल्यागत गाणं. गाणं चालू असताना अधूनमधून पोर्टच्या ग्लासमधून घुटका घेण्यासाठी थांबणं किंवा पियानो शेजारील फुलदाणीमधून कार्नेशनचं फूल काढून स्वत:च्या 'बटनहोल' मध्ये खोवणं या त्याच्या अन्य लकबी. सँलाँना उचित अशी काही सुरेख गीतं त्यानं संगीतबद्ध केली होती. कुईपच्या कवितेला जोड म्हणून प्रूसतनं चित्रकारावर लिहिलेल्या अलिकडच्या काळातील कवितांना संगीत साथ स्वरबद्ध केली होती. त्याची 'कॉन्सर्ट' प्रूस्तनं आयोजित केली. त्यासाठी आपल्या कविता त्यानं झकासपैकी छापून घेतल्या. त्यात मॉन्तेस्क्युइउसाठी निमंत्रण अर्थातच होतं. त्यासोबतच्या चिठीत त्यानं कवीला लौकर येण्याची विनंती केली होती. कारण साथसंगत करणारा रिसलेर याला त्याच्या रेजिमेंटमध्ये हजेरी लावण्यासाठी लौकर निघायचे होते. संध्याकाळ होती १८९५ मधल्या २५ मे मधील. हाननं गीतं गायिली, ल बारगीनं बहुधा रिसलेरच्या साथीत चित्रकारावरील कविता म्हटल्या. या समारंभाचा वृत्तांत देताना 'ल फिग्युरो'नं हानची स्तुती केली पण प्रूस्तचा उल्लेखही केला नाही. तथापि, या अनुल्लेखाची भरपाई 'ल गुलोई'नं केली. वा कवी या शब्दात त्याचं वर्णन केलं. एवढंच नव्हे तर पाठोपाठ कवितेची कडवीही छापली.

आपल्या जुन्या मित्रांवर जसा प्रूस्त फिदा असे तसाच, किंबहुना त्याहूनही अधिक तो हानवर फिदा झाला होता. त्यानं त्याला एकदा लिहिलंही होतं, निश्चितच प्रामाणिकपणे, ममाचा अपवाद वगळता, अवघ्या जगात ज्यांच्यावर माझं प्रेम आहे, त्यात तू आहेस, खरोखरीच, सत्याला स्मरून. या दोघांमध्ये बऱ्याच गोष्टी समान होत्या. सततचा अवखळपणा, लहान मुलांना साजेशी तऱ्हेवाईक विनोदबुद्धी, शब्दांचा विक्षिप्त उच्चार, एकमेकांना काल्पनिक नावं देणं, तीही वारंवार बदलणारी. हानचा पत्रांमध्ये उल्लेख होत असे. 'जॉन्व्सील' वा 'इम्पुलस' वा 'हिबूलस', 'बूनीन्यूल्स' वा असे अगणित. प्रूस्तचेही उल्लेख असेच विविध : 'पोनी' वा 'बुल्स', वा 'बिनक्त' वा 'बुत्रश' इ. दोघंही एकाच यजमानिणीला भेटायला जात, दोघंही तेच सिनेमा पाहायचे, पुस्तकंही तीच वाचायचे. संगीतामध्ये मात्र हान गुरू होता. क्वचित प्रसंगी प्रूस्त त्याला गुरू म्हणून संबोधत असे– तथापि, त्यांच्यामध्ये मतभिन्नताही होती. खास करून संगीताबाबत. दोघं एकत्र असले की हान पियानोवर वा व्हायोलिनवर 'दि' मिनोर' सोनाट्याचं प्रतिलेखन आवडीनं वाजवून दाखवत असे. हान संध्याकाळी घरी आला की प्रूस्त त्याला आवर्जून सांगायचा, 'माझं ते आवडतं, खूप

लोकप्रिय गीत माझ्यासाठी वाजव, ठाऊक आहे तुला ते, साँ साएनचं ते 'लिटल फ्रेज' 'ले गुलोई' साठी प्रूस्तनं 'साँ साएन'वर दोनदा लिहिलं होतं, न राहवून.

दरम्यान मार्चमध्ये प्रूस्तनं 'लिसान्स द लेत्र' पदवी संपादन केली होती. त्यासाठी वर्षभर दार्लू यांच्याकडे खाजगीरित्या तो शिकला होता. परीक्षेतील त्याच यशही घवघवीत होतं. तरीही नोकरीबाबत अजूनही अनिश्चितताच होती. त्यामुळं घरचं वातावरण साहजिकच तंग असायचं. अजूनही तो पैशासाठी आईवडलांवरच पूर्णपणे अवलंबून होता; खास करून आईवर. आई कंजूष नसली तरी उधळी नव्हती. प्रूस्तला पैशाची चणचण सदाचीच. त्याचा खर्च अवाजवी नाही याची खातरजमा करून घेतल्याशिवाय त्यानं मागितलेलं पैसे देण्यास आई राजी होत नसे. परिणामी, दोघांमध्ये नित्याची वादावादी. घरातल्या घरात पत्रापत्री, प्रूस्तची पत्रं लहान पोरासारखी भांडखोर, एकदा त्यानं लिहिलं होतं की त्यानं घरापासून दूर राहाणं इष्ट, निदान जेवतानाची वादावादी तरी टळेल. त्याला ठाऊक होतं, आईचा स्वभाव चांगला आहे. कायदा, तत्वज्ञान आणि लॅटिन यांच्या खाजगी शिकवण्यासाठी तिन पाण्यासारखा पैसा खर्च केला होता. त्यामुळे आता लंडन आणि रोम या शहरांना भेटी देण्याची त्याची इच्छा पूर्ण करण्याची तिची तयारी नव्हती. आणि नेमकी हीच गोष्ट विचारात घेण्यास तो राजी नव्हता. सांप्रत तापानं तो अंथरुणावर होता. आपल्या खोलीत तिचं येणं, पैशाबाबत घासाघीस करणं, तो रोखू शकत नव्हता. ती समोर आली की ताप वाढणारच. आधीच त्याच्या आयुष्यात विष कालवलं गेलं आहे, आता निदान त्यात तिनं भर न घातली तर चांगलं. त्यानं सांगितलं, तिनं यावं, त्याच्याशी बोलावं, पण आई मुलाशी बोलते तशी, धनको ऋणकोशी बोलतो तसं निश्चितच नको. परंतु, प्रूस्त जोवर काही कमवत नव्हता, कमवण्याची त्याची तयारीही नव्हती, तोवर ही चिडाचिडी, पत्रापत्री अटळ होती.

जूनमध्ये डॉ. प्रूस्तच्या परराष्ट्रमंत्री असलेल्या एका मित्रानं डॉक्टरला सुचवलं की त्याच्या या साहित्यिक पुत्राला मानवेल असं एक काम आहे. 'माझारिन ग्रंथालया'तील सहाय्यक ग्रंथपालाची नोकरी. नोकरी बिगपगाराची पण त्याच्या लेखनात व्यत्यय न आणणारी. काम तसं तापदायक नव्हतं, कष्टाचं तर निश्चितचं नव्हतं. एक दिवसा आड पाच तासाहून अधिक काम करावं लागणार नव्हतं. २८ जूनला या जागांसाठी तिघांची निवड झाली त्यात प्रूस्त होता. सर्व काही सुरळीत चालू झालं आणि अचानक त्याची बदली 'पब्लिक इन्स्ट्रक्शन'च्या मंत्रालयात करण्यात आली. त्याची प्रकृती नाजूक आहे या सबबीवर या खात्यानं त्यानं कामावर येण्यास हरकत घेतली. प्रूस्तनंही त्यांचीच री ओढली. त्यांच्याहून जोरकसपणे. आपल्याला रजा मिळावी वा राजीनामा द्यावा म्हणून त्यानं तत्काळ अर्ज केला. त्याची ओळख थेट परराष्ट्र मंत्र्यापर्यंत. चार वर्षाची त्याची रजा मंजूर झाली.

नोकरीतून मोकळीक मिळाल्यानंतर प्रूस्तनं बराच प्रवास केला. जुलैमध्ये आईबरोबर तो जर्मनीमधील क्रेडझनाक या गावी गेला. तिथं रॉबेर बिल्ली आणि त्याची पत्नी जॉत्र एक रात्र त्याच्याकडे राहायला आली. बिल्लीचं नुकतंच ४ जूनला लग्न झालं होतं. त्याची बायको

'बँक ऑफ फ्रास'च्या एका वरिष्ठ अधिकाऱ्याची मुलगी. जर्मनीमधील एक उगवता मुत्सद्दी या नात्यानं आपल्याला जे अनुभव आले ते बिल्लीनं प्रूस्तला सांगितले. प्रूस्तनं त्यावर त्याला सुचवलं की आत्ताच त्यानं ते लिहून काढावेत. सांगितलं, 'तुझी बायको वरच्या मजल्यावर जाऊन घेईल विश्रांती.' बिल्ली दुपारभर लिहीत होता. त्याचं लिखाण वाचून प्रूस्त म्हणाला, अप्रतिम आहे, पण एवढी विशेषणं तू वापरायला नाही पाहिजेस. जो विशेषणांचा असाच वापर पुढं सराईतपणे करणार होता त्याचा हा सल्ला. नंतर गेल्या सप्टेंबरमध्ये त्यानं लिहिलेली 'ल मोर्त द बाल्दास्सार सिलवान्द' ही कथा बिल्लीला वाचून दाखवली. बिल्लीनं त्यावर काही आक्षेप घेतले. त्यानुसार दोघांनी मिळून बत्तीच्या उघेडात कथेमध्ये सुधारणा केल्या. पुढं प्रूस्त विषादानं बिल्लीला नेहमी म्हणायचा, 'मी काही लिहिलं तर ते तुला कधीच आवडत नाही.' या भेटीत त्या दोघांचं गॉथिक स्थापत्यशास्त्रावर प्रथमच बोलणं झालं. हा विषय पुढे अनेक वर्ष प्रूस्तच्या अभ्यासाचा आणि आवडीचा विषय होता.

क्रेडझनाक नंतर प्रूस्तनं एक पंधरवडा रेनाल्डो हान आणि त्याची वहीण मारीआ यांच्या संगतीत घालवला. 'साँ जेरमेन– आँ-लाईफ'च्या जंगलातील रेनाल्डोच्या विवाहित बहिणीच्या व्हिलामध्ये ते उतरले होते. इथं त्यानं 'ल मोर्त द बाल्दास्सर सिलवान्छ' वरील परीष्करण पूर्ण केलं. २८ ऑक्टोबरच्या 'रव्ह्यू हव्दोमादेर'च्या अंकात ती छापून आली. 'कवी, गायक आणि संगीतकार रेनोल्डो हान यास' या अर्पणपत्रिके सह. कथेचं मानधन म्हणून १५० फ्रँक्स मिळाले. बेमुदत रजेवरील विनपगारी ग्रंथपालाहून लेखकाची करीयर आर्थिकदृष्ट्याही अधिक किफायतशीर असते हा आईवडिलांबरोबर वाद घालायला उपयुक्त असा एक मुद्दा त्याला आता सापडला.

८ ऑगस्ट रोजी प्रूस्त, हान हे जिगरी दोस्त डिएज येथील मादम मेरच्या व्हिलामध्ये राहायला गेले. महिना संपेपर्यंत राहिले. इथं त्यांनी ब्रिटनीची ट्रिप आखली. परिणामी यजमानीणीचा रोष त्यांनी ओढवून घेतला. आपल्या घरी आलेल्यांनी अन्यत्र जावं हे तिला रुचलं नव्हतं. तरीही त्यांनी आपला बेत अंमलात आणला. ते ब्रिटनीला गेले आणि बेगमइल या खेडेगावात राहिले. ते उतरले होते त्या हॉटेलचं फार्म हाऊसमध्ये रूपांतर करण्यात आलं होतं. मालक होता एक शेतकरी. फेकाफेकी करण्यात पटाईत. पण कुटुंबातील एक असल्यागत त्यानं प्रूस्तला वागणूक दिली. इथल्या एका कोळ्याच्या पोराबरोबर प्रूस्तनं गट्टी जमवली. संध्याकाळचा तो प्रूस्तला नावेतून समुद्रावर फेरफटका करायला घेऊन जाई. यदाकदाचित प्रूस्तला लिहिण्याची उर्मी आली तर नावेत त्यानं शाईची दौतही ठेवलेली असायची. दुपारी रेनाल्डोसंगे वाळूच्या टेकड्याच्या आसऱ्यानं बाल्झाक आणि कार्लाइलचं 'हिरोज अँड हिरो-वरशिप' यांच्या वाचनाचा आनंद प्रूस्त लुटत होता. इथंच त्यांना अलेक्झांडर हॅरिसन हा फ्रॅन्को-अमेरिकन चित्रकार भेटला. 'झाँ सान्तेय' आणि 'आ लाँव्र' या त्याच्या कादंबऱ्यांमध्ये 'सी' आणि 'एल्स्टीर' या नावानं तो पुढं येणार होता. तिथून ते रेव्हिल्लाँला मादम लमेरकडे राहायला गेलं. शरदामधील या भेटीनं 'झाँ सान्तेय' मूलभूत

संविधानक व्यापलेलं आहे. चंद्रप्रकाशातील टेकड्यावरील हिंडणं, डचेस देत असलेलं सुग्रास भोजन, बेडरूमधील शेकोटी, सोसाट्याचं वादळ या घटना प्रत्यक्षात घडलेल्या होत्या. परंतु २२ वर्षीय उंच, प्रेमळ, उत्साही आणि निकोप तरुण पाव्हणीशी प्रूस्तनं शय्यासोबत केली होती की तेही एक 'स्थानांतर' होतं, याविषयी शंका आहे.

गेले अठरा महिने प्रूस्त रेनाल्डो हानमध्ये पूर्णपणे गुंतला होता. आता त्याची नजर दुसऱ्या एका तरुणाकडे वळली होती. आदल्या वर्षी, १८९४ च्या थंडीत प्रूसत प्रथमच आल्फोन्स दोदेला भेटला होता. या भेटीबाबत तिनं आपल्या सोळा वर्षाच्या लुसिआँला सांगितलं होतं, 'मॉन्तेस्कुइऊ इथं होता मार्सेल प्रूस्त नामक एक मोहक तरुण, त्याचं वाचन अफाट आणि वागणं मोहक' लौकरच एका गुरुवारी लुसिआँला प्रूस्तचं त्याच्या घरीच दर्शन झालं. चंद्रागत फिक्कट आणि काळेभोर केस, त्याचं मोठ्ठालं डोकं त्याच्या अरुंद खांद्यावर झुकलेलं, आणि त्याचे टपोरे डोळे, वाटायचं ते एकाच वेळी सारं काही टिपून घेत आहेत, प्रत्यक्षात काहीही न बघता. दुसऱ्या दिवशी त्याची आजी म्हणाली 'आजवरच्या माझ्या आयुष्यात छोट्या मॉसिअ प्रूस्त एवढ्या सुसंस्कृत तरुणाला मी कधी भेटले नव्हते.'

१९२५ च्या शरदात लुसिआँ सतरा वर्षाचा होता आणि आल्बेर फ्लमेन्टबरोबर जूलिअनच्या प्रसिद्ध 'आर्ट स्कूल'मध्ये जात होता. बारीक अंगलटीचा एक दुबळा तरुण. नाक रेखीव आपल्या नाकाचा त्याला भारी गर्व. चार्ली चॅप्लीन छाप छोटी मिशी. बुद्धिमान, लहरी आणि सणकी. उन्माद चढल्यागत त्याचं हसणं आणि रडणं. प्रूस्तनं त्याला चहासाठी आपल्या बेडरूममध्ये एक दिवस आमंत्रण दिलं. त्याला खूष करण्यासाठी नट्या, लेखक, सोसायटीच्या यजमानीणी यांच्या छायाचित्रांचा आल्बम त्याला भेट देऊ केला. मादम हेमनच्या पेटिकोटच्या कपड्यात बाईंड केलेली ग्लाडी हार्वेची मौल्यवान भेटही त्याच्यापुढं केली. कपाळाला आठ्या घालून लुसिआँ म्हणाला, 'छायाचित्रं मला बोअर करतात. आपण बोलूया, मला ते आवडेल.' संभाषणाचे विषय : जूलिअनचा स्टुडियो, त्यांचे आवडते लेखक आणि प्रूस्तची तब्यत ('माझरिन लायब्ररी'त जाणं मला जमतच नाही') आणि मैत्रीचे धागे जुळले गेले. दर दिवशी ते एकमेकांना भेटत. कलादालनांना भेटी देत. चित्रांवर चर्चा करत. आपला मित्र काळजाचा अगदी साधाभोळा असल्याचं लुसिआँला कळून चुकल क्वचित प्रसंगी त्याचा कनवाळूपणा विक्षिप्त असला तरी काळजाला स्पर्श करणारा असे. एकदा लुसिआँनं शाळेतल्या एका मित्राची गोष्ट त्याला ऐकवली. या मित्राला आपल्या गबाळ्या आईची एवढी शरम वाटत असे की शाळेत ती त्याला भेटायला आली असता त्यानं मित्रांना सांगितलं होतं की ती आमच्या घरची मोलकरीण आहे. ही कहाणी ऐकल्यावर प्रूस्तनं हातात आपलं तोंड लपवलं. लुसिआँला वाटलं तो हसत आहे. पण नंतर त्यानं पाहिलं की आपल्या मित्राच्या गालांवरून, अश्रू ओघळत आहेत. पुढं बऱ्याच वर्षानंतर त्यानं लिहिलं', मी ओळखत असलेल्या काही निष्ठूर आणि मग्रूर ख्रिश्चनांपेक्षा मार्सेल प्रूस्त

परमेश्वराला अधिक जवळचा होता. हास्यास्पद गोष्टीची खदखदून खिल्ली उडवणं आणि वारं अंगात संचारल्यागत हसणं ही या दोन्ही मित्रांची खासियत. त्यांच्या या स्वभावामुळं त्यांनी मॉन्तेस्क्युइऊचा रोष एकदा ओढवून घेतला होता. 'मार्सेल प्रूस्तवर त्याचा घातक प्रभाव आहे' असं तो म्हणत असला तरी एक संभाव्य चेला म्हणून तो लुसिआँवर डोळा ठेवून होता. परंतु ते संभवनीय नसल्याचं त्याच्या घ्यानी आलं. एक दिवस त्यानं मादम दोदेला एक सुरेख गुलाबाचं फूल पाठवलं आणि त्या सोबत एक चिठी. 'तुम्ही एक गुलाब आहात, तुमची लेकरं काटे आहेत.' लुसिआँ आणि प्रूसत यांचा स्नेह घन होत गेला आणि रेनाल्डो हान दुरावत गेला.

प्रूस्त आता आपल्या संकल्पित कथासंग्रहाच्या प्रकाशनाच्या कामात गुंतला. प्रकाशन या ना त्या कारणानं रेंगाळत गेलं होतं. 'ल बानक्वेत' आणि 'ल रव्यू ब्लांश' यांमध्ये प्रसिद्ध झालेल्या प्रकाशन योग्य लिखाणांमधून अंतीम निवड त्यानं केली होती, नव्या लिखाणांवर संस्करण करून झालं होतं, कथा ज्यांना अर्पण करायच्या होत्या त्या मित्रांबरोबरच्या वाटाघाटी संपल्या होत्या, मादम लमेरनं काढलेल्या चित्रांवरून अखेरची नजर फिरवली होती. या साऱ्या सोपस्कारानंतर संग्रहाचं 'ले प्लेझिर ए ले जूर' हे नाव, छपाईसाठी वजन असलेला पण लवचिक, काहीसा गुळगुळीत कागद, मुखपृष्ठासाठी हिरवा रंग, मुखपृष्ठावर मादम लमेरची गडद रंगाची आइअरिस फुलं, यावर त्यानं शिक्का मोर्तब केलं. छापखान्या-कडे मुद्रणप्रत देण्याची सिद्धता झाल्यानंतर प्रस्तावनेसाठी त्यानं आनातोल फ्रांसला विनंती केली. असं सांगतात – अर्थात् खात्री लायकरित्या नव्हे– त्या थोर माणसाला नकार द्यायचा होता. ज्याची वाक्य अंत नसल्यासारखी असतात आणि बांधणी तीव्र नापसंती दर्शविण्या इतपत ढिसाळ असते अशा लेखकाला पुरस्कार करण्याचं त्यानं नाकारलं होतं. परंतु मादम द केइल्लावेट्नं त्याल गळ घातली आणि त्याच्या नावे स्वत:च प्रस्तावना लिहिली – छोटीशी आणि पुस्तकाला पूर्णपणे पुरक. एकाच वेळी श्वास रोखून ठेवणारं पण आनंददायी, कल्पक आणि भारदस्त, अशा शब्दांत त्याच्या लिखाणाची भलावण केली. प्रूस्तची तुलना बरनारदिन, द साँ. पीएर आणि भावडा पेत्रोनियस यांच्याशी केली. शैली आपल्या धाटणीची वाटावी म्हणून फ्रांसनं त्यात एखाददुसऱ्या शब्दांची भर घातली, वाक्यरचना इथंतिथं थोडीशी साफसूफ केली. प्रत्यक्षात काय घडलं असेल ते असो या थोर लेखकाच्या नावावर छापून आलेल्या प्रस्तावनेनं पुस्तकाची शान वाढवली. पुस्तक १३ जून १८९६ रोजी प्रकाशित झालं. किंमत साडे तेरा फ्रँक्स. त्या काळात महागडं.

'ले प्लेझिर ए ले जूर' हे प्रूस्तच्या तारुण्यादशेतील लेखन आहे हे लक्षात ठेवूनच तो संग्रह वाचला जायला हवा. पानापानागणिक तेच ते विषय आणि त्याच त्या कल्पना पुन: पुन्हा नजरेसमोर आल्यानं त्याचा अनुभव आणि विचार यांचा प्रथमच आगळावेगळा असा ठसा वाचकांच्या मनावर उमटतो.

पहिल्या प्रथम ठसठशीतपणे ठसा उमटतो : तत्कालिन साहित्यकृतींच्या मानानं प्रूस्तचं

पुस्तक अधिक प्रमाणात आत्मचरित्रात्मक आहे. प्रूस्तची वैशिष्ट्यं त्यातील नायकनायिकांना पुन: पुन्हा बहाल केलेली आढळून येतात. उदाहरणार्थ : बाळपणाशी संबंधित असलेले उतारे. बाल्दास्सार (Baldassare) या नायकाला आठवतं, त्याची आई त्याला अंथरूणावर कशी ठेवायची, आपल्या हातांनी त्याची पावलं कशी स्वच्छ करायची आणि त्याला झोप येत नसे तेव्हा त्याच्या शेजारी कशी बसून राहायची. शेवटच्या कथेत प्रूस्त आहे ऑनोर. त्याला आठवतं, त्याची आई नृत्यसमारंभाला जाण्याच्या तयारीला लागताच त्याला झोप लागत नसे. तो तिला आग्रह करायचा की तिनं भोजनाआधी पोषाख करावा, लौकर घर सोडावं आणि नृत्यसमारंभ सुरू होईपर्यंत आपल्या एखाद्या मित्राकडे वाट पाहात राहावं. 'व्हीओलान्त' मध्ये तो इच्छाशक्ती नसल्यामुळं अपेष्टा भोगणारं एक मूल आहे. 'ल कॉनफस्सिआँ द थून जनफी' या कथेत इच्छाशक्तीचा अभाव असलेली तो एक मुलगी आहे. ती आपल्या आईला उत्तान आवेगानं कवटाळते. 'गुड-नाइट' चुंबन देण्याचा आग्रह धरते. परंतु आई नाखूष असते. मुलगी सांगते, 'पुन्हा पुन्हा "गुड-नाइट" चुंबनासाठी मी तिला माघारी बोलवायची, कारण नाहीतर मला झोप येत नसे. यात मला अतिशय आनंद मिळायचा आणि आत्यंतिक वेदना व्हायच्या. अखेरीत तिला परत बोलावण्याचा धीर होत नसे. मग नेहमीच नव्या सबबी शोधून काढायची, माझी धगधगती उशी परतायचीय, माझ्या बर्फासारख्या थंडगार पायांना तिच्या हातानंच ऊब मिळेल.'

भव्य उताऱ्यांमध्ये प्रूस्त आपल्या पात्रांमध्ये काहीशा छुपेपणानं प्रवेश करतो. 'ल कॉनफस्सिआँ.... मधील उत्तानता एक तरुण मुलीची नसून त्याचीच आहे, व्हिओलान्तची सर्जनशीलता आणि ऑनोरचा दमा यांविषयीही असंच म्हणता येईल. त्याच्या पुढील काळातील साहित्यकृती जशा बव्हंशी आत्मचरित्रात्मक आहेत तशा या कथा नाहीत. त्याची व्यक्तिचित्रं निदान बाह्यात्कारी काल्पनिक आहेत; वय, लिंग वा सामाजिक स्तर याबाबतीत त्याच्याहून भिन्न आहेत. आपली अनुभूती इतरांकरवी व्यक्त करण्याचा निरुपाय झालाच तर, निदान तो त्यांना स्वतंत्र जीवन देण्याचा प्रयत्न करतो.

त्याची पात्रं प्रेमात पडतात किंवा सोसायटीमध्ये जातात- याहून फारसं काही जे करत नाहीत. प्रेमिक म्हणून ते दु:खी असतात. एक 'नॉर्मल', निकोप वासना म्हणून ते प्रेम कधीच करत नाहीत. ते प्रेम शाश्वत जिव्हाळ्याप्रत घेऊन जात नाही. ते असतं निरपवादपणे चोरटं आणि क्षणिक, असंतुष्ट आणि जबरदस्त अशा अपराधी भावनेशी संबंधित. प्रूस्त स्वत:च्या समलिंगरती अनुभवांसबंधी विचार करत असावा. 'ल मोर्त द बाल्दास्सार सिल्वांद'मधील नायकाच्या मनात व्यभिचाराचे विचार घोळतात. परंतु त्याला आणि त्याच्या प्रियपात्राला सद्सद्विवेकबुद्धीची चाड असते. तो तिचं चुंबन घेतो तेव्हा ती रडत असल्याचं तो पाहातो, त्याला उमगतं, तिच्या डोळ्यांवाटे व्यक्त होणाऱ्या भावना अश्रूहून कितीतरी भिन्न आहेत,' क्रूसावर भोगाव्या लागणाऱ्या यातनेगत किंवा अत्यंत प्रिय व्यक्तीचा वियोग झाल्यागत. 'ल कॉनफॉस्सिआँ....' मधील नायिका सोळाव्या वर्षापासून संभोगसुख अनुभवत असते तिला

आत्यंतिक मानसिक क्लेश होतात. आपल्या वडिलांजवळ कबुली देण्याचाही ती प्रयत्न करते– तरीही आपली आदत सोडणं तिला शक्य होत नाही. एकटं राहणं आता तिला असह्य झाल्यानं ती दुसऱ्या एका व्यसनाच्या उथळ समाज-जीवनाच्या-नादी लागते. ती म्हणते, 'पाप केल्यानंतर स्वास्थ्य लाभावं महणून मी सोसायटीमध्ये जाईन आणि स्वास्थ्य लाभल्यानंतर पुन्हा पाप करीन.' परंतु आपल्या या अपराधी भावनेमधून ती स्वत:ची कधीच सुटका करून घेऊ शकत नाही. देहसंगाच्या वेळीदेखील तिच्या 'हदयात खोलवर असते अपार खिन्नता आणि विषण्णता; 'मला वाटतं की माझ्या आईच्या आत्म्याला, माझ्या रक्षक देवदुताच्या आत्म्याला, परमेश्वराच्या आत्म्याला रडायला लावण्यास मी कारणीभूत होते.' अखेरीस संभोगानंतर, कामोद्दीपक भावनांनी चेहरा उजळून निघालेला असतानाच, तिच्या ध्यानी येतं की तिची आई तिला खिडकीमधून पाहात आहे. आईचा प्राण जातो आणि मुलगी आत्महत्या करते.

अपराधी भावनेपोटीच प्रूस्तचे प्रेमिक निर्विवादपणे क्लेश भोगतात असं नाही. काही वेळेला आपल्या भावना ते स्पष्टपणे व्यक्त करतात, परिणामी मिस्ट्रेसला अलग करतात. प्रूस्त सांगतो की अनास्था दर्शविल्यानंच मिस्ट्रेस जिंकता येते. क्वचित प्रसंगी, एखाद्या मिस्ट्रेसशी संघर्ष उदभवल्यास, आपल्या वासनांची व्यक्तिसापेक्षता ध्यानी घेणं त्यांना भाग पडतं; त्यांच्यासमोर असलेली स्त्री निश्चितच त्यांच्या स्वप्नातील स्त्री कधीच नसते. त्याची एक कथा आहे. छोटीशीच. एका छोट्या मुलाची. त्याचा जीव एका छोट्या मुलीवर जडावतो. परंतु प्रत्यक्ष भेटीत त्याच्या पदरी पडतो अपेक्षाभंग. त्यांच्या कल्पनाविश्वातील ती मुलगी आणि प्रत्यक्षातील ती मुलगी यातील तफावत जाणवल्यानं तो एवढा भयभीत होतो की स्वत:ला खिडकीबाहेर झोकून देतो. याच विषयावर आणखीन एक कहाणी आहे. याहून दीर्घ आणि यशस्वीही 'मेलानकोलीक व्हीलेजित्यूर' नायिकेला मठ्ठ, अनाकर्षक, गांवढळ अशा एका तरुणाबद्दल आकर्षण वाटू लागतं. खरं तर, त्याच्याशी तिचा परिचयही नसतो. त्याच्याबद्दल तिला कसलेही भ्रम नाहीत. तो कसा आहे याचं पूर्ण भान तिला आहे. तथापि, तिच्या मनात जेव्हा प्रेम हलकेच प्रवेश करतं तेव्हा तिच्या जिवाला निष्ठूर घोर लागतो. त्याला पुन्हा भेटणं शक्य होत नाही. भेटीविना राहाणंही अशक्य होतं. ती बिआरिर्ट्झचं मोठं छायाचित्र बारकाईनं न्याहाळते. तिथं तो शरद ऋतू घालवत असतो हे तिला ठाऊक असतं. ती आपल्या खोलीत जाते आणि पियानोवर एक धून वाजवते. एका संध्याकाळी ती त्याला भेटते तेव्हा ती धून तिनं ऐकलेली असते. ती धून तिच्या प्रेमाचं रूपचिन्ह बनते. संपूर्ण संग्रहातील हा सर्वोत्कृष्ट भाग. एका विकाराप्रत घेऊन जाणाऱ्या तिच्या क्लेशाचा तो मागोवा घेतो. तो सांगतो, हा विकार दुर्धर आहे कारण तो पूर्णपणे अतार्किक आहे.

प्रूस्तच्या कथांमधील असूया प्रेमाएवढीच व्यक्तिसापेक्ष आणि हिंस्त्र आहे. ती सुद्धा एक रेंगाळत राहाणारा विकार बनते. 'ल फि द ल जालूसि'मधील ऑनोर आणि फ्रान्सेओइस यांचा एकमेकांवर जीव जडावलेला आहे. प्रूस्तचे तरुण क्वचित प्रसंगी चळतात तसाच तोही



अनुक्रमणिका

चळतो. ही बाब वगळता तो तिच्याशी प्रामाणिक आहे. ती त्याच्याशी अप्रामाणिक आहे असं समजण्याजोगं कुठलंही कारण त्याच्यापाशी नाही. पुढं एका संध्याकाळी, तिचा पूर्वी एक प्रेमिक होता ही सवंग बाजार गप्प त्याच्या मनात संशयाचं बी पेरते. सारी मन:शांती तो गमावून बसतो. तो तिच्यावर प्रश्नांचा भडिमार करतो, तिच्यावर पाळत ठेवतो आणि स्वत:ची बेइमानी करण्यास तिनं प्रवृत्त व्हावं म्हणून स्वत: बेइमानी असल्याची कबुली देतो. तिची परीक्षा घेण्यासाठी तो विकृत मार्गही चोखाळतो. उदाहरणार्थ, तिच्या शीलावर पैजा मारणं, जेणेकरून इतर तरुणांना फूस मिळून तिला वश करून घेण्याचा प्रयत्न त्यांनी करावा. एवढं करूनही त्याला काहीच आढळून येत नाही; तथापि, तो क्लेश भोगत राहातो आणि झुरणीला लागतो. प्रूस्त सांगतो, ती निष्पाप असल्याचा पुरावा जरी त्याला आढळून आला तरी तो क्लेश भोगतच राहाणार. आपल्या स्वप्नाची हत्या होणार या भीतीनं आपण थरथरत राहातो, 'तो केवळ एक आभास होता हे आपल्याला माहीत असूनही' कापून काढलेल्या पायातील यातना माणसं अनुभवतात तसं.

असूयेनं जटिल केलेलं असो वा नसो, प्रेम हे बव्हंशी छळवादी असतं, सुदैवानं ते शेवटपर्यंत टिकून राहात नाही. अशी वेळ नेहमीच येते, जेव्हा प्रेमिक आपल्या प्रेयसीबद्दल पूर्णपणे उदास बनतो. या घडीकडे ऑनोर डोळं लावून असतो आणि ती घडी लौकर यावी म्हणून परमेश्वराची प्रार्थना करतो. ही घडी येते तेव्हा तो अखेरच्या घटका मोजत असतो. अखेरीस त्याला कळून चुकतं, फ्रान्सओइस आपल्या इतर परिचित स्त्रियांहून वेगळी नव्हती. पीडा भोगत नसणाऱ्या प्रेमिकाला वाटतं की आपल्या वासना मृतप्राय झाल्या तरी आपल्या प्रेयसीवरील आपली माया शाबूत राहील, कारण त्याच्याबद्दल जिचं स्वास्थ टिकणार नाही अशा स्त्रीवर तो आपला वेळ खर्ची घालत आहे, यावर तो विश्वास ठेऊ शकत नाही. परंतु जेव्हा तिच्यावरचं प्रेम ओसरत, तो तिला भेटणं बंद करतो, तिला त्याच्याबद्दल यत्किंचितही स्वास्थ्य वाटेनासं होतं. प्रेम आश्वासन देते तो शाश्वत स्नेहभाव म्हणजे बहुधा प्रेमानं निर्माण केलेल्या समस्त भ्रमांमधील सर्वात 'अब्सर्ड' भ्रम असतो.

प्रेमाबद्दल प्रूस्त जेवढा संशयी आहे तेवढाच तो सोसायटीबद्दलही आहे, पण तेवढ्या सातत्यानं नाही. त्याच्या पुस्तकात निदान शिष्टमान्यतेच्या सूचना आहेत. परिसर, वातावरण सामान्यत: खानदानी असतं आणि बऱ्याचदा ते वर्णिलेलं असतं लटक्या उत्साहानं. पात्रं थोर कुळींची आणि सधन असतात. अपेक्षित असल्यागत ते सोसायटीमध्ये प्रवेश करतात आणि तिचे मानदंड बहुतांश स्वीकारतात. क्वचित प्रसंगी सोसायटी- कादंबरीकारांच्या पात्रांहून ते वेगळे उठून दिसतात. दुसऱ्या बाजूनं, प्रूस्त जेव्हा नि:संदिग्धपणे आशयसूत्राशी बांधिल असतो, तेव्हा सामाजिक जीवनावरील त्याची प्रतिकूल टीका निश्चितपणे विध्वंसक असते. शिष्टमन्यता हा अत्यंत हास्यास्पद दुर्गुण म्हणून तो गणतो आणि समस्त सोसायटी-जन तर शिष्टमन्य, शिवाय आचरट, नि:सत्व आणि मठ्ठ. कल्पनाप्रचूर लोकांनी सोसायटी आणि कळप करून राहाणाऱ्यांचे जे इतर प्रकार आहेत ते टाळायला हवेत. त्यांच्या लेखी ते केवळ

मूर्खपणाचं प्रदर्शन असू शकतं. त्यांनी जर का असं केलं नाही तर त्यांना आढळून येईल की आपण कुचकामी झालो आहोत, स्वत:चा विश्वासघात केला आहे. या संदर्भातील ठळक उदाहरण म्हणजे 'ल कॉनफास्सिआँ....' आणि 'व्हिओलान्त' या कथांमधील नायिका.

प्रेम आणि सामाजिक जीवन यांत जर का असा असमाधानकारक अनुभव येत असेल तर पुस्तकाच्या निराशावादाची तीव्रता कमी करण्यासाठी उरतं काय? प्रूस्तच्या दृष्टिकोणानुसार सुख कशात असतं? 'व्हिओलान्त'मधील मुलीच्या लेखी ते निसर्ग आणि कला यांच्याबरोबरच्या एकांतातील सर्जनशील सहजप्रेरणेचे पाठ देणाऱ्या संवादात असते. आपल्या कल्पनाशक्तीचा वापर ती करू शकली, कलाकृतीच्या निर्मितीसाठी स्वत:ला समर्पित करू शकली तर वांझ आणि भ्रमनिरास झाल्याची भावना तिला कधीच होणार नाही. परंतु पुस्तकातील इतर पात्रांचा बाबतीत मात्र तोडगा काहीसा वेगळा आहे. त्यांच्यालेखी सुख निर्मितीमध्ये नसतं, स्मृतीमध्ये असतं. प्रूस्त सांगतो, वर्तमान उघडउघड निराशाजनक असतो. आपण त्याकडे उत्सुकतेनं नजर खिळवून असतो, तो प्रत्यक्षात आहे त्याहून सर्वस्वी भिन्न असल्याची आपण कल्पना केलेली असते. स्मृतींनी उजाळा देत राहून आकर्षक केलेला गतकाळच केवळ सुखदायी असतो. परंतु, या कल्पनांचा पूर्ण विकास न करता त्या सूचित करण्यात आल्या आहेत. त्यांचा विकास झालेला आढळून येतो पुढील काळात, जेव्हा कला आणि स्मृती यातील समानता ओळखून गतकाळाच्या काल्पनिक पुनर्निर्मितीमध्ये सुखाचं स्थान त्याला गवसतं.

या संग्रहातील बरचसं लिखाण स्फुट स्वरूपाचं, अनौपचारिक टिपण वजा, एखाद्या कलाकृतीच्या कच्च्या सामग्रीगत आहे. ज्यावर पूर्ण संस्कार करण्यात आले आहेत. असं ते लिखाण नाही. काहीशा दीर्घ असलेल्या कथाही ठळक दोषानी डागळलेल्या आहेत – त्या अतिशय घटना प्रधान, अति-मेलो-ड्रॅमॅटिक किंवा अत्यंत बुद्धिगामी आहेत. उदाहरणार्थ 'व्हिओलान्त' या कथेत एका कल्पनेचा अतिशय अमूर्त स्वरूपात विस्तार केलेला आहे. त्यातील काही भाग प्रवचनवजा आहे. जणू काही लेखक ते स्वत:लाच देत आहे. थोडक्यात, आपल्या माध्यमावर प्रूस्तची अजून पकड बसावयाची आहे. Un Diner en ville या कथेत तो बऱ्यापैकी विनोद साधू शकला आहे. संवेदनाशील आणि काहीशा मनोविकल माणसांच्या चिंता व्यक्त करणाऱ्या उताऱ्यांमधून तो कमालीचा तल्लख असल्याचं दिसून येतं. उदाहरणार्थ, 'ल फिं द ल जालुसि'मधील ऑनोरचा संशयकल्लोळ. परंतु एखाद्या संपूर्ण कथेत कसदार लेखन त्याच्या हातून घडलं आहे असं क्वचित आढळतं. अपवाद फक्त 'मेला नकोलिया व्हिल्लेजिआतुर' या कथेचा. उपरोधिक आणि मनोविश्लेषणात्मक लेखन करणारा म्हणून त्याच्याविषयी अपेक्षा बाळगाव्यात अशा खुणा मात्र त्याच्या संग्रहात निश्चितच आहेत.

पुस्तकातील वैगुण्यं प्रूस्तच्या शैलीमध्ये किंबहुना शैलींमध्ये, कारण त्या विविध आहेत– शोधता येणं शक्य आहे. काही वेळेला लेखक सुबोध आहे. त्याच्या सुगमतेमध्ये नजाकत आहे. जणू काही अठराव्या शतकाचं अनुकरण करत असल्यासारखा तो दिसतो. काही वेळेला



अनुक्रमणिका

तो बराच अलंकारिक बनतो, एखादा गद्य कवी, विस्तारासाठीच विस्तार करण्यात खूष असलेला. त्याची खासियत दृष्टोत्पत्तीस येते त्याच्या आत्यंतिक घडीव वर्णनात्मक उताऱ्यां-मध्ये. या शैलीचं नमुनेदार उदाहरण म्हणजे Présence réelle मधील आल्पिन सरोवराचा एपिसोड.

'एका संध्याकाळी घडी विशेष करून अनुकूल होती. काही सेकंदात मावळत्या दिनकरानं इंद्रधनुष्याच्या रंगाच्या पाण्यानं आमचे आत्मे सकल हर्षांनी झाकून टाकले होते. अकस्मात आम्ही अंग काढलं होतं, नुकतचं आमच्या नजरेनं टिपलं होतं एक छोटं गुलाबी फुलपाखरू – नंतर दोन, नंतर पाच– आमच्या किनाऱ्यावरील फुलं सोडून सरोवराच्या दिशेनं पंख फडफडवीत ती निघाली होती. क्षणार्धात आम्हाला ती दिसली होती एखाद्या गुलाबी आणि धुरकट धुळीच्या लोळागत. नंतर ती पोचली होती पैलतीरावरील फुलांकडे, पुन्हा माघारी वळून आली होती. आणि पुनश्च सुरू झालं होतं त्यांचं साहसी ओलांडून जाणंयेणं. या घटकेला फिकट होत चाललेल्या एखाद्या भव्य फुलासारखी भरजरी छटांनी युक्त असलेल्या सरोवरावर भुरळ पडल्यागत ती एखाद वेळी थांबत होती. आम्हाला हे अतीच होतं; आमचे डोळे आसवांनी भरून आले होते. सरोवर ओलांडणारी ही चिमुकली फुलपाखरं येत-जात होती, अशा पराकोटीच्या सौंदर्यापुढं भावनांचा ताण लागून कंप पावण्यासाठी सिद्ध असलेल्या आमच्या आत्म्यावरून– इकडून तिकडे जात होती सुखलोलूप धनुष्यासारखी' :-

पुस्तकाच्या सुबोध उताऱ्यांमध्ये जसं प्रूस्तचं स्वतःचं असं काही आढळून येतं तसंच ते वर उदधृत केलेल्या भरजरी भाषाशैलीच्या उताऱ्यातही आढळून येतं. परंतु त्याच्या लेखनप्रकृतीशी न जुळणारंही या पुस्तकात आहे, अनैसर्गिक वाटावं असं. ते त्यानं इतरां-कडून उचललेलं आहे. विविध शैलींचा मेळ आहे त्याहूनही अधिक विसंवादी वाटून देण्याची किमया काव्याद्वारे प्रूस्तनं साध्य केली आहे. त्यातील मुख्य घटक आहे प्रतिमा, रूपक. प्रूस्तनं सातत्यानं, संरचनात्मक, चपखल 'इमेजरी'चा वापर केला आहे आणि सर्वसामान्य जीवन, धर्म, औषधं, निसर्ग, नाना कला यासारखे विविध विषय हाताळलेले आहेत. असा आवाका असणारे गद्य लेखक विरळाच आढळतील. विषयांतील वैविध्यात त्याला रुची होती परंतु त्यांची पसंती त्याला विचारली असती तर 'समुद्राच्या प्रतिमा' असं उत्तर बहुधा त्याच्याकडून मिळालं असतं एवढ्या त्या विपुल प्रमाणात आहेत, लक्षवेधीही आहेत. उदाहरणार्थ, प्रेमाचा मृत्यू म्हणजे तुफान भरती नंतरची ओहोटी असं सांगून तो म्हणतो की त्यानंतर 'चित्रविचित्र आणि सुरेख समुद्र शिंपले आपण तरीही गोळा करू शकतो आणि त्यांना आपल्या कानांपाशी नेऊन गतकालात झाली होती तशी गर्जना विषण्ण सौख्यानं आणि यातनेविना ऐकू शकतो.'

'ले प्लेझिर ए ले जूर' प्रूस्तला लोकप्रियता मिळवून देण्यात अपेशी ठरलं आणि खपाच्या दृष्टीनंही अयशस्वी ठरलं. प्रकाशनाचा खर्चही निघणं मुष्किल अशी परिस्थिती. प्रसिद्ध झालेली परीक्षणं एक तर तोंडदेखली स्तुती, नाही तर प्रतिकूल. त्याच्या लेखनातील

अधिक-उणे समकालिनांच्या ध्यानी आले परंतु त्याच्या ध्यानी न आलेल्या गोष्टी पुढील म्हणजे हरवल्या गेलेल्या कालाचा तलाव आहे, दारू गाळण्यासाठी खास असते तसे एक उंच, मोठे पिंप आहे, बराच काळ मुरल्यानंतर ज्यामधून मादम फ्रेमेर, बाल्दास्सार सिलवान्द, हिप्पोलिता, ऑनोर ही पात्रं मादम व्हरदुरीं, ॲडोल्फकाका, ओरीआन द गॅर्मांत, निवेदक या रूपात पुढं बाहेर पडणार होती. इल्लीअर, युव्हिल आणि ओरलआँ ही गावं कॉम्ब्रे, बाल्बेक आणि दॉन्सिएर या नावानं अवतीर्ण होणार होती आणि तरुण प्रूस्त एव्हाना काळ, असूया, सवय, विस्मृती, 'दुःखाचे क्षणभंगूर तेज' यावर अधिकारवाणीनं बोलणार होता. त्याच्या या संग्रहाचं शीर्षक पेर्दू'च्या दोन अर्थांपैकी एक अर्थ व्यक्त करत असलं तरीही 'हरवल्या गेलेल्या काळा'चं भान अद्याप जाणीवेच्या स्तरावर झालेलं नाही. त्याला दुःखद जाणीव झाली आहे ती' वाया गेलेल्या काळा'ची.

**सहा**

'ले प्लेझिर ए ले जूर' बाजारात आलं तत्पूर्वी एखादं वर्ष प्रूस्तनं दुसऱ्या एका पुस्तकावर काम चालू केलं होतं : एक दीर्घ कादंबरी. १८९६ च्या प्रारंभीच्या महिन्यात ज्यांना त्यानं पत्र लिहिली होती त्यावरून असं दिसतं की त्याच्या कामाचं स्वरूप त्यांना एव्हाना पुरतं कळून आलेले हातं. आणि एका पत्रात तर, ती कादंबरी पुरी करण्याची व त्यानंतर अन्य पुस्तकाकडे वळण्याची शक्यताही त्यानं प्रदर्शित केली होती. उन्हाळ्यात आपल्या आईबरोबर या संदर्भात वारंवार चर्चा करत होता आणि जवळजवळ प्रत्येक दिवशी आपल्या प्रगती विषयीचं वृत्त तिला कळवत होता. एका पत्रात त्यानं म्हटलं हातं, "माझ्या कादंबरीमध्ये मी पूर्णपणे गढून गेलो आहे आणि तिचं रूप माझ्या मनात साकार झालेलं आहे. या अर्थानं माझं काम एव्हाना चालू आहे, असं जरी मी म्हणू शकत नसलो, तरीही विकत आणलेली नोंदवही भरून गेली आहे, आणि तिची पृष्ठ आहेत ११०, लंबी चौडी. अर्थात मी जे काही लेखन केलं आहे ते त्यात समाविष्ट नाही, कारण त्याआधी मी सुट्यासुट्या कागदांवर लेखन केलं होतं." यावरून असं विधान केलं तर ते वावगं ठरू नये की प्रथम 'झाँ सान्तेय' व कलांतरात 'आ ला रशार्श द्युतां पेर्दू' या नावानं त्यानं केलेल्या लिखाणाचा हा प्रारंभीचा प्रयत्न होता.

१८९६ च्या या उन्हाळ्यात प्रूस्त कुटुंबीयावर प्रियजनांच्या मृत्यूचे आघात झाले. १० मेला लुई वाईल अकस्मात मरण पावला. त्या बापड्या म्हाताऱ्याला आपण आजारी आहोत हे कळूनच आलं नाही. प्रथम थंडी झाली. त्यातून पंधरवड्यात न्युमोनिया उद्‌भवला; त्याची शुद्ध हरपली, त्यातच त्याचा अंत झाला. १०२ बुलवहार्द हाऊसमानवरील त्याच्या घरामधल्या बेडरूममध्ये त्याच्या निष्प्राण देहाचं. त्याची पुतणी मादम प्रूस्त आणि त्याचा नातू मार्सेल अखेरचं दर्शन घेत होते. याच बेडरूममध्ये मार्सेल प्रूस्त पुढं दिवसभर झोपा काढून



अनुक्रमणिका

अख्खी रात्र 'आ ला रशार्श'चं लिखाण करणार होता. लुईच्या मृत्यूपत्रात ही जागा सांप्रत मादम प्रूस्तचा भाऊ जॉर्जच्या नावे करण्यात आली होती.

पुढल्याच महिन्यात ३० जून रोजी मृत्यूनं मादम प्रूस्तचे वडील नाय यांच्यावर घाला घातला. मार्सेलच्या बाळपणी त्याच्या या आजोबानं त्याला कडक शिस्तीत ठेवण्याचा प्रयत्न केला होता परंतु त्यांच्या बाबतीत काही वाईटसाईट घडलं तर मात्र हा म्हातारा गलबलून जात होता; त्याला सहानुभूती दाखवत होता. मादम द बेनार्डकी दुरावल्यानंतर झालेलं मार्सेलचं दु:ख पाहून त्याचे डोळे भरून आले होते. निष्ठूर बेपर्वाईनं वागलो म्हणून त्यानं स्वत:ला दोष दिला होता आणि दफनविधी आटपून म्हाताऱ्याच्या खोलीत पाऊल टाकताच त्यानं अश्रूंना वाट मोकळी करून दिली होती आणि अपराधी भावनेचा भार हलका केला होता.

मृत्यूच्या या आघातांनी मादम प्रूस्त दु:खीकष्टी झाली आणि काळ्याकुट्ट औदासिन्याच्या झाकोळीनं प्रूस्तची तब्येत कधी नव्हे एवढी बिघडवली. आपण काय खातो, किती खातो यावर त्याचं लक्ष असायचं. सोड्याच्या बायकार्बोनेटचे व आयवोडायूडचे डोस तो घ्यायचा. परंतु एवढी खबरदारी घेऊनही त्याला सतत अपचनाचा त्रास होऊ लागला. दमा सुरू होण्याची चिन्हं दिसू लागताच, ज्याची ॲलर्जी आपल्याला आहे त्या गोष्टींपासून तो स्वत:ला चार हात दूर ठेवायचा, एस्पिक सिगारेटी ओढायचा किंवा लग्रा पावडर जाळायचा. कुठल्याही प्रकारचा थकवा तो टाळत असे आणि शक्य होईल तेवढी जास्त झोप घेत असे. परंतु दमा क्वचित त्याच्या झोपेचं खोबरं करायचा. झोपी जाते समयी सौम्य असलेला दम्याचा झटका रात्रभर त्याला अधूनमधून जागवायला पुरेसा होई. क्वचित प्रसंगी झोपी जाण्याच्या धडपडीतच त्याचं अवघं अस्तित्व गुंतून पडल्यासारखं दिसायचं. उत्तेजित औषधांची मदत तो घ्यायचा त्यातही खास करून ट्रायओनेलसारख्या गुंगीच्या औषधाची. परंतु अशा औषधांची सवय जडली जाण्याचा धोका होता. औदासिन्यानं त्याला आधीच पुरता बेजार करून टाकला होता. झोपण्यासाठीची त्याची धडपड झोपेच्या गोळ्या न घेण्याच्या धडपडीमध्ये परिणत झाली होती. त्याच्या आईनं त्याला बजावलं होतं की त्यानं ट्रायओनेल वा तत्सम इतर औषधांचा शक्यतो अधूनमधूनच, वेळप्रसंगी वापर करावा.

ऑगस्टमध्ये प्रूस्त व त्याची आई प्रकृतीस्वारस्थ्यासाठी मून दोरला गेली. येथील वैरणाचं वाळवंट प्रूस्तच्या दम्यासाठी खतरनाक, शिवाय सर्दीनंही त्याला पछाडलं. पुढच्या महिन्यात मादम प्रूस्त दिएप्पला गेली आणि प्रूस्त काही काळ पॅरिसला जाऊन राहिला. मायलेकरांमध्ये या काळात दररोज पत्रव्यवहार होत असे. आई त्याच्या प्रकृतीची चौकशी करायची आणि तो आपल्या प्रकृतीचा तपशीलवार वृत्तांत द्यायचा. एका रात्री अंथरुणाला पाठ लावण्याआधीच त्याला धूड जाळावी लागली होती आणि एवढी खबरदारी घेऊनही ॲमिलच्या दोन कॅप्सूल घेण्याची पाळी त्याच्यावर आली होती. ५.३० वाजता दम्याच्या ॲटकनं त्याला जाग आली होती. दुसऱ्या एका पत्रात, लग्रा पावडर, टिसेन आणि बायकार्बोनेटचा वापर केल्याचं

कळवलं होतं. या वेळी अन्य काही त्यानं घेतलं नव्हतं; त्याला छान झोप लागली होती आणि लौकर जाग येऊनही तो पुन्हा झोपी गेला होता. आणखीन एका रात्री त्यानं ॲमिल घेतलं होतं आणि सकाळी त्याच्या चित्रकार मित्रानं उठवल्यानंतर ट्रायओनेल. याच पत्रात त्यानं आपल्या कादंबरीविषयी लिहिलं होतं. एका ठिकाणी तो विनयानं सांगतो की त्याला वाटतं एका छोट्या एपिसोडवर तो काम करील, एकदा कबुली देतो की परवाच्या दिवशी त्यानं काहीही केलं नाही, परंतु आश्वासन देतो की इत:पर तो रोजच्या रोज नित्यनेमानं लेखन करील. दिवसाचे चार तास या गतीनं एक फेब्रुवारीपर्यंत बहुधा तो काम पूर्ण करील. त्याचबरोबर हस्तलिखित केवळ कचराच तर ठरणार नाही ना अशी धास्तीही तो व्यक्त करतो.

१९ ऑक्टोबरला प्रूस्त फूरेनब्लोला गेला. खास लेखन करण्यासाठी. आणि तत्काळ एका नव्या एपिसोडचा विषय त्याला मिळाला. लेऑं दोदे या मित्राबरोबर तो 'ओतेल द फ्रान्स ए दांग्लतेर'वर उतरला होता. लेऑं हा 'तारतारीन द तारमकॉं' चा लेखक आलफोन्स दोदेचा मुलगा. घडलं असं : २० ऑक्टोबर रोजी मादम प्रूस्त बुलव्हार्द मालशेर्ब ओलांडून समोरच्या वेकरीत प्रूस्तला फोन करायला गेली. जवळपास फोन तिथंच होता. फोन लागायला बराच विलंब झाला. अखेर तो लागला तोवर प्रूस्तच्या जिवाची घालमेल झाली. कुटुंबात अलिकडेच झालेल्या निधनामुळे तिच्या आवाजातील शोकाची थरथर त्याला प्रथमच विशेषत्वानं जाणवली. पॅरिसमध्ये आपली आसवं गिळून आपल्या दु:खाची झळ तिनं कधी इतरांपर्यंत पोचू दिली नव्हती. या घटनेनंतर सहा वर्षांनी त्यानं बिबेस्कोला पाठवलेल्या पत्रात लिहिलं होतं, 'तिचा दयनीय आवाज जेव्हा माझ्या कानी पडला तेव्हा तो हताश होता, विव्हळ होता, मला ठाऊक असलेल्या आवाजाहून सर्वस्वी भिन्न होता, भरपूर तडे गेलेला, चिरफाळलेला. ते उध्वस्त आणि रक्ताळलेले शब्दांचे तुकडे टेलिफोन रिसिव्हरमध्ये मी पुन्हा जुळवले तेव्हा प्रथमच तिच्या अंतर्यामीच्या दु:खद भावनांची जाणीव झाली. २० ऑक्टोबर रोजीच त्यानं हा अनुभव शब्दबद्ध केला आणि ते हस्तलिखित आईकडे पाठवून दिलं, त्या सोबतच्या पत्रात लिहिलं, 'मेहरबानी करून *हे ठेवून* दे आणि ते कुठं ठेवलं आहेस ते नीट लक्षात ठेव, कारण माझ्या कादंबरीत ते येणार आहे. 'मादम प्रूस्तनं ते जपून ठेवलं आणि गंमतीनं त्यावर भाष्य केलं,' ''डेव्हिल्स आयलंड''च्या वाटेवरील गुन्हेगाराची कथा याहून अधिक हृदयद्रावक नसेल. हा प्रसंग त्यानंतर बऱ्याच वर्षांनी 'आ ला रशार्श' मध्ये थोडा फेरफार होऊन अत्यंत लक्षवेधी स्वरूपात आला– दॉन्सिएरवरून केलेला टेलिफोन कॉल.

लॅऑंसुद्धा प्रूस्तप्रमाणं आपल्या कादंबरीवर काम करण्यासाठीच आला होता. तो आणि प्रूस्त एकत्र चहापान, भोजन घेत, जंगलात फेरफटका मारत, हॉटेलच्या सुनसान लाउन्जवर शेकोटीपाशी बसून गप्पागोष्टीत रंगून जात. परंतु या काळात प्रूस्त प्रत्यक्ष वा काल्पनिक शोकाच्या दमट 'इन्फर्नो'मध्ये होता. मस्तकात जावेत असे हिरवेगार वृक्ष, पावसाची

संततधार, पावसाच्या पिरपिरीत दररोजची खिन्न भ्रमंती, कानी येणारे दूरवरच्या शिकाऱ्यांचे हाकारे आणि त्यांच्या शिंगाचे आवाज. या चिडचिडीत भर म्हणजे हॉटेलमधील अव्यवस्था. त्याला दम्याचा त्रास होऊ लागला. झोप येईनाशी झाली. त्यानं एका पत्रात आईला लिहिलं, '(रात्रौ) मला हव्या असलेल्या साऱ्या गोष्टी : माझी कॉफी, माझ्या त्रिस्तेन, माझी मेणबत्ती, माझं पेन, माझ्या आगपेट्या इ. इ. माझ्या उजव्या हाताला असतात, जेणेकरून (त्या घेण्यास) मला माझ्या दुखणाईत बाजूला नेहमीच वळावं लागतं.' एक दिवस लेआँ बाहेरगावी गेला. त्याच्यापाशी वाचायला फक्त Du Barry चं चरित्र. कासावीस होत त्यानं आईला पुढील गोष्टी पाठवून देण्याचं फर्मानं सोडलं. त्याची छत्री, टाय-पीन, घड्याळ, हॅट, चार बाल्झाक, 'वील्हेम मिस्टर', शेक्सपीअरचं 'ज्युलियस सीझर' आणि जॉर्ज इलियटचं 'मिडल मार्च, ज्यादा पैसे. आपल्या विजारीच्या खिशाच्या भोकातून तीस फ्रँक्स गहाळ झाल्याचं त्यानं कळवलं. तो जेव्हा सुट्टीवर बाहेरगावी जात असे तेव्हा तेव्हा असे पैसे गहाळ होण्याचे प्रसंग उद्भव. (एखाद्याला संशय यावा की आपल्या उधळपट्टीची कबुली तो देऊ धजत नव्हता ती दडवण्याची त्याची ही शक्कल असावी) एखाद्या अपराधागत हा विचार माझा पिच्छा पुरवत आहे. दिलासा देणारं पत्र लिहिलं आणि त्यासोबत '१०० फ्रँक्स आणि १,००,००० चुंबन पाठवली. त्यानंतर काही दिवसांनी पराभूत मनोवस्थेत तो पॅरीसला घरी परतला. आपल्या दैन्यावस्थेला कारणीभूत ठरलेल्या 'ॲब्सर्ड' सबबी त्यानं पुढं केल्या असल्यातरी खरं कारण होतं. 'हरवलेल्या काळा'चं त्याला झालेलं पहिलं खतरनाक दर्शन. प्रूस्त घरी परतल्याला फार दिवस झाले नसतील. एका घरगुती भांडणात तो ओढला गेला. भांडणाची परिणती काहीशा शारीरिक उद्रेकानं झाली. प्रूस्तच्या अपार्टमेंटमधल्या एका खोलीचं तावदान त्याच्याकडून फोडलं गेलं. आईला पाठवलेल्या पत्रात प्रूस्तनं माफी मागितली आणि उत्तरादाखल लिहिलेल्या पत्रात आईनंही माफी मागितली, म्हटलं, 'तुला कळायला हवं झाँच्या (नोकरांपैकी एक) समोर काहीही बोलण्याचा माझा बिलकुल इरादा नव्हता आणि माझ्याकडून जे घडलं ते अनवधानानं. तिनं पुढं पुस्ती जोडली की मंदिरात असतं, त्याप्रमाणे फुटलेली काच आता होईल. अविनाशी समेतचं प्रतीक : हे भांडण 'क्वरेल द झॉ आव्हेक से पारॉंत' या शीर्षकाखाली नोंदवहीत वर्णिलेलं आढळतं. प्रूस्त ही घटना त्याच्या नायक 'झाँ सान्तेय' याच्या शाळकरी वयातील म्हणून देतो आणि याला मादम सान्तेयेला जबाबदार धरतो. ती त्याच्या एका मित्रावर उगाचच संशय घेते. वस्तुतः तो मित्र शांत आणि जबाबदारीची जाणीव असलेला असतो. ती आणि तिचा पती ऑगस्टीन या नोकरासमोर झाँची खरडपट्टी काढतात. तो खोलीतून निघून जाताच झाँ दरवाजा आदळतो, तावदान खळ्कन फुटताच तो रागानं घुमसत आपल्या खोलीत जातो आणि आईनं त्याला भेट दिलेला व्हेनेशियन आरसा फोडतो. भोजनसमयी दिलजमाई होते. झाँ कबुली देतो की त्यानं आरसा फोडला. त्यावर आई त्याचं चुंबन घेते आणि कुजबुजते, 'मंदिरात असतं, त्याप्रमाणं, अविनाशी समेतचं एक प्रतीक असेल.'

नोंदवहीतील उपरिनिर्दिष्ट घटनेच्या आधारे प्रूस्तच्या लेखनप्रक्रियेबद्दलचे काही सर्व-साधारण निष्कर्ष काढता येणं शक्य आहे. तो जे लिहीत होता त्याला तो कादंबरी म्हणत असला तरी कुठल्याही एका विषयाचं चित्रण तो करत नव्हता किंवा स्वत:च्या आयुष्याची कहाणीही पूर्णपणे, यथासांग सांगत नव्हता. 'ल बानक्वेत'च्या दिवसांपासून तो जे करू पाहात होता, निदान, ते तरी तो आता करत होता– एकमेकांशी संबद्ध नसलेल्या घटना लिहिणं. प्रत्येक घटक आत्मचरित्राचे केवळ खंड होते. त्याच्या दृष्टीनं तीव्र आणि लक्षणीय अनुभवाचे क्षण. काही वेळेला वर्णन केलेले क्षण, वर उल्लेखिलेल्या घटनेप्रमाणं अगदी अलिकडील होते, बऱ्याचदा ते गतकाळातील आठवलेले क्षण होते – एखादं निसर्गदृश्य किंवा प्रेम प्रकरण चालू असतानाच्या तीव्र यातना, किंवा एखाद्या नव्या व्यक्तिमत्त्वाचं तीव्र स्वारस्य, यांचं एक ठळक 'इम्प्रेशन'. यात गोम अशी होती की एक फेब्रुवारीपासून बराच काळ तो लिहित असूनही त्यातून एक पुस्तक तो तयार करू शकत नव्हता. त्याचं काम चालूच होतं, नोंदवह्यांची थप्पी वाढत होती पण कादंबरी मात्र निर्माण होऊ शकत नव्हती.

१८९७ च्या जानेवारीत प्रूस्तनं पुन्हा एकवार 'माझरिन लायब्ररी'च्या डायरेक्टरला पत्र पाठवून याचना केली की' माझ्या प्रकृतीची जी हालत आहे त्याहूनही माझ्या अभ्यासाच्या सांप्रतच्या कोर्ससाठी माझी रजा वाढवली जावी असं मंत्रालयाला सांगणं मला भाग पडत आहे पुढं अशी पुस्ती जोडली की हे औचित्याला धरून नसेल तर तो कामावर हजर होईल. फेब्रुवारी–मार्चमध्ये तो लायब्ररीत काम करत होता की अन्यत्र हे सांगणं अवघड आहे. परंतु या महिन्यांमध्ये तो कुठं तरी नोकरी करत होता, आपल्या पहिल्या प्रकाशित पुस्तकाचं अपयश विसरून 'झाँ सान्तेय'च्या लेखनात गढलेला होता, ही कादंबरी यशदायी होण्याचं स्वप्न रंगवत होता. तेवढ्यात नियतीनं दावा साधला. 'ले प्लेझिर ए ले जूर'वर दोन धक्कादायक हल्ले झाले. तसं पाहता, काहीसा विलंबनानं, पण ते अनपेक्षित मात्र खचितच नव्हते. पहिला हल्ला झाला. 'ल जूरनाल'च्या ३ फेब्रुवारीच्या अंकात. परीक्षण करणाऱ्याचं नाव. रेतीफ द ला ब्रेतोन. हे टोपण नाव झाँ लॉरेनचं ही गोष्ट जगजाहीर होती. त्याच्या हल्लाचं लक्ष्य प्रूस्त नसून मॉन्तेस्क्युइऊ होता हे उघडं गुपित होतं.

लॉरेनचं व्यक्तिमत्व अत्यंत नटवं. स्वस्त सुगंधाच्या दर्पानं परिमळणारा एक डँडी अशी त्याची ख्याती. लहानपणी जिंवत कोंबड्याची पिसं उपटून काढण्यात ज्याला मनस्वी समाधान लाभत असे असा परपीडक. ईथरसारख्या मादक पदार्थाचा व्यसनी. भपकेबाज दागिन्यांचा पौकीन. गॉबलीन आणि लेमिअ यासारख्या भूताखेतांवर त्याचा विश्वास. त्याची खातरजमा झाली होती की त्याचं घर पछाडलेलं आहे आणि त्याचा सतत छळवाद मांडणारी भडक स्वप्न ही अतीद्रियशक्तीचं देणं आहे. त्याचं लैंगिक जीवन सनसनाटी होतं. स्त्री आणि पुरुष दोघांचाही तो भोक्ता होता– निदान तशा कथा प्रचलित होत्या. आपल्यात पौरुष आहे असा बहाणा करून आणि विकृत म्हणून दुसऱ्याना हिणवून स्वत:चं 'स्कॅन्डल' दडपण्याचा प्रयत्न करणारे जे खतरनाक समलिंगरती असतात त्याच जातीचा तो होता. नैतिक ऱ्हासाचं चित्रण

करणारा कादंबरीकार आणि कुप्रसिद्ध स्तंभलेखक म्हणूनही तो ओळखला जात होता. तो ज्यू-द्रेष्टा होता आणि खाजगीत किंवा वर्तमानपत्रात मॉन्तेसकुइऊवर हल्ला चढवण्याची, त्याची कुचेष्टा करण्याची संधी तो वाया दवडत नव्हता. त्या अनुषंगानं प्रूस्तची कुटाळकी करण्यातली मजा तो लुटत होता. 'ले ऑर्तेनसिया ब्ल'च्या प्रस्तावनेतील प्रूस्तच्या प्रशंसनीय उल्लेखाचा धागा पकडून १८९६ च्या जूनमध्ये त्यानं लेआँ दोदे आणि प्रूस्त यांच्यात समलिंगरती संबंध असल्याचा निर्वाळा देऊनही तो मोकळा झाला होता. त्यावरील एक जुलैच्या परीक्षणात त्यानं प्रूस्तचा उल्लेख केला होता : साहित्यानं गर्भार असलेल्या सोसायटी बछड्यांपैकी एक ! तीन फेब्रुवारीच्या सदरात तर त्यानं याहूनही बदनामी केली. 'ले प्लेझिर एले जूर' हा संग्रह निकृष्ट, बेचव ठरवून त्याची त्यानं वासलात लावली. प्रूस्तच्या शैलीला त्यानं कृत्रिम आणि तद्दन भंपक म्हटले. मादम लमेरच्या रेखाटनांनी करमणूक केली असल्याचं सांगून लिहिलं की एकदा म्हणे तिला एवढी घाई झाली होती की मैत्रीवरील एका गोष्टीसाठी दोन मांजर गिटार वाजवत असलेलं चित्र तिनं काढलं होतं. आनातोल फ्रांसच्या प्रस्तावनेच्या संदर्भात लिहितांना त्यानं त्याच्या शेपटीला दंश केला, अशा रितींना जग शेपूट हलवतं, आणि तुम्ही अगदी खात्री बाळगा की प्रूस्त महाशय त्याच्या दुसऱ्या पुस्तकासाठी कट्टर लोकशाहीवादी आल्फोन्स दोदे याच्याकडून प्रस्तावना काढून घेऊ शकेल, मादम लमेर व त्यांचा मुलगा लुसिएँ यांना ही सेवा अव्हेरणं शक्य होणार नाही. 'ल जूरनाल' च्या बहुसंख्य वाचकांना या विधानाचा गर्भितार्थ उमगला नसला तरी यातील समलिंगरतीचा जाहीर आरोप सूज्ञांच्या नजरेस न येणं अशक्य. यात प्रूस्त आणि लुसिएँ या दोघांनाही गोवण्यात न येणं अशक्य. याला उत्तर देण्याचा आणि पुढील हल्ले थोपवण्याचा एकच मार्ग होता, आणि स्वत:चा आणि आपल्या मित्राचा सन्मान कलुषित होऊ न देण्यासाठी प्रूस्तनं तडकाफडकी निर्णय घेतला. आपल्या शत्रूला त्यानं द्वंद्वाचं आव्हान दिलं. द्वंद सकाळी ठेवण्यात आलं तर आपल्याला लौकर उठावं लागणार म्हणून प्रूस्त बेचैन झाला पण दुपारची वेळ ठरवण्यात आल्यानं त्याचा जीव भांड्यात पडला.

६ फेब्रुवारी १८९७ स्थळ : टूर द व्हिलबाँ. समय : सर्द पावसाळी दुपार. लॉरैनचे 'सेकन्ड्स' होते कादंबरीकार पॉल ॲडम जो पुढं ड्रायफस प्रकरणात प्रूस्तच्या बाजूचा होता आणि ऑक्टेव्ह उझान्न, अंमली पदार्थाच्या सेवनानं सदैव धुंद असणारा कलासमीक्षक प्रूस्तचे 'सेकन्ड्स' होते सोसायटी चित्रकार झाँ बेरोद आणि ख्यातनाम तलवार-बहाद्दर गुस्ताव द बोर्दा. आपल्यामध्ये पंचवीस यार्डाचं अंतर ठेवून प्रतिस्पर्धी पिस्तुल घेऊन एकमेकांसमोर उभे ठाकले. दोघांनीही दोन दोन फैऱ्या झाडल्या. पण त्यापैकी एकानंही प्रतिस्पर्ध्याच्या अंगाला स्पर्श केला नाही. ६ तारखेच्या 'ले फगुरो'च्या अंकात वृत्तांत दिला : 'कुणीही जखमी झालं नाही आणि "सेकन्ड्स' नी भांडणाची अखेर झाल्याचं जाहीर केलं' या द्वंद्वानंतर लॉरैननं प्रूस्तला सोडला आणि मॉन्तेरस्क्युइऊवरील जहरी हल्ले मात्र जारी ठेवले.



अनुक्रमणिका

लॉरेन हा एवीतेवी प्रूस्तचा निंदकच होता. परंतु 'लिसे काँदोसे' व 'ल बानक्वेत'च्या काळापासूनच्या त्याच्या दोस्तांनी केलेली कुटाळकी हा त्याच्या जिव्हारी घाव होता. हे स्नेही क्वे बोरबाँवरील जाक बिझेच्या अपार्टमेंटमध्ये जमत आणि वेळोवेळी 'शॅडो प्ले' करत. रेव्हू स्वरूपाच्या या खेळासाठी फॉन्टेन आणि जाक एमिल ब्लांश हे प्रसिद्ध चित्रकार कागदाच्या आकृत्या बनवत. प्रकाश योजनेसाठी 'ॲसेटिलीन गॅस'च्या सिलिंडरचा वापर केला जात असे. हा वापर अर्थातच जिवाला धोकादायक होता आणि तशी त्यांना ताकीदही देण्यात आली होती. १८,१९ आणि २० मार्च रोजी त्यांनी अभिनव महत्त्वाकांक्षी प्रयोग सादर केला. आधल्या वर्षी त्यांच्या मित्रांच्या साहित्यिक यशाचा खुसखुशीत पंचनामा त्यांनी केला. फेरनान्ड ग्रेग आणि एर्न्स ला ज्यनस्स (Jeunesse) यांच्या साहित्यकृतींच्या जोडीनं प्रूस्तच्या 'ले प्लेझिर ए ले जूर' संग्रहावरही कार्यक्रम झाला.

बिझे आणि ड्रायफस यांनी संवाद लेखन केले आणि ले आँ येटमननं प्रूस्तच्या आवाजाची नक्कल केली. या रेव्ह्यमूधील प्रूस्त, ग्रेग आणि ल ज्यनस्स यांच्यामधील ही बातचीत.

प्रूस्त : माझं पुस्तक वाचलंस का तू मॉसिअ ला ज्यनस्स?

ला ज्यनस्स : नाही, फारच महागडं आहे ते.

प्रूस्त : ओह् डिअर, प्रत्येकजपण मला तेच सांगतोय, ग्रेग, तू वाचलंस का ते?

ग्रेग : हो, मी पानं कापली म्हणजे त्याचं मला परीक्षण करता येईल.

प्रूस्त : त्याची किंमत फार आहे असं समजणाऱ्यापैकीच तू आहेस?

ग्रेग : बिलकुल नाही, बिलकुल नाही. तुमच्या पैशांच्या मोबदल्यात बरंच काही मिळतं.

प्रूस्त : अर्थातच मॉसिअ आनातोल फ्रांसची प्रस्तावना चार फ्रँक्स. मादम लमेरची चित्रं, चार फ्रँक्स, रेनाल्ड हानचं संगीत, चार फ्रँक्स. माझं गद्य, एक फ्रँक्स. माझ्या काही पद्यरचना पन्नास सान्तीम Centimes. एकूण साडे तेरा फ्रँक्स. फार नाहीत हे, आहेत?

ला ज्यूनस्स : परंतु महाशय 'आल्मनाक हायेट्ट'मध्ये याहूनही बरंच आहे आणि त्याची किंमत पंचवीस Sou सू !

प्रूस्त : (खदखदून हसत) अच्छा, फारच छान ! परंतु हे असं हसणं मला यातनाकारक आहे ! मॉसिअ ला ज्यनस्स, काय तुझी विनोदबुद्धी ! तुझ्यासारखी विनोदबुद्धी असणं किती गमतीदार असेल नाही !

सोसायटी आणि साहित्य यामध्ये प्रूस्त या काळात पुरता गढून गेलेला असल्यामुळं या कार्यक्रमांना जाणं त्याला जमत नसे. तेवढी फुरसद त्याला मिळत नव्हती. परंतु या रेव्ह्यूच्या अमाप यशाची वार्ता मात्र त्याच्या कानावर गेली आणि तो अतिशय दुखावला गेला. पुढल्या बुधवारी मादम आरमाँच्या घरी गास्ताँ द केइल्लावेटपाशी डोळ्यात पाणी आणून तो म्हणाला, 'त्यांनी मला अतिशय दुखावलं आहे, मी समजत होतो ते किती चांगले आहेत–

शिक्षण अधिक उदार 'सेक्युलर' होत आहे. आधुनिक लेखक वाईट आहेत हे उघडच आहे, दुर्बोध शैली, घरबंद नसलेले पदबंध, वगैरे दोषानी डागळलेलं त्याचं साहित्य. अभिरुचीहीन. तथापि, आधुनिक अभिरुची बदलण्यासाठी म्हणून त्यानं काही केलं नव्हतं. केलं असेल ते एवढंच : अतिशय पुराणगतवादी जर्नलमधून स्तंभलेखन आणि स्वतःचा 'नॉस्टॉल्जिआ' व्यक्त करण्यासाठी एक आत्मचरित्र. प्रूस्तच्या इतर पाहुण्यात होते लॉरेंनबरोबरच्या द्वंद्वामधील त्याचे दोन 'सेकन्ड्स' बेरोद व बोरदा, नाटककार जॉर्जे द पोर्तो-रिच, कादंबरीकार एदुरार रोद आणि दोन तरुण मित्र केइल्लावेट आणि हान. फ्रांसमधील रईस भोजनसमारंभासाठी आपल्या बूर्झ्वा घरी येणं ही प्रूस्तच्या लेखी एक महान पर्वणी होती. दुसऱ्या दिवशी 'ल गोलॉई च्या (Gaulois) अंकात या समारंभाचा वृत्तांत देताना लिहिलं होतं की मादम प्रूस्त दुखवट्यामध्ये असल्यामुळं दृष्टीस पडल्या नाहीत आणि पार्टीला आलेल्या खानदानी पाव्हण्यांचा आदरसत्कार करण्याची कामगिरी आपल्या पुत्रावर सोपवून डॉ. प्रूस्त यांनी अंग काढून घेतलं होतं. या झगमगीत समारंभात हास्याची कारंजी मात्र उडत होती.

२ जुलैला बोनी द कास्तेल्लाननं ब्वा द बुलोनमध्ये एक मोठाला नृत्यसमारंभ आयोजित केला. तीन हजार पाव्हणांना आमंत्रणं रवाना झाली. यात प्रूस्त होताच. या समारंभाचं निमित्त : बोनीच्या नाराज पत्नीचा एकविसावा वाढदिवस. परंतु यजमान आणि त्याचे काका ब्वाच्या वापरासाठी परवानगी मागायला 'म्युन्सिपल काऊन्सिल'च्या अध्यक्षांना भेटले तेव्हा वेगळंच कारण सांगण्यात आलं होतं : 'मॉसिअ, हा नृत्यसमारंभ केवळ मौजेखातर आहे.' आणि या मौजेखातर मादम द कास्तेल्लानचे ३,००,००० फ्रॅन्क उधळले गेले. पार्कमधल्या झाडांवर ८०,००० हिरवे व्हेनेशियन कंदिल लटकवण्यात आले, अपक्व फळांगत झगमगणारे ऑपेराच्या संपूर्ण नृत्य-ताफ्यात पाव्हण्यांसमोर नृत्य सादर करण्यात आलं. संध्याकाळचा 'क्लायमॅक्स' म्हणजे बोनीची शेजारी कामिल्ल ग्रूल्त हिनं आणलेले पंचवीस राजहंस, कंदिल मौजमजा लुटणारे पाव्हणे यांच्यामध्ये मुक्त करण्यात आले, आपले धवल पंख फडफडवत उडण्यासाठी. परंतु या समारंभात देखणा राजहंस होती मादम ग्रेफ्फूल्ह.

महिन्या अखेरीस प्रूस्त आजारी पडला. त्यात दम्याचा तीव्र झटका. २५ जुलै रोजी रेनाल्डो हानचे वडील निधन पावले होते. रेनाल्डोची चौकशी करण्यासाठी एका रणरणत्या मध्यान्ही मारी नॉर्डलिंगर सायकलवरून त्याच्या घरी निघाली होती. आणि त्या कामासाठीच बंद कॅबमधून बाहेर पडणारा प्रूस्त तिच्या दृष्टीला पडला होता. त्यानं अंगावर जाडजूड ओव्हरकोट चढवला होता, गळ्याभोवती स्कार्फ गुंडाळला होता आणि तापानं फणफणत होता. बाहेर उघड्यावर न राहाता त्यानं आत यावं म्हणून मारीनं त्याला सांगितलं तेव्हा धापा टाकत तो म्हणाला, 'नको, मी इथं वाट बघतो, तू जा आत आणि तो कसा आहे, बघून ये, मेहरबानी करून मी आलोय म्हणून त्यांना सांगू नकोस. ती आत गेली आणि खबर घेऊन लौकरात बाहेर पडली. तिनं पाहिलं, प्रूस्त निघून गेला होता. यानंतर त्यानं स्वतःवर बंधन घालून घेतलं : सकाळी ८ ते दुपारी ३ पर्यंत झोपणे आणि रात्रभर लेखन करणं.

याच उन्हाळी मोसमात रेनाल्डोनं प्रूस्त आणि मारी यांची मेरी लॉरन्त या वारांगनेशी ओळख करून दिली होती. मेरीचा जन्म १८४९ मधला. वयाच्या पंधराव्या वर्षी तिचं लग्न एका दिवाळखोर दाणेवाल्याशी झालं होतं. सात महिन्यात ती त्याच्यापासून विभक्त झाली होती. त्यानंतर जवळ जवळ बारा वर्ष 'थेआत्र दयू चारलेत' येथे तंग कपड्यात तिनं प्रथम अंगप्रदर्शन केलं होतं आणि नंतर नटी बनण्यासाठी अधिक वस्त्रं अंगावर चढवली होती. १८७० च्या अखेरीस ती डॉ. थॉमस इव्हान्सची मिस्ट्रेस बनली होती. हा तिसऱ्या नेपोलियनचा प्रख्यात अमेरिकन दंतवैद्य. डॉक्टर महाशय सधन होते, उदार होते. त्यांच्या मनात असूयेला थारा नव्हता. रू द रोम येथील आपल्या 'कन्सल्टिंग रूम' शेजारी त्यांनी तिला एक अपार्टमेंट घेऊन दिलं होतं. कवी आणि चित्रकार यांच्याबरोबरचं तिनं वर्तन स्वैर झालं तरी त्यांनी त्याबद्दल कधी हरकत घेतली नव्हती. त्यांचा एकच दंडक होता, दर दिवशी ते तिला लंचसाठी बोलवत तेव्हा कोणताही अडसर असता कामा नये. पुढं प्रख्यात इम्प्रेशनिस्ट चित्रकार मोने याची ती मॉडेल आणि मिस्ट्रेस बनली होती. मोनेनं आपला कविमित्र मालार्मे याच्याशी तिची ओळख करून दिली होती. १८९३ मध्ये मोनेचं निधन झाल्यानंतर वर्षभरात मालार्मे तिचा प्रियकर बनला होता. १८९८ मध्ये त्याचा मृत्यू होईस्तोवर ती त्याच्या नैराश्यग्रस्त आयुष्यात आनंदाची बरसात करत होती.

ब्वा द बुलोनजवळील ९ बुलव्हार्द लान्न येथील तिच्या सुंदर व्हिलामध्ये रेनाल्डो, प्रूस्त आणि मारी लॉर्डलिंगर यांना घेऊन गेला. १८९७ मध्ये तिच्या घराचं स्वरूप पालटलं होतं. आता ती ऑडेट्टप्रमाणं, जपानी चित्रकलेच्या प्रेमात पडली होती आणि इथंच प्रूस्तला ऑडेट्टचा जिना छोटेमोठे दिवाणखाने आढळून आले.

मादम लोरान्त उंच होती. वर्ण, तांबूस. केस, पिंगट सोनेरी कमानदार भिवयाखालील नजरेत विस्मय. कवींबद्दलचं तिचं प्रेम एवढं उत्कट होतं की जॉर्ज मूर तीला 'तूत ला लीर' या नावानं संबोधत असे. अशी आख्यायिका प्रस्तृत होती की ती मूरला आपल्या शयनगृहात घेऊन गेली होती तेव्हा तिचा संकेत ध्यानी न आल्यामुळं तो धापा टाकण्याऱ्या 'रोहीमा-श्यागत' तिथं बघत उभा राहिला होता. अखेर ती त्याला म्हणाली होती, 'माझ्या बेडरूममध्ये आपण आणखीन काही काळ राहाण्यात काही अर्थ आहे असं मला वाटत नाही.' आणि ती त्याला बाहेर घेऊन आली होती. तिचे यार बरेच होते पण त्याबाबत मालार्मेनं खळखळ केली नव्हती. परंतु तिच्या भोवती ड्रायफसवादी तरुण मंडळीचं नवं कोंडाळं जमू लागताच मात्र तो थोडासा अस्वस्थ झाला होता. एका संध्याकाळी रेनॉल्डो, प्रूस्तला घेऊन मेरीच्या घरी गेला. खास व्हिसलरच्या भेटीसाठी. तो रस्कीनचा कट्टर प्रतिस्पर्धी म्हणून प्रसिद्ध पावला होता आणि प्रूस्तला नुकतंच रस्कीनमध्ये स्वारस्य निर्माण झालं होतं. संभाषणाच्या ओघात व्हिसलरनं ठाम शब्दात सांगितलं, 'पेंटिंगबद्दल रस्कीनला काडीचंही ज्ञान नव्हतं'; तरीही प्रूस्तनं त्याची खुषामत करून रस्कीनबद्दल काही चांगल्या गोष्टी त्याला ऐकवल्या. त्यानंतर चित्रकार निघून गेला. आपले हातमोजे विसरून. प्रूस्तनं त्यांचा स्मृतिचिन्हं म्हणून अपहार

केला. डॉ. इव्हान्स आणि मालामें यांचं निधन झाल्यानंतर लोरान्तचं उशिरा बहराला आलेलं सँलाँ कोमेजून गेलं.

ऑगस्टमध्ये प्रूस्त क्रेडझनाक येथील 'कुरहॉस ऑतेल'मध्ये राहिला. सुरवातीला हवा चांगली होती, कोरडीही होती, तरीही दम्यानं तो बेजार झाला. त्याचं कारण, त्याच्या मते, त्याच्या खोल्या तळमजल्यावर होत्या. नंतर पाऊस पडू लागला. हवेत गारठा आला. असं असूनही त्याच्या व्याधीचा जोर कमी झाला. या काळाज तो 'झाँ सान्तेय'च्या लेखनात गढून गेला. 'एखादं पत्र लिहिणंही मला जमत नाही, कारण कामात मी पुरता बुडून गेलो आहे.' या सुट्टीत आणि नंतरही मार्सेल व रेनाल्डो यांनी पुन्हा रेव्हिल्लॉला यावं असं मादम लमेरला वाटत होतं. तिनं त्या दृष्टीनं प्रयत्नही केले पण तिला यश आलं नाही.

१६ डिसेंबर १८९७ रोजी आल्फोन्स दोदे मरण पावला. प्रूस्तच्या लेखी, लेखक म्हणून त्याचा दर्जा येओफिल गॉतिए आणि जॉर्ज सॅन्ड यांच्या बरोबरीचा होता. परंतु त्याच्या अंतकाळी जेव्हा प्रूस्त त्याच्या सान्निध्यात आला होता. तेव्हा त्याच्या प्रेमळ वागण्यानं तो भारावून गेला होता. यातना आणि पक्षाघात यांच्याशी धीरोदात्तपणे तो झुंज देत असल्याचं. पाहून त्याच्याविषयी त्याला आदर वाटू लागला होता. आणि आपला मुलगा लूसिएँच्या या मित्राच्या बुद्धीनं आल्फोन्स दोदे प्रभावित झाला होता. अगदी सुरुवातीपासून प्रूस्तची पत्रं त्यानं थोरमाणसांचा मौल्यवान पत्रव्यवहार समजून जतन केली होती. त्याच्या पत्रात मानसशास्त्रीच मर्मदृष्टी आढळताच कौतुकानं तो उद्‌गारत होता, 'मार्सेल प्रूसत स्वत:च एक "डेव्हिल" आहे.' आपल्या अभ्यासिकेत त्यानं पाऊल टाकताच तो हसून त्याचं स्वागत करत होता. त्यानं प्रूस्तला एकदा सांगितलं होतं, 'माझ्या लाडक्या पोरा, तुझ्या आयुष्यातील मोठ्ठाला धोंडा होणार आहे तुझी तब्येत' त्याच्या या उद्‌गारानं 'झाँ सान्तेय'साठी एक आशयसूत्र आणि निवेदकाबद्दलच्या बोरगोट्टच्या भाकिताची सूचना मिळाली होता

वडलांच्या मृत्यूनं लूसिएँ उदास झाला होता, रडत होता. प्रूस्त आणि रेनाल्डो तीन दिवस त्याच्या सन्निध राहिले. २१ तारखेला झोला, द्रूमाँ आणि आनातोल फ्रांस मृत लेखकांवरील प्रेमापोटी आपापसातलं वैर क्षणभर विसरून अंत्ययात्रेत सामील झाले. त्यांच्यापाठोपाठ प्रूस्त आणि रेनाल्डो. प्रूस्त अधूनमधून घाईघाईनं पुढं जाऊन लूसिएँचा हात हाती घेऊन त्याला धीर देत होता. त्या संध्याकाळी प्रूस्त त्याला पुन्हा भेटला आणि त्याला म्हणाला की त्यानं झोपण्याचा प्रयत्न करावा. आल्फोन्स दोदे याच्या मृत्यूनं एक युग समाप्त झालं होतं, सतरा वर्षांनी प्रूस्तला जसं वाटलं होतं की काल्मेत्त आणि ॲगोस्तिनेल्ली यांचे मृत्यू म्हणजे महायुद्धाची नांदी, तद्वतच आल्फोन्सच्या निधनानं ड्रायफस प्रकरणाला खराखुरा प्रारंभ करून दिला होता आणि 'गॅर्मांत मार्गा'च्या बोळाची समाप्ती केली होती. **(क्रमशः)**

---

मरण म्हणजे जीवंत असलेल्यांचे भक्ष बनणे.

**– जाँ पॉल सार्त्र**

# लेखकाची बांधिलकी आणि समाज समीक्षा

## आल्बेर कामू आणि अल्जेरियन युद्ध

**- जयश्री जुन्नरकर**

**एक**

**आल्बेर कामू यांच्या जीवनातील प्रमुख घटना**

इ. स. १९१३ ७ नोव्हेंबर रोजी अल्जेरियातील मान्डोव्ही येथे आल्बेर कामू यांचा जन्म.

इ. स. १९१४ आल्बेर कामू यांचे पिताजी लुसियन यांचा मृत्यू. कामू कुटुंब स्थलांतर करून अल्जियर्स शहरात स्थाईक होते.

इ. स. १९२० आल्बेर कामू यांचे वडील पहिल्या महायुद्धात मारले गेले असल्याकारणाने फ्रेंच राष्ट्र त्यांचे पालक होते.

इ. स. १९२३ ऑक्टोबर कामू यांचा दुसऱ्या इयत्तेत प्रवेश. लूई जरमेन हे त्यांचे वर्गशिक्षक. कामूनी नोबेल पारितोषिक स्वीकारताना केलेले भाषण त्यांना अर्पण केलेले आहे.

इ. स. १९२४ जून अल्जियर्समधिल महाशाळेत प्रवेश (GRAND LYCÉE) मिळविण्यासाठी कामू स्पर्धा परीक्षेस बसतात.

इ. स. १९२४ ऑक्टोबर महिन्यात त्या शाळेत प्रवेश मिळविण्यात यशस्वी. फ्रेंच व लॅटीन या भाषांची अभ्यासाकरता निवड.

इ. स. १९२९ ऑक्टोबर : सहाव्या इयत्तेत.

इ. स. १९३० बाक्कालोरेआत (BACCALAURÉATE) परीक्षेचा पहिला भाग उत्तीर्ण.
ऑक्टोबर महिन्यात तत्त्वज्ञान या विभागात दाखल होतात.
जाँ ग्रेनिएर हे तत्त्वज्ञान विषयाचे प्राध्यापक
डिसेंबर महिन्यात कामूना क्षयरोग झाल्याचे निदान.

इ. स. १९३२ बाल्कालोरेआत परीक्षेचा दुसरा भागही उत्तीर्ण.
विद्यार्थ्यांच्या मासिकातून कामूंचे लिखाण प्रसिद्ध होण्यास सुरुवात होते. ते INTUITIONS (अंत:स्फूर्ती) या नावाच्या गद्यकविताही करतात.

इ. स. १९३३ विद्यापीठात प्रवेश रेने पोईरीएर आणि जाँ ग्रेनाएर हे त्यांचे प्राध्यापक.

इ. स. १९३४ सिमोन हीए या सुस्वरूप तरुणीशी १६ जून रोजी विवाह.

इ. स. १९३५ कम्युनिस्ट पक्षात प्रवेश

THÉATRE DU TRAVIL कामगार रंगभूमी या संघटनेची स्थापना.

इ. स. १९३६ — आँद्रे मार्लो या प्रख्यात फ्रेंच लेखकाच्या कादंबरीवरून TEMPS DU MEPRIS (तुच्छता दर्शविण्याचा काल) या नावाचे एक नाटक कामगार रंगभूमीसाठी तयार करतात.

जानेवारी महिन्यात या नाटकाचा प्रयोग होतो.

मे महिन्यात RÉVOLTE DANS LES ASTURIES (आस्टरीज मधील बंड) हे नाटक प्रकाशित होते. कामूंच्या मार्गदर्शनाखाली या नाटकाचे सामुदाईकपणे लिखाण होते. असे होते तरी त्यातील बहुतेक भाग कामूंनीच लिहिलेला होता. 'कामगार रंगभूमी' या नाटकाचे प्रयोग करीत असे.

उन्हाळ्यात कामू मध्य-युरोप आणि इटाली या देशातून सफर करून येतात.

प्रथम पत्नी विभक्त होते.

इ. स. १९३७ — कामू आणि त्यांचे मित्र अल्जेरियाच्या संस्कृतीचा प्रसार व संवर्धन करण्यासाठी MAISON DE LA CULTURE (संस्कृती सदन) ही संस्था स्थापन करतात.

१० मे रोजी शारलेट हे कामूंचे L'ENVERS ET L'ENDROT (ना इकडे ना तिकडे) हे पुस्तक प्रकाशित करतात.

ऑगस्ट. पॅरीस शहरास पहिली भेट. कामूंनी लिहिलेल्या LA MORT HEUREUSE (आनंदी मरण) या कादंबरीसाठी अगदी तपशिलात जाऊन जुळवा जुळव व संशोधन, ही कादंबरी त्यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाली. फ्रान्स व इटाली या देशातून प्रवास.

'नाट्य-संघ' या नव्या संघटनेची स्थापना. कम्युनिस्ट पक्षातून काढून टाकण्यात येते.

डिसेंबर अल्जेरियातील हवामान संशोधन संस्थेत नोकरी.

इ. स. १९३८ — RIVAGES ('किनारे') या मासिकाच्या संपादनात सहाय्य.

द. शारलोट या प्रकाशन संस्थेचे वाङ्मयीन सल्लागार. 'D'ALGÉR RÉPUBLICAN 'आल्जेरियन प्रजासत्ताक' या वृत्तपत्राची निर्मिती : या वृत्तपत्रात पास्काल मिआ आणि कामू यांनी एकत्र काम केले.

इ. स. १९३९ — २३ मे रोजी कामू यांचे NOCES (मिलन) या गद्यकाव्य पुस्तकाचे प्रकाशन.

सप्टेंबर SOIR RÉPUBLICAN (सांज-प्रजासत्ताक) या वृतपत्राची निर्मिती. कामूंची संपादक म्हणून नेमणूक.

इ. स. १९४० प्रथम पत्नी सिमोन हिच्याबरोबरच्या घटस्फोटातबावत कोर्टाने निर्णय दिला. मार्च PARIS - SOIR 'सांज-पॅरीस' या वृत्तपत्रात काम करण्यासाठी पॅरीस येथे स्थलांतर. युद्धकाळात प्रथम क्लेरमाँट फोरे नंतर लिआँ येथे जे निर्वासितांचे लोंढे जात होते त्यात सामील होऊन स्थलांतर.

इ. स. १९४० ३ डिसेंबर रोजी फ्रानसिन फारे यांच्या बरोबर विवाह.

इ. स. १९४१ ORAN या ठिकाणी वास्तव्य. LA PÉSTE (प्लेगची साथ) या पुस्तकाच्या लेखनास आरंभ. लिब्रेर गालीमार्ड या प्रकाशन संस्थेस L'ÉTRANGER, MYTHE DE SISYPHE, CALIGULA (परका, सिसफिसची मिथ, कॅलीगुला) ही ती पुस्तके प्रकाशनासाठी सादर.

इ. स. १९४२ १५ जून रोजी L'ÉTRANGER लेट्राँनजेर प्रकाशित होते.
१६ ऑक्टोबर रोजी सिसफिसची मिथ प्रकाशित.

इ. स. १९४३ LES CAHIER DU SUD (दक्षिण नोंदवह्या) या नियतकालींकासाठी सार्त्र L'ÉTRANGER या कादंबरीचे विश्लेषण करतात.
डिसेंबर - लिब्रेर गालीमार्ड या प्रकाशन संस्थेत कामू यांची लेखकांनी प्रकाशनासाठी पाठविलेल्या साहित्याचे वाचन व त्याचे मूल्यमापन करण्यासाठी नेमणूक.

इ. स. १९४४ MALENTENDU (गैरसमज) या नाटकाचा पहिला प्रयोग जून महिन्यात झाला. मारीया कासारेस यांनी कामूना सहाय्य केले होते. भूमिगत वृत्तपत्र COMBAT (संघर्ष) साठी काम. फ्रान्समधून जर्मन पराभूत होऊन गेल्यानंतर या भूमिगत पत्राचे दैनिकात रूपांतर झाले.

इ. स. १९४५ अल्बेरियातील SÉTIF सेटीफ या ठिकाणी राष्ट्रवादी उठाव झाला, त्यावेळी कामूंनी अल्जेरियाला भेट दिली.
५ सप्टेंबर रोजी कन्या जाँ आणि कथरीन यांचा जन्म.
त्याच महिन्यात 'कॅलीगुला' नाटकाचा पहिला प्रयोग झाला.

इ. स. १९४६ मार्च ते जून या महिन्यात अमेरीका व कॅनडा या देशास भेट.

इ. स. १९४७ ३ जून रोजी क्लोद बुरडेट यांच्या हवाली कामू आणि त्यांच्या मित्रांनी कॉम्बॅट हे दैनिक केले.
१० जून रोजी LA PÉSTE (प्लेगची साथ) या पुस्तकाचे प्रकाशन.

इ. स. १९४८ ऑक्टोबर महिन्यात L'ÉTAT DE SIEGE (मार्शल लॉ) या नाटकाचा पहिला प्रयोग.

| | |
|---|---|
| इ. स. १९४९ | उन्हाळ्यात अमेरीकेला भेट. क्षयरोगाने पुन्हा एकदा डोके वर काढले. डिसेंबर महिन्यात JUSTE या नाटकाचा पहिला प्रयोग. |
| इ. स. १९५१ | L' HOMME RÉVOLTE [ बंडखोर मानव (मानवाचे बंड) ] या पुस्तकाचे प्रकाशन. |
| इ. स. १९५२ | सार्त्र आणि त्यांचे मासिक LES TEMPS MODERNES (आधुनिक काळ) यांच्याबरोबर वाद. |
| इ. स. १९५३ | आननेरस येथिल नाट्यमहोत्सवात जून महिन्यात सहभाग. |
| इ. स. १९५४ | L'ÉTÉ (उन्हाळा) या पुस्तकाचे वसंत ऋतूत प्रकाशन. |
| इ. स. १९५५ | L'ÉXPRESS हे मुळात साप्ताहिक होते. कालांतराने त्याचे दैनिकात रूपांतर झाले. या साप्ताहिकात व दैनिकात कामूंचे या कालखंडात लेखन. |
| इ. स. १९५६ | २२ जानेवारी रोजी अल्जेरियात शस्त्रासंधी व तह व्हावा यासाठी कामू आवाहन करतात.<br>मे महिन्यात LA CHUTE (पतन) या गोष्टींचे प्रकाशन.<br>२२ सप्टेंबर रोजी REQUIEM PUR UNE NONNE (एका जोगिणीला शेवटचा निरोप) या नाटकाचा पहिला प्रयोग. हे नाटक प्रख्यात अमेरीकन लेखक विल्यम फॉकनेर यांच्या एका साहित्यकृतीवर आधारित होते. |
| इ. स. १९५७ | L'EXIL ET LE ROYAUME (हदपारी, आणि साम्राज्य) या पुस्तकाचे प्रकाशन. या नंतर आर्थर कोईस्लर या प्रख्यात लेखकांबरोबर सहकार्य करून RÉFLÉXIONS SUR LA PEINE CAPITAL (फाशीच्या शिक्षेबद्दलचे विचार व चिंतन)<br>याच वर्षाच्या ऑक्टोबर महिन्यात कामूंना नोबेल पारितोषिक मिळाल्याचे जाहीर झाले. डिसेंबर महिन्यात पारितोषिकाचा स्वीकार. |
| इ. स. १९५८ | चार्लस डि गॉल पुन्हा एकदा सत्तेवर आल्यानंतर थोड्याच दिवसांनी त्यांची आणि कामूंची भेट होते. (फ्रेंच) राष्ट्रवादी मुसलमानांना झुकते माप द्यावे या धोरणाचा पाठपुरावा. एका नाट्यगृहासाठी दिग्दर्शन पत्करण्याची योजना. |
| इ. स. १९५९ | POSSÉDÉS या नाटकाचा जानेवारी महिन्यात प्रथम प्रयोग, LE PREMIER HOMME (पहिला मानव) या कादंबरीचे लेखन. ही कादंबरी अपूर्णच राहिली. |
| इ. स. १९६० | ४ जानेवारी रोजी आल्बेर कामू यांचा मृत्यू. |

## दोन

### (१) कामूंचे बालपण व तारुण्य

फ्रेंच साम्राज्यात समाविष्ट असलेल्या उत्तर आफ्रिकेतील आल्जेरियातील, कॉनस्टानटीन जिल्ह्यातील मॉनडोव्ही या छोट्या खेडेगावात नोबेल पारितोषिक विजेते प्रख्यात फ्रेंच लेखक आल्बेर कामू यांचा जन्म ७ नोव्हेंबर १९१३ रोजी झाला. ल्यूसियन कामू यांचे ते द्वितीय चिरंजीव. फ्रान्स, जर्मनी यांच्या सीमेवरच्या या दोन देशात त्या काळी वादग्रस्त ठरलेल्या आल्साटिआन (ALSATIAN) या विभागातून ते अल्जेरियात स्थलांतर करून आले होते. शेत मजूर हा त्यांचा मूळ व्यवसाय. यदाकदाचित, त्यांनी व्यवसाय बदलून बढती करून, तत्कालीन फ्रान्समध्ये मद्य साठविण्यासाठी जी तळघरे तयार केलेली असतात, त्यावर त्यांची बढती झालेली असावी. कामूंच्या आईचे नाव कॅथरीन सिनटेस. ही मुळातील माजोरकानस्पॅनिश. इ. स. १८७० पासून कामूंचे पूर्वज अल्जेरियात वस्ती करून होते. कामू एक वर्षाचे होत आहेत, तोच त्यांचे वडील फ्रेंच सैन्यात दाखल झाले. वास्तविक त्यांच्या पूर्वजांना आल्जेरियात येऊन चांगले अर्धे शतक लोटले होते. असे होते तरीही ते फ्रान्स हाच आपला देश आहे असे मानीत. म्हणूनच इ. स. १९१४ साली युद्धास सुरुवात झाल्याबरोबर, फ्रेंच सैन्यात दाखल होण्यासाठी त्यांनी फ्रान्सला प्रयाण केले. मार्ने येथिल पहिल्या लढाईतच ते जबर जखमी झाले व त्यातच त्यांना मृत्यू आला. थोडक्यात आल्बेर कामू यांनी आपल्या वडिलांना कधीही पाहिले नव्हते. विधवा कॅथरीन कामू आपल्या विधवा आईकडे रहाण्यास गेली. त्यांची आई अल्जियर्स शहरातील बेलकार्ट या कामगार वस्तीच्या भागात रहात असे. कॅथरीन सिनटेस याना लिहिता वाचता येतच नव्हते. केरवारा घरकाम करून कॅथरीन आपल्या कुटुंबाचे पोट कसेवसे भरत असे. प्रेमळ बाई. त्यांच्या कानाला झालेल्या रोगाकडे दुर्लक्ष झाल्याकारणाने ती बहिरी झाली होती. या बाईने आपल्या एकंदर आयुष्याबद्दल कधीही तक्रार केली नाही. कामूंचा वडील भाऊ, लुसियन, पक्षघात झाल्याने अपंग झालेले कामूंचे काका, आजी आणि खुद्द आल्बेर कामू या सर्वांचा भार त्या निरक्षर बाईच्या डोक्यावर होता. ही सारी मंडळी दोन खोल्यांच्या एका ब्लॉकमध्ये रहात असत. L'ENVERS ET LIENDROST 'ना इकडे ना तिकडे' हे कामूंचे पहिले पुस्तक. या पुस्तकात आत्मचरित्रात्मक निबंध आहेत. त्यातील एका लेखात आपल्या आईचे त्यांनी हृदयस्पर्शी चित्र रेखाटले आहे.

"मुलगा जसा गप्प व शांत होता, तशीच त्याची आई देखील होती. काही वेळा तिला जेव्हा विचारण्यात येई, तू कशाबद्दल विचार करीत आहेस? कशाबद्दलही नाही. हेच उत्तर तिच्याकडून मिळण्याची शक्यता आणि ते खरंच होतं. तिच्या अवती भोवती सर्व काही होतं. म्हणूनच ती कशाबद्दलच विचार करीत नसे. ज्यात दिलचस्पी होती अशा गोष्टी, तिची मुले हे तिचे सर्वस्व होते. ती आजारी होती. आणि विचार करताना तिला कष्ट होत. तिची आई ही कठोर आणि दुसऱ्यावर हुकुमत गाजविण्यासाठी आतुर असलेली. तिचा दुराभिमान फाजील

संवेदनाक्षम. त्याच्या परिपूर्तीसाठी ती साऱ्या गोष्टींचा बळी देण्यास तयार होती. अनेक वर्षे ती आपल्या मुलीच्या अधुऱ्या मनावर हुकुमत गाजवीत होती. लग्न झाल्याने त्या मुलीची सुटका झाली होती. पण ती तात्पुरतीच ठरली. वैधव्य आल्याकारणाने हात बांधल्यागत ती मुलगी आपल्या आईकडे परतली होती. लोक म्हणत तिच्या नवऱ्याला 'वीरांचे
मरण आले.' घरातल्या लक्षणीय जागी, त्याने मिळविलेली पदके एका सोनेरी चौकटीत टांगलेली आढळली असती. त्याच्या शरीरातून काढलेल्या गोळ्या देखिल रुग्णालयाने या विधवा वीरपत्नीकडे धाडून दिल्या होत्या. विधवेने त्या ठेवून घेतल्या. कसलेही व कशाबद्दलही दु:ख करण्याचे तिने केव्हाच थांबविले होते. ती आपल्या नवऱ्याला केव्हाच विसरली होती. असे होते तरीही ती आपल्या मुलांच्या पित्याबद्दल बोलतच असे. आपल्या मुलांचे किमान संगोपन व्हावे यासाठी ती मोलमजुरी करण्यास बाहेर पडे आणि जी काही मिळकत होई ती आपल्या आईच्या स्वाधीन करीत असे. अशी ही तिची आई हातात चाबूक घेऊनच आल्या नातवंडांना वागवित होती. या आजीबाई आपल्या नातवंडांना जेव्हा-केव्हा खूपच चोप देत तेव्हा कन्या आपल्या आईला म्हणे, 'त्यांच्या डोक्यावर प्रहार करू नकोस' याचे कारण ती तिची मुले आहेत, आणि त्यांच्यावर तिचे जिवापाड प्रेम आहे. ती आपल्या मुलांच्यावर सारख्याच प्रमाणात प्रेम करते पण तिने त्या मुलांना कधीही प्रकटपणेते दर्शविले नाही. या मुलाला आता असेही आठवते की काहीवेळा संध्याकाळी, आपल्याला थकविणाऱ्या घरकामातून ही आई परतल्यानंतर तिला असे आढळून येई की घरात कोणीच नाही. म्हातारी आजी बाजारहाट करण्याकरता बाहेर गेलेली असे. मुले अजून शाळेतच होती. मग अशा वेळी ती पायाची जुडी करून खुर्चीत बसे. ती खास करून कोठच्या एखाद्या गोष्टीकडे पहात होती असे नाही. ती जमिनीवर पडलेली एखादी भेग पहात असे, तिचा मागोवा घेत स्वत:ला हरवून घेत असे. तिच्या अवती-भोवतीच्या ज्याची पुनर्प्राप्ती होणार नाही, अशी एकांतातील शांतता अधिक घनदाट होत असे. आपले मूल अवेळीच नेमके परत आले असते तर, त्या थकलेल्या शरीराच्या सांपळ्याची अगदी क्षीण छाया, त्या मुलाला ओळखता आली असती. आणि ते मूल घरातच थबकले असते. तो मुलगा भ्याला आहे. अनेक गोष्टींची त्याला जाणीव होण्यास आरंभ होतो. तोवर आपल्या स्वत:च्या अस्तित्वाबद्दल त्याला फारच क्वचित जाणीव असे. परंतु एखादा मुका प्राणी गप्प असतो, त्या शांततेसमोर, डोळ्यात अश्रू आहेत या प्रकारे तो हे सारे सोसतो. त्याला आपल्या आईबद्दल अनुकंपा वाटते. तिच्या जीवनाबद्दल त्याला कणव येते. तिच्या परिस्थितीबद्दल दु:खही वाटते. परंतु हे सारे तो तिच्यावर प्रेम करतो या सारखेच आहे का? या मातेने त्याचे कधीही चुंबन घेतले नव्हते, अगर त्याचे कौतुकही केले नव्हते. याचे कारण या भावना कशा व्यक्त करतात, हे तिला माहीतच नव्हते. म्हणूनच तो स्तब्धपणे उभा राहतो. आणि बराच वेळ तिच्याकडे टक लावून पहातो. आपण तिच्यापासून अलग झालो आहोत. असे जेव्हा त्याला वाटू लागते तेव्हा सुखी-समाधानी

नसण्याच्या तिच्या अवस्थेची त्याला जाणीव होते. तो जे काय बोलतो हे तिला ऐकूच येत नाही, याचे कारण ती बहिरी आहे. थोड्याच वेळात आजी परतून येईल; आणि दैनंदिन जीवनाला पुन्हा एकदा सुरुवात होईल. आरडाओरड, गावरान रांगडे आविष्कार, मेणकापड, तेलाच्या दिव्याने टाकलेला प्रकाशाचा गोल, इत्यादी. ती शांतता, श्वास टाकायला जागा आहे याची ती खूण आहे. अगदी न मोजता येईल इतक्या दूरवर पसरलेली शांतता. या सर्वांमुळे एक गोष्ट घडते. या मुलाला आपल्या आईबद्दलच्या प्रेम-भावनेचा उमाळा, आतूनच येत आहे याचे भान येते. आणि सरतेशेवटी त्याला जे शक्य असेल ते त्याने केलेच पाहिजे याचे कारण ती त्याची आई आहे. आल्बेर कामूंच्या मनात आपल्या आईबद्दलची ही भावना सदैव जागृत होती अगदी नोबेल पारितोषिक स्वीकारतानाही.

पित्याचे सुख नव्हते. शिवाय आपल्या मातेबद्दल त्यांच्या मनात जी उत्कट भावना होती. तिला आविष्कृत करण्याला, तिला वाट करून देण्याबाबत त्यांना अडचण वाटत होती. या सर्वांचा त्यांच्या लिखाणावर निर्णायक परिणाम झालेला दिसतो. विशेषत: ला पेस्ट (प्लेगची साथ), लेट्रॉनजेर (OUTSIDER) आणि मलेनतान्दू (गैरसमज) या त्यांच्या साहित्यकृतीवर हा परिणाम अगदी स्पष्टपणे आढळतो. या शिवाय पित्याचे सुख न लाभणे आणि आईबद्दलचे पराकोटीचे प्रेम, या एकमेकांशी सुसंगत नसलेल्या भावनांचा परिणाम कामूंच्या राजकीय आणि सामाजिक विचारावरही झालेला आढळून येतो. त्यांनी भविष्यकाळात जे लिखाण केले, त्यातील या दोन महत्त्वाच्या पैलूमुळे ते तत्कालिन व समकालीन आधुनिक फ्रेंच बुद्धीजीवी-विचारवंतापेक्षा अगदीच वेगळे होते, हे फारच उठून दिसते. उदा. त्यांचा फाशीच्या शिक्षेला असलेला विरोध आणि अल्जेरियातील मुसलमान व फ्रेंच या दोघांच्याही मानवी हक्कांचा आदर केला जावा हा त्यांचा आग्रह. त्यांच्या आपल्या पित्याबद्दलच्या 'आठवणी' तशा थोड्याच होत्या. पुढील आठवण सुद्धा त्यांच्या आईने त्यांना जे काही सांगितले त्यावरून त्यांच्या मनात घर करून होती. परंतु त्यामुळेच कामूंची फाशीच्या शिक्षेबद्दलची मते तयार झाली होती. त्यांनी आपल्या RÉFLEXIONS SUR LA GUILLOTIN (फाशीच्या शिक्षेबद्दलचे चिंतन) या इ. स. १९५७ साली प्रसिद्ध झालेल्या पुस्तकात ही आठवण नमूद केली आहे. ती आठवण अशी. अल्जेरियात एका माणसाने एका छोट्या शेतकरी कुटुंबातील सर्वांचाच खून केला होता. त्याला फाशीची शिक्षा झाली. कामूंच्या पिताजींनी ही शिक्षा कार्यवाहीत जेव्हा आणली जात होती तो प्रसंग, प्रत्यक्ष जाऊन पहाण्याचे ठरविले,आणि त्याप्रमाणे ते गेलेही. परंतु या भेटीपूर्वी अनेक मित्रांजवळ ते बोलले होते, 'खरे म्हणजे फाशी ही शिक्षा तशी सौम्यच आहे.' गुन्हेगाराला ती शिक्षा सौम्य वाटावी अशी ती आहे. परंतु शिक्षा दिली जात होती त्या प्रसंगी हजर राहिल्यानंतर तेथे जे काही त्यांनी बघितले, जे काही झाले ते त्यांनी आपल्या पत्नीला कधीही सांगितले नाही. कामूंच्या आईने त्यांना सांगितले की तुझे पिताजी दरवाजा लोटून घरात आले, त्यांचा चेहरा काहीतरी



अनुक्रमणिका

भयावह पाहिले आहे असा काळवंडलेला होता. घरात आल्याबरोबर त्यांनी धाडकन बिछान्यावर अंग टाकले आणि ते कमालीचे आजारी झाले. या विषयी कामू यांनी इ. स. १९५७ मध्ये लिहिले आहे,'फाशीच्या शिक्षेतील भयावहता लपविण्यासाठी उच्च विचार प्रदर्शित करणारे जे शब्दसमूह वापरण्यात येतात, त्याच्या मागे काय दडलेले आहे, याची जाणीव त्यांना नुकतीच झाली होती. या पिताजींच्या मुलाने, पुढे जे जे काही लिहिले, त्यात या वास्तवाचा संदर्भ तो पुन्हा पुन्हा देतो.'

कामूंच्या आईबद्दलच्या आठवणी आणि तिची आर्थिक परिस्थिती यावरून कामूंचे बालपण गरिबीतच गेले होते हे उघड आहे. परंतु कामूंनी स्वत:च लिहिले आहे की या 'गरिबीमुळे' हे बालपण सुखी नव्हते असे नाही. त्यांनी इ. स. १९५८ साली लिहिले आहे, 'मी जर कधी सुखी नसलोच तर गरिबी हा त्याचा मूळ स्रोत नव्हता. याचे कारण सूर्य त्या 'गरिबीवरून' आपले वैभव उधळून टाकीत होता.' कामूंना आपल्या स्वत:कडे अमर्याद ताकद आहे याचे भान होते. परंतु त्या ताकदीला पूर्णपणे आविष्कृत करण्यात अडचण होती. ही अडचण आपल्याकडे पैसे नाहीत, आपण गरीब आहोत या वास्तव परिस्थितीतून उद्भवलेली नव्हती. या उलट अल्जेरियातील राजकीय आणि सामाजिक जीवनात 'पूर्व ग्रह आणि मूर्खपणा' यांनी अगदी खोलवर जाऊन आपले पाय रोवलेले होते, हा त्या अडचणीचा मूलस्रोत होता. असे होते तरी कामू हे कधीच कडवट अगर दुसऱ्याचा दु:स्वास करणारे झाले नाहीत. याला अपवाद फक्त इ. स. १९५२ साली सार्त्रनी त्यांच्यावर जो हल्ला केला व त्यातून जे वादंग निर्माण झाले त्या प्रसंगाचा. एवंच कामूंचे बालपण हे नुसतेच सुखी व आनंदी नव्हते, तर उमेद आणि काहीतरी कर्तृत्व करून दाखविण्याची उभारी - या विचारांनी त्या सुखावर कळस चढविलेला होता.

गरिबी असलेल्या कुटुंबातील मुलाला पहिल्या प्रतीचे सोडाच पण चांगले शिक्षण मिळणेही जवळ जवळ अशक्य असते. परंतु फ्रेंच शिक्षण पद्धतीने ही विषमता भरून काढण्याचा प्रयत्न केला होता. किमानपक्षी युरोपीय संस्कृतीतून आलेल्या हुषार मुलांना शिक्षण मिळेलच अशी व्यवस्था त्या पद्धतीत होती. फ्रेंच राज्यक्रांतीने उद्घोषिलेल्या 'प्रत्येकाला समान संधी' हे तत्त्व प्रत्यक्ष कार्यवाहीत आणण्याचा तो प्रयत्न होता. इ. स. १९१८ ते इ. स. १९२३ या दरम्यानच्या काळात कामू यांनी बेलकोर्ट विभागातील 'एकॉल कोम्यूनाल' या शाळेत शिक्षण घेतले. या शाळेतील त्यांच्या पहिल्या शिक्षकाचे नाव लुई जरमेन. त्यांनी कामूला पाहिल्याबरोबर लगेच जाणले की विलक्षण बुद्धिवान असा हा विद्यार्थी आहे. शिष्यवृत्ती मिळविण्यासाठी जी परीक्षा असते त्यासाठी कामूंची तयारी करून घेण्याकरता त्यांनी आपला बराचसा वेळ अगदी मुक्तपणे खर्ची घातलाच. पण त्याबद्दल पैसे मागितले नाहीत व घेतलेही नाहीत. आपल्या या विद्यादानातून द्रव्यप्राप्ती होईल अशी कधीही अपेक्षा केली नाही. याचे कारण त्यांना माहीत होते की या स्पर्धा परीक्षेत कामू यशस्वी झाले तर 'लिसे डॅ आल्जेर' या शाळेत त्यांना शिक्षण घेता येईल. इ. स. १९२३ साली या

शिष्यवृत्ती स्पर्धा परीक्षेत, शिष्यवृत्ती मिळविण्यात कामू यशस्वी झाले होते. या नंतर पुढील सात वर्षे कोणताही अडथळा न येता 'लिसी' या शाळेत कामूनी आपला विद्याभ्यास चालू ठेवला होता. कामूंना मुळातच वाचनाची आवड होती. वयाचे तेरावे वर्षे संपते न संपते तोच ते जीद, माँनथेरलांन्त आणि मार्लो यासारख्या प्रख्यात फ्रेंच लेखकांची पुस्तके त्यांनी केव्हाच वाचून टाकली होती. विशेषत: मार्लो या लेखकाचा त्यांच्यावर जबरदस्त प्रभाव होता.

इ. स. १९३० साली त्यांना क्षरोगाची लागण झाली आहे, असे निदान झाले. त्यानंतर त्यांच्या शाळेतील हजेरीत अनियमितता आली. कामू यांनी लुई जरमेन या शिक्षकाचे ऋण जन्मभर लक्षात ठेवले होते. इ. स. १९५७ मध्ये त्यांनी नोबेल पारितोषिक स्वीकारण्याकरता केलेले भाषण कामूंनी ज्या दोघांना अर्पण केले आहे त्यापैकी जरमेन हे एक आहेत. दुसरे आहेत जाँ ग्रेनिएर हे शिक्षक. या शिक्षकाने त्यांना तत्त्वज्ञान आणि वाङ्मय या विषयात कामूनी प्रावीण्य मिळवावे यासाठी प्रोत्साहन दिलेच. फुटबॉल हा खेळही कामूंच्या जीवनाचा एक भाग होण्यास ते कारणीभूत ठरले होते. इ. स. १९२८ ते १९३० च्या दरम्यान अल्जेरियातील रेसिंग विद्यापीठाच्या फुटबॉल संघाचे ते 'गोली' होते. त्यांनी या विषयी जे लिहिले आहे ते विश्वसनीय मानले-तसे न मानण्यास काहीही कारण नाही-तर त्यांनी असे सांगितले आहे की या दोन वर्षातील त्यांचा बहुतेक वेळ व त्यांची शक्ती हा खेळ खेळण्यात आणि त्या संबंधी विचार करण्यातच गेला. या खेळामुळे संघभावना ही किती महत्त्वाची आहे हे त्यांना पटले. थोडक्यात कोणतीही गोष्ट वा सर्व चळवळी संघभावनेचे स्मरण ठेवून करणे हा त्यांचा आवडता छंद होता. ते पॅरीसमध्ये जेव्हा केव्हा रहात असत त्यावेळी शहरात होणारा महत्त्वाचा फुटबॉल सामना ते सामान्यपणे चुकवीत नसत. कामू यांनी एकेठिकाणी सांगितले आहे की त्यांनी नीतिशास्त्राचे धडे फक्त फुटबॉल मैदानावरच घेतले. त्यांचा आणखी एक छंद 'पोहणे'. त्यांनी सर्व आयुष्यभर जवळ जवळ एक धार्मिक कृत्य या स्वरूपात आपला 'पोहणे' हा छंद जपला व जोपासला होता. इ. स. १९३० साली त्यांनी जाँ ग्रेनिएरच्या वर्गात प्रथम प्रवेश केला. त्यावेळी त्यांच्यातील बंडखोरी हा सुप्तगुण लक्षात घेऊन त्यांनी पहिल्या बाकावर बसावे असे सांगण्यात आले. कामूंच्या दुर्दैवाने थोड्याच दिवसांनी त्यांना क्षयरोग झाला आहे हे आढळून आले. मग त्यांचे आयुष्य फार बदलून गेले. एकतर त्यांना आपले घर सोडून घरात फारच माणसे असल्याकारणाने काकांकडे राहावयास जावे लागले. त्तसेच त्यांच्या मनात पदवीधर होऊन शिक्षण क्षेत्रात काही भरीव कामगिरी करावी असा विचार त्यांच्या मनात होता, तो त्यांना सोडून द्यावा लागला. जाँ ग्रेनिएर यांच्या मार्गदर्शनाचा त्यांना कधीच विसर पडला नाही. आपल्या पहिल्या दोन साहित्यकृती कामूंनी त्यांना अर्पण केलेल्या आहेत. जाँ ग्रेनिएरनी आपल्याला तत्त्वज्ञान या विषयाची गोडी लावली असे कामूंनी नमूद केलेले आहे.

कामूंनी घर सोडल्यानंतर ते प्रथम आपल्या काकांच्या घरी राहावयास गेले. हे त्यांचे काका व्यवसायाने खाटीक होते. पराकोटीचे प्रजासत्ताकवादी आणि प्रख्यात फ्रेंच लेखक

व्होलटेर यांच्या मतांचे चहाते. पण थोड्याच दिवसानंतर कामू यांनी स्वतंत्रपणे एकटेच राहावयाचे ठरविले. जमेल त्या प्रमाणात त्यांनी आपले शिक्षण चालूच ठेवले होते. आपला योगक्षेम चालावा यासाठी त्यांनी अनेक नोकऱ्या केल्या. विद्यापीठात शिक्षण घेत असताना डॉक्टर दांपत्याची रूपवती कन्या सिमोन हीए या अल्जेरियन फ्रेंच मुलीशी विवाह केला. हा विवाह यशस्वी ठरला नाही. एका वर्षानंतर ती दोघे विभक्त झाली व पुढे त्यांनी घटस्फोटही घेतला. कामूंच्या राजकीय बांधिलकीला इ. स. १९३३ पासून सुरुवात झाली होती. रोमारोलाँ आणि हेन्री बारब्यूस यांनी स्थापना केलेल्या AMSTERDAM - PLEYEL या फॅसिस्ट विरोधी संघटनेत ते सामील झाले होते. इ. स. १९३४ साली त्यांनी कम्युनिस्ट पक्षात प्रवेश केला, आणि अल्जेरियातील मुसलमानात प्रचार करण्याचे काम त्यांच्यावर सोपविण्यात आले. मोठ्या उत्साहाने त्यांनी या कामात आपणास झोकून दिले होते. पण इ. स. १९३५ साली रशिया आणि फ्रान्स यात मित्रत्वाचा करार झाला, या कारणाने रशियाला आपल्या परराष्ट्र धोरणात बदल करण्याची गरज भासू लागली व तो झालाही. या मित्रत्वाच्या कालखंडात फ्रेंच साम्राज्यातील वसाहतीत जो अन्याय घडला होता त्याकडे कम्युनिस्टांचे 'दुर्लक्ष' होणे स्वाभाविक होते. अल्जेरियातील अरबांकडे जे काही थोडे फार लक्ष देण्यात येत होते, त्याबद्दलची आस्था कमी झाली. कामूंनी या सगळ्या घटनांची नोंद घेतली होती. सरते शेवटी या सर्वाची उबग येऊन त्यांनी कम्युनिस्ट पक्ष सोडला. कामूंनी सांगितल्याप्रमाणे त्यांनी इ. स. १९३५ मध्ये कम्युनिस्ट पक्ष सोडलाही असेल पण त्यांनी त्या पक्षाबरोबर सर्वस्वी फारकत करून घेतलेली नसावी. याचे कारण इ. स. १९३६ साली ते अल्जेरियातील MAISON DE LA CULTURE (संस्कृती सदन) या संस्थेचे प्रमुख होते व ही संघटना कम्युनिस्ट पक्षाच्या नियंत्रणाखाली होती. इ. स. १९३५ सालीच त्यांना हवामान संशोधन संस्थेत नाकरी मिळाली. नोकरीत असताना अल्जेरियातील दक्षिण विभागातील हवेचा दाब पट्टे किती व कसे आहेत यावर त्यांनी अहवाल तयार केला होता. अनेक नोकऱ्या केल्यानंतर सरतेशेवटी ते पत्रकार झाले. मध्यंतरीच्या काळात त्यांनी ज्या अनेक नोकऱ्या केल्या त्यात इ. स. १९३८ मध्ये अल्जियर्स या परगण्यांतील कचेरीत त्यांनी कारकुनी केली; मोटारींचे सुटे भाग विकणाऱ्या एका आयात-निर्यात कंपनीत कारकुनी केली; अशा नोकऱ्या करीत असताना व एरवीही खाजगी शिकवण्या केल्या. शिवाय याबरोबर अभ्यास करून पदवी मिळवावी, लेखक व्हावे आणि अल्जेरियातील आधुनिक व बिनीची नाट्य चळवळ यशस्वी करावी या उद्दिष्टात त्यांनी मुख्यत: जी दिलचस्पी होती, त्यावर त्यांचे जे लक्ष केंद्रित झालेले होते, त्यात काहीही फरक पडला नाही. आपण भारतीय ज्यास बी. ए. म्हणतो त्यासारखी LICENCE लिसानस ही पदवी त्यांनी प्राप्त करून घेतली. त्या परीक्षेचा एक भाग म्हणून त्यांना एक शोध निबंध लिहावा लागला. त्याचा विषय होता METAPHYSIQUE CHRÉTIENNE ET NÉOPLOTONISME (अतिभौतकी ख्रिश्चन

धर्म आणि नवप्लेटोवाद) या निबंधात प्लोटीनसचा ख्रिश्चन संत ऑगुस्टीनवर काय परीणाम झाला याची चर्चा करण्यात आली होती. (प्लोटीनस हा प्लेटोवादी ग्रीक तत्वज्ञ (२०४-२७०) इजिप्तमधील लिसोपोलिस हे त्याचे मूळ गाव. अनेक वर्षे नामवंत तत्वज्ञांकडे शिक्षण घेतल्यानंतर त्यांनी अधिक ज्ञान मिळविण्याकरता, भारत आणि इराण (पार्शिया) या देशांनाही भेट दिली. मध्यंतरी त्यांना अनेक संकटातून जावे लागले. सरतेशेवटी ते रोममध्ये येऊन स्थायिक झाले. या ठिकाणी तत्त्वज्ञान शिकविण्याकरिता त्यांनी शाळा उघडली व ते अत्यंत लोकप्रिय शिक्षक ठरले. वृद्ध, तरुण, स्त्री-पुरुष आणि बुद्धिवान विचारवंत त्यांच्या शाळेत विद्यार्थी म्हणून दाखल होत. प्रामाणिकपणा आणि परखड बोलणे यासाठी त्यांची प्रसिद्धी होती. त्याचा अनुभव आला असल्याकारणाने अनेक धनवान मरतेसमयी आपली सर्व संपत्ती व मुलांची देखभाल प्लोटीनसवर सोपवून सुखाने जगाचा निरोप घेत. उत्तम व प्रभावी वक्ता म्हणूनही त्यांनी तत्कालिन रोमन सिनेट गाजविले होते. एवंच सर्व थरांतील रोमन नागरिकांत ते लोकप्रिय होते. रोमन सम्राट गालीएनस आणि त्यांची पत्नी यांची त्यांच्यावर खास मर्जी होती. पण लोकप्रियतेबरोबर काहींच्या मनात असूया निर्माण होणे, त्यातून शत्रूत्व तयार होणे स्वाभाविक होते. त्यांच्या चाळ्यांना कंटाळून प्लोटीनसनी रोम सोडले आणि ते कामपालीया या गावी जाऊन स्थायिक झाले. त्यांच्या शिष्यांनी त्यांची व्याख्याने लिहून काढली. एकंदर ५४ निबंध उपलब्ध आहेत व त्याचे इंग्लिशमध्ये भाषांतर होऊन ते सहाखंडात प्रसिद्ध झालेले आहे. ख्रिश्चन धर्माचे तत्त्वज्ञान आणि धर्मशास्त्र यावर या शास्त्रज्ञांचा फार मोठा प्रभाव होता) कामू यांच्या या निबंधाबद्दल अमेरिकन प्राध्यापक व्हिग्गीनीआनी यांनी लेख लिहिलेला आहे. कामूंनी हा शोध निबंध फार मेहनत करून, खूप संशोधन करून लिहिल्याचे नमूद केले आहे. पुढे त्यांनी असेही म्हटले आहे की कामूंच्या बाकीच्या लिखाणाला दिसून येणारी शैली व भाषेचा डौल या शोध निबंधात आढळत नाही. या निबंधात कामूंची मतेही वाचावयास मिळत नाही. इतक्या तटस्थतेने तो लिहिलेला आहे. हा शोध निबंध इ. स. १९३६ साली यशस्वीरित्या सादर करण्यात आला. हे सारे यश पदरात पडले होते तरी कामूंनी आपला विद्याभ्यास पुढे चालू ठेवता आला नाही. AGRÉGATION (शिक्षक-सनद) या नावांची स्पर्धा-परीक्षा होती. ही परीक्षा पास झाल्यानंतर कायम-स्वरूपाची प्राध्यापकाची नोकरी मिळत असे. परंतु परीक्षेतील तयारी व्यतिरिक्त या परीक्षेची आणखी एक अट होती. प्रत्येक उमेदवाराची या परीक्षेला बसण्याअगोदर वैद्यकीय तपासणी होत असे. त्यातच कामू 'नापास' झाले. याचे कारण त्यांना क्षयरोग झालेला होता, व तो पूर्णपणे बरा झालेला नव्हता. थोडक्यात त्यांना परीक्षेला बसता आले नाही. इ. स. १९३७ साली कामू पुन्हा एकदा आजारी पडले. फ्रान्समधील आल्पस पर्वताच्या डोंगरात वसलेल्या सॅव्हाय या ठिकाणी जाऊन विश्रांती घेणे त्यांना भाग पडले होते. इ. स. १९३८ च्या ऑक्टोबर महिन्यात ते पत्रकार झाले. या व्यवसायाचे कामूंनी "मला माहीत असलेल्या व्यवसायात उत्तम व्यवसाय" असे त्या व्यवसायाचे वर्णन केलेले आहे.



अनुक्रमणिका

कामू एकीकडे या वेगवेगळ्या नोकऱ्या करीत होते, त्या काळात ते कम्युनिस्ट पक्षाचे सदस्यही होते. याच काळात त्यांनी अल्जेरियातील 'कामगार रंगभूमी' स्थापन करण्यात पुढाकार घेतला. याच रंगभूमीसाठी, इतर बुद्धिजीवी-विचारवंताचे सहाय्य घेऊन कामूंनी आपले पहिले नाटक RÉVOLTE DANS LES AUSTURIES (ऑस्ट्रीरीज मधिल बंड) लिहिले. अत्यंत हिंसक प्रवृत्तींचा प्रचार करणारे हे नाटक आहे. इ. स. १९३४ च्या ऑक्टोबर महिन्यात उत्तर स्पेनमधिल ओव्हीएडो या ठिकाणी खाण कामगारांनी बंड केले होते. पराकोटीची हिंसक अशी दडपशाही करून, हे बंड दडपून टाकण्यात आले. या घटनेवरून स्फूर्ती घेऊन कामूंनी हे नाटक लिहिले होते. या खाण कामगारांची जी राजकीय उद्दिष्टे होती त्यांना उघडपणे या नाटकातून सहानुभूती व्यक्त करण्यात आली असल्याकारणाने, या नाटकाचे जाहीर प्रयोग करण्यावर बंदी घालण्यात आली होती. हे नाटक सामुदायिकपणे लिहिले गेले होते. त्या प्रकारच्या लिखाणाचा तो प्रयोग आहे असे सांगण्यात आले होते, तरी वस्तुत: या नाटकाची संकल्पना कामू यांचीच होती व त्यांनीच त्यातील बहुतेक सर्व भाग लिहिला होता. इ. स. १९३६ साली हे नाटक पुस्तक रूपाने प्रसिद्ध झाले. 'कामगार रंगभूमी'च्या मित्रांनी या नाटकाच्या पुस्तक छपाई व प्रकाशन यासाठी जो खर्च झाला तो केला होता. कामगार रंगभूमीची सुरुवात आँद्रे मार्लो यांची फॅसिझम विरोधी कादंबरी TEMPS DU MEPRIS (घृणास्पद कालखंड) हिच्यावर आधारित केलेल्या नाटकाच्या प्रयोगापासून झाली होती. थोडक्यात 'कामगार रंगभूमी' जी नाटके सादर करीत होती, ती राजकीय प्रचाराचा एक भाग या स्वरूपात. कामूंनी कम्युनिस्ट पक्षाचे त्यागपत्र दिल्यानंतर 'कामगार रंगभूमीचे रूपांतर' 'समूह-रंगभूमीत' झाले. या नव्या रंगभूमीने जी नाटके सादर केली, ती उघडपणे तितकीशी राजकीय नव्हती. असे होते तरी कामगार-रंगभूमीचे लोकांपर्यंत नाटक नेऊन पोचविणे हे जे मूळ उद्दिष्ट होते ते कायमच होते. या उद्दिष्टाची परिपूर्ती करण्याच्या प्रयत्नात त्यांनी अनेक नाटके सादर केली. त्यात डोस्टोएवस्कीच्या THE BROTHERS KARAMAZO (कारमाझो बंधू) या प्रख्यात कादंबरीच्या आधाराने तयार केलेले एक नाटक होते. या नाटकात कामू IVAN इव्हान-त्यांना साजेल-अशी भूमिका करीत होते. त्या भूमिकेला त्यांनी न्यायही दिला होता. या शिवाय बेन जॉनसनचे THE SILENT WOMAN, इ. स. १९३० साली SYNGE या नाटककाराचे THE PLAYBOY OF THE WESTERN WORLD या गाजलेल्या नाटकांचेही प्रयोग या रंगभूमीने केले होते. इ. स. १९३६ आणि इ.स. १९३७ मध्ये रेडीओ अलजिअर्स या गावोगावी फिरून प्रयोग करणाऱ्या नाटक कंपनीत त्यांनी धंदेवाईक नट म्हणूनही काम केले होते. ही नाटक कंपनी प्रामुख्याने जुनी अभिजात नाटके सादर करीत असे. या नाटकातून कामू तरुणाच्या भूमिका करीत. ही सर्व कामे करीत असताना त्यांनी लघु-निबंध लेखनही केले. या लघुनिबंधाचा संग्रह काही वर्षानंतर 'ना इकडे ना तिकडे' या नावाने प्रसिद्ध झाला. शिवाय विद्यापीठात त्यांचा तत्त्वज्ञान या विषयाचा अभ्यास चालूच होता. एवंच गरिबी, राहण्याची अपुरी जागा, आणि कामगार

वस्तीतले वातावरण या सर्वातून कामूंनी आपली बुद्धिमत्ता व कडी मेहनत यांच्या जोरावर सुटका करून घेतली होती. परंतु हा नाट्यसृष्टीतला त्यांचा सहभाग संपतो न संपतो तोच राजकीय पत्रकाराच्या भूमिकेत त्यांनी पदार्पण केले. त्यांनी लिहिलेल्या पहिल्या लेखापासून ते ज्या समाजात रहात होते, त्या समाजाचे आपण परखड टीकाकार आहोत हे त्यांनी दाखवून दिले होते. ते बंडखोर होते हे खरे. परंतु फ्रेंच अल्जेरियात जो अन्याय होत होता, ज्या अनिष्ट प्रवृत्ती होत्या त्यावर ते सातत्याने प्रहार करीत असत. असे होते तरी त्या अल्जेरियन फ्रेंच समाजाविषयी त्यांच्या मनात अप्रीतीची भावना कधीही नव्हती.

ALGER-RÉPUBLICAN 'अल्जेरियाचे प्रजासत्ताक' या वृत्तपत्राचा पहिला अंक ६ ऑक्टोबर १९३७ रोजी प्रसिद्ध झाला. या वृत्तपत्राने पहिल्या अंकातच आपण कामगाराचे वृत्तपत्र आहोत असे जाहीर करून टाकले. पास्काल पिआ हे त्याचे संपादक होते. अल्जेरियात राहणारे फ्रेंच व इतर गोरे युरोपीय आणि मुसलमान या सर्वांनाच सारखे अधिकार मिळाले पाहिजेत, यासाठी प्रयत्नपूर्वक झटणे, हे या वृत्तपत्राचे प्रमुख उद्दिष्ट आहे असेही संपादकांनी सांगितले होते. गौरवर्णीय फ्रेंच, इतर गौरवर्णीय युरोपीय आणि मुसलमान या दोघांच्यातील संबंधाचा परामर्ष घेण्यासाठीच बहुतेक जागा राखून ठेवलेली असे. कामूंनी प्रत्यक्षात आपल्या कामाला सुरुवात साहित्य-समीक्षक म्हणून केली. इ. स. १९३८ आणि इ. स. १९३९ या दोन वर्षात त्यांनी अनेक वेगवेगळ्या लेखकांच्या नाना विषयांवरच्या पुस्तकांवर परीक्षणे लिहिली. या पुस्तकात सार्त्रचे LA NAUSÉE आणि LE MUR, GIONOS (१८९५-१९७०) यांच्या LETTRES AUX PAYSANS SUR LA PAUVRETE ET LA PAIX मॉनथेरलानचे (१८९६ - १९७२) L'EQUINOXE DE SEPTEMBRE आणि प्रख्यात इटालियन लेखक इग्नासिओ सिलोन यांचे गाजलेले पुस्तक BREAD & AND WINE या सारख्या पुस्तकांचा त्यांनी केलेल्या परीक्षणात समावेश होता. या लिखाणातून सार्त्र आणि कामू ABSURD (तर्कविसंगती) या प्रश्नाकडे किती वेगळ्या दृष्टिकोनातून पहात होते हे माहित होते. सार्त्रशी त्यावेळीही कामूंचे मतभेद होते तरी सार्त्रच्या लिखाणात जो ओघ व स्पष्टता आहे याबद्दल कामूनी कौतुक व्यक्त केले होते. केवळ वैयक्तिक अनुभवाचा आधार घेऊन नैराश्य (GLOOM) व्यक्त करणारे सर्वसाधारण तत्त्वज्ञान मांडण्यातील शहाणपणाबद्दल त्यांनी शंका व्यक्त केली होती. ABSURDITY (तर्कविसंगतीच्या) पलिकडे जाण्याची आवश्यकता आहे हे कामूंनी त्यावेळीच जाहीर केले होते, "सौंदर्य, प्रेम अगर धोका यांच्या शिवाय जीवन व्यतीत करणे, ही खरोखरीच फारच सोपी गोष्ट आहे." असे त्यांनी NAUSÉE या कादंबरीचे परीक्षण करताना म्हटले होते. या परीक्षणानंतर एका वर्षानी केलेल्या मार्च महिन्यातील परीक्षणात त्यांनी सार्त्र यांच्या LE MUR या कादंबरीची चांगलीच प्रशंसा करणारे परीक्षण लिहिले होते. "जीवनातील तर्कविसंगतीचे वर्णन करणे हे 'साध्य' आहे असे कधीही होत नाही, परंतु ती सुरुवात आहे .... अत्यंत सर्वसामान्य जीवही हे



अनुक्रमणिका

केव्हाच तिरपागडी (PERVGRSITY) वागणूक असलेले राक्षस झाले आहेत. आपण ज्यांच्यावर प्रेम करतो, त्यांना लवकरच मृत्यू यावा अशी आपल्यापैकी सर्वजण, कमी अधिक प्रमाणात जवळ जवळ इच्छा करतात.' कामू यांचे हे विधान सार्त्र यांनी मांडलेला जो विचार होता त्याला अन्याय करणारे आहे. कामूंनी जे सांगितले आहे ते सार्त्र यांचे उद्दिष्टच नव्हते.

कामू यांच्या या पुस्तक परीक्षणावरून असे दिसून येते की, हा तरुण समीक्षक हा वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून लिहिण्याचा निश्चय केलेला समीक्षक आहे. तो प्रकृतीने प्रसन्न असल्याकारणाने, तो ज्या पुस्तकाची चर्चा करीत आहे त्या पुस्तकाची प्रशंसा न करणारे भाष्य करण्याबाबत त्याला अनिच्छा आहे. बरेचसे समीक्षक ज्या पुस्तकाचे परीक्षण करतात, ते संपूर्ण वाचण्याचे कष्टही घेत नाहीत. पण कामू ते ज्या पुस्तकाचे परीक्षण लिहीत असत ते संपूर्णपणे वाचण्यात निश्चितपणे वेळ खर्ची घालीत होते. या शिवाय आपल्या स्वत:च्या कल्पना टांगण्यासाठी त्या पुस्तकाचा खुंटीसारखा उपयोगही करीत नसत. कालांतराने जागतिक प्रसिद्धी मिळविलेल्या कामू या लेखकाचे त्याच्या उमेदवारीच्या काळात काय विचार वा कल्पना होत्या याचा मागोवा घेण्यासाठी कोणीही सुरुवातीची पुस्तक परीक्षणे वाचली तर त्याची दारुण निराशा होण्याचा संभवच अधिक 'आल्जेरिया-प्रजासत्ताक' सारख्या छातीठोकपणे आपण डाव्या विचारसरणांचे वृत्तपत्र आहोत असे सांगणाऱ्या वृत्तपत्रात कामू हे राजकीय-पत्रकार होते. यावरून त्यांच्या राजकीय मतांच्या सर्वसाधारण प्रवृतीचा निर्देश होतो. या काळात त्यांचे लक्ष मुख्यत: ज्या प्रश्नांनी वेधून घेतले. त्यावरून त्यांची राजकीय बांधिलकीच्या नेमक्या प्रकृतीचीही कल्पना येते.

त्यांच्या राजकीय लेखांची तीन भागात वर्गवारी करता येईल. त्यातील पहिल्या भागात इ. स. १९३० च्या आसपास डाव्या गटांचा जो सर्वसाधारण दृष्टिकोन होता तो त्यांना कितपत मान्य होता हे या भागातील लेखावरून दिसून येते. यात स्पॅनिश युद्धात भाग घेण्यासाठी गेलेल्या इंटरनॅशनल ब्रिगेडचे समर्थन होते, युरोपमध्ये त्या भागातील देशांना विनाशाकडे नेणारी जी तत्कालिन परिस्थिती होती त्याला काही प्रमाणात तरी पहिल्या महायुद्धानंतर झालेला शांतता तह हे कारण आहे. इत्यादी, या विभागात व्यक्त केलेली मते लक्ष वेधून घेतात हे खरे आहे. परंतु हे लेख कामूंनी लेखन करावयास सुरुवात केल्यानंतर लगेच जे लेख लिहिले आणि ते लेखक झाल्यानंतर त्यांनी जे लेख लिहिले यात फारच फरक आहे. सुरुवातीच्या काळातील लेखांची प्रकृती तशी वेगळीच आहे. दुसऱ्या व तिसऱ्या विभागातील राजकीय लेख हे HODENT होडन्ट प्रकरण आणि अल्जेरियातील काबिलीया प्रांतात पडलेला दुष्काळ या संबंधी आहेत. होडंन्ट या विशिष्ट प्रकरणात न्याय मिळालाच पाहिजे याची निश्चिती करण्यासाठी कोणताही आणि कितीही त्रास सोसण्याची त्यांनी दाखविलेली तयारी आणि सामाजिक प्रश्नांची सोडवणूक करण्यासाठी व्यवहारी उपाय सुचविण्याचा त्यांचा



अनुक्रमणिका

निश्चय यातून एक गोष्ट स्पष्ट होते. ती म्हणजे 'राजकीय नेमस्तपणाची कल्पना' ते प्रत्यक्ष व्यवहारात त्याच काळी आणीत होते. या कल्पनेतूनच 'बंड' म्हणजे काय याबाबतच्या तत्त्वज्ञानीय संकल्पनेचा विचार त्यांना सुचला असावा.

१० जानेवारी १९३९ रोजी 'अल्जेरिया-प्रजासत्ताक' या वृत्तपत्राच्या पहिल्या पानावर वसाहतीच्या गव्हर्नर जनरलना लिहिलेले अनावृत पत्र प्रसिद्ध करण्यात आले होते. **मायकेल होडन्ट** हा तंत्रवैज्ञानिक प्रचारक स्थानिक आयुर्विमा कंपनीत नोकरीला होता. त्यांनी अफरातफर केली आहे या आरोपावरून त्याला अटक झाली व त्याची तुरुंगात रवानगी करण्यात आली. अल्जेरियातील मुसलमानांकडून धान्य खरेदी करण्याचे काम त्यांच्याकडे होते. त्याने या व्यवहारात अफरातफर केली आहे असा आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आला होता. गव्हर्नर जनरलना लिहिलेल्या या अनावृत पत्रात, या प्रकरणाची तपशिलात जाऊन माहिती देण्यात आली होती. कामूंनी या संबंधात अनेक लेख लिहिले. या लेखातून होडन्टवर ठेवण्यात आलेल्या आरोपात अंतर्विरोध कसा आहे? कोणताही पुरावा आपल्याजवळ नसताना पोलिसांनी त्याला कां अटक केली? पोलिसांचा दृष्टिकोन किती कमालीचा संशयास्पद आहे? पोलिसांनी होडन्टला नुसती अटकच केली नाही तर चार महिने त्याला कोणाशी कसलाही संपर्क कसा साधू दिला नाही, शिवाय पोलिसांनी होडन्टवर कोठचाही आरोप न ठेवता, त्याला तुरुंगात डांबून ठेवले होते, इत्यादी मुद्यांचे सखोल असे वर्णन या लेखातून होते. २३ मार्च १९३९ रोजी होडन्ट सरतेशेवटी निर्दोष आहेत असे ठरून त्यांची मुक्तता झाली. या दिवसापर्यंत कामू या प्रकरणाविषयी सातत्याने लेख लिहीत होते. खटल्याला सुरुवात होण्याच्या आदल्या दिवशी १९ मार्च १९३९ रोजी लिहिलेल्या लेखात कामूंनी लिहिले होते "एकीकडे जे काम करण्याचे स्वेच्छेने पत्करले आहे ते काम अजूनही त्याच वृत्तीने करणारे लोक आहेत आणि दुसऱ्या बाजूला अल्जेरियातील अभिजन वर्गातील फ्रेंच कोलोन जमीनदार, अरब टोळी प्रमुख आणि प्रशासक आहेत. या दुसऱ्या बाजूच्या लोकांना जेव्हा असे आढळून आले की आपल्याला होणाऱ्या नफ्यात घट होत आहे, तेव्हा पहिल्या बाजूच्या लोकांनी स्वेच्छा पत्करलेले कर्तव्य बजाविण्यापासून त्यांना प्रतिबंध करण्याचे या दुसऱ्या बाजूच्या लोकांनी ठरविले." "गहू खरेदी" कचेरीने काही सरकारी नियम घालून दिले होते. ते वापरून होडन्ट यांनी मनलावून कांटेकोरपणे काम करण्याचे ठरविलेले असल्याने अल्जेरियातील बड्या जमीनदारांना राग आला होता. होडन्ट यांना खरे म्हणजे त्या कामासाठीच तुरुंगात डांबण्यात आले होते. होडन्ट आणि त्यांचे मित्र निर्दोष ठरून त्यांची मुक्तता होणे हा कामू यांचा वैयक्तिक विजय होताच. पण 'अल्जेरिया प्रजासत्ताक' ज्यांचे प्रतिनिधित्व करीत होता, त्या राजकीय सुधारणेच्या नवचैतन्याचाही तो विजय होता.

या प्रकरणी लिहिलेल्या सर्व लेखात एक विशेष करून लक्षणीय गोष्ट होती. ती म्हणजे 'न्याय' म्हणजे काय याबद्दल जी अमूर्त तत्त्वे आहेत. त्याचा हवाला देण्याची या लेखमालेत

कामू यांनी तयारी दाखविली होती. त्यांच्या 'आउटसाईडर' आणि 'मिथ ऑफ सिसिफस' या दोन पुस्तकांत जे शून्यवादी वातावरण आहे त्याच्याशी या लेखमालेतील विचारांचा मेळ घालणे कठीण आहे. होडन्ट लेखमाला सुरुवात करण्याअगोदरच खरे म्हणजे ही दोन्ही पुस्तके लिहिण्यास त्यांनी सुरुवात केली होती. या लेखमालेतील विचारांचा संबंध असलाच तर तो कामू भविष्यकाळात जी पुस्तके लिहिणार होते, विशेष करून 'प्लेग' आणि 'ला चूट' (पतन) यांच्याशी आहे.

मायकेल होडन्ट खटल्यात कामू यशस्वी झाल्याकारणाने एक मुद्दा प्रस्थापित झाला होता. अल्जेरियाच्या तत्कालिन समाजव्यवस्थेत आमूलाग्र सुधारणा होणे आवश्यक होते. हे असे जरी होते, तर जेथे अन्याय झालेला आहे अशा एखाद्या प्रकरणात प्रस्थापित कायद्यानुसार प्रक्रिया केली, कारवाई केली, तर तो अन्याय दूर करण्यात यश मिळते. सर्वसाधारणपणे मान्य अशा लोकशाही प्रक्रियेकरवी सामाजिक आणि राजकीय प्रश्न सोडविणे शक्य आहे यावर कामूंचा विश्वास होता. इ. स. १९४४ साली कामू क्रांतिबाबत फारच उत्साही होते. तेवढा अपवाद वगळता, लेखक म्हणून त्यांचा जो एकंदर कालखंड आहे त्यात डाव्या विचारसरणीच्या तत्कालिन फ्रेंच डाव्यात (विशेषत: जॉं पॉल सार्त्र) कामूंचे वेगळेपण अगदी उठून दिसते. कम्युनिस्ट पक्षाचा सिनिकल संधिसाधूपणा पाहून त्यांना उबग आली आणि त्यांनी कम्युनिस्ट पक्षाचे त्यागपत्र दिले होते याचा उल्लेख यापूर्वी आलेलाच आहे. बुर्झ्वा समाजातील स्वातंत्र्यात खरोखरीच काही अर्थ नाही, असा जो एक लाल-डाव्यांचा भ्रम आहे, या मार्क्सवादी कल्पने पासून कामू दूरच राहिले होते. अल्जेरियात काबिलीया भागात जो दुष्काळ पडला होता, त्याची कारणे आणि त्याचे परिणाम वर्णन करणारे त्यांनी अकरा लेख लिहिले होते. अल्जेरिया प्रजासत्ताक या वृत्तपत्रात इ. स. १९३९ च्या जून महिन्यात ते प्रसिद्ध झाले. त्यात त्यांनी आपण या प्रश्नाकडे तत्त्वनिष्ठ क्रांतिकारकाच्या दृष्टिकोनातून न पहाता, एका व्यवहारी समाज-सुधारकाच्या दृष्टिकोनातून पहात आहोत असे दाखवून दिले आहे.

त्या सर्वच लेखात अत्यंत लक्षणीय अशा दोन गोष्टी आहेत. **एक** ते सारेच लेख एका विशिष्ट शैलीत लिहिलेले आहेत. **दोन** या लेखातून अनेक व्यवहारी सूचना करण्यात आलेल्या आहेत. इ. स. १९५०-६० या दशकाच्या अखेरीस कामू यांनी आपण प्रथम आणि काही झालेतरी प्रथम एक कलावंत आहोत या वस्तुस्थितीवर भर देण्यास आरंभ केला होता. काही समीक्षकांचा त्यामुळे चुकीचा ग्रह झाला. खरे म्हणजे तोवर कामूंनी अनेक राजकीय लेख लिहिले होते, त्यांच्या पुस्तकात अनेक नैतिक व तत्त्वज्ञानीय प्रश्नांच्या चर्चांनी खूपच जागा व्यापलेली आहे. लेखक या स्वरूपात त्यांची जी मुख्य कामगिरी आहे त्या बाहेरच्या नीति व तत्त्वज्ञान या दोनही गोष्टी आहेत असे या समीक्षकांना वाटू लागले होते. इ. स. १९५६ च्या ऑगस्ट महिन्यात त्यांनी लिहिलेल्या एका पत्रात पुढील विधान आहे. 'मी

स्वत:ला प्रथम आणि कांही झाले तरी प्रथम एक कलावंत समजतो आणि लेखनशैली आणि रचना यांचे जे प्रश्न आहेत ते माझ्या मनात सदैव घर करून असतात, ते ती जागा सोडून कधीही जात नाहीत; विशेषत: दैनंदिन प्रश्नापासून मी स्वत:स नकार देतो त्यावेळी,' या विधाना- बरोबर त्यांनी इतर ठिकाणी केलेली विधाने पडताळून पाहिली म्हणजे मग त्यांचे उत्तम प्रकारे आलोकन करता येते. प्रचलित प्रश्नाबद्दल ते जेव्हा लेख लिहीत असत, तेव्हा त्याचा घाट व स्वरूप उत्तमच असावे या विषयी ते नेहमी प्रयत्नशील असत. आपल्या लिखाणाचा घाट अशा प्रकारचा असे की, सर्वसामान्य पत्रकारितेतून ते लेख मग उचलले जात आणि त्यांना एका कलाकृतीचे गुण प्राप्त होत. त्यांनी लिहिलेल्या पहिल्याच लेखाचे नाव आहे ल देन्य एमाँ (गरिबी). कामूंनी पूर्वी केवळ वाङ्मयीन असे जे निबंध लिहिले होते त्यात त्यांनी एक विशिष्ट लेखन शैली विकसित केली होती. त्या शैलीचा वापर या राजकीय लेखात त्यांनी केलेला आहे. जगाचे सौंदर्य आणि मानवाला सोसाव्या लागणाऱ्या यातना यातील फरक दाखविणारा एक हृदयस्पर्शी परिच्छेद त्यांनी या पहिल्याच लेखात लिहिला आहे. त्या वरून आपणास कामूंनी विकसित केलेल्या शैलीची कल्पना येते.

"लोकांना सोसाव्या लागणाऱ्या यातना आणि भूक यातून माझा आजवरचा प्रवास झाला. तो आता संपणार आहे. गरिबी हा केवळ एक शब्दप्रयोग नाही किंवा केवळ चिंतनाचा तो विषय नाही याची जाण वाचकाला पूर्वीच आली असेल. **गरिबी ही गरिबीच आहे.** ती आक्रोश करते आणि असाह्यताही आणते. आणि पुन्हा एकदा मी प्रश्न विचारतो की 'ही गरिबी नाहीशी करण्याकरता आपण काय केले आहे आणि त्या गरिबीपासून तोंड फिरविण्याचा आपणास अधिकार आहे का? मी जे काही म्हणतो आहे ते सर्वांना समजेल का? हे मला माहीत नाही. परंतु एक गोष्ट मला माहीत आहे. TIZI-OUSO तिझो ऊसो या टोळीला भेट देऊन परत आल्यानंतर माझ्या एका काबिलीयन मित्राबरोबर डोंगरावर गेलो. या डोंगराच्या पायथ्याशी शहर होते, ते दृष्टीच्या टप्प्यात होते. या डोंगराने त्यावेळी टाकलेल्या छायेमुळे कठिणातल्या कठीण हृदयात देखील शांततेच्या क्षणाने पळभर का होईना प्रवेश केला असता. परंतु या दरीच्या दुसऱ्या टोकास जे कोणी जवळ जवळ नासक्या बार्लीपासून तयार झालेले जेवण, कोंडाळे करून, घेत होते त्यांना शांततेचा हा अनुभव येणार नाही याची मला अजूनही जाण आहे. या इतक्या विलोभनीय आणि आश्चर्यकारक संध्याकाळच्या वेळात आपणास बुडवून टाकले तर केवढा आनंद अनुभवण्यास मिळेल हे मला माहीत होते. परंतु गरिबीच्या ज्वालांनी दुसऱ्या बाजूस जो प्रकाश पडला होता त्याने त्या जगाच्या सौंदर्य उपभोगण्याचा जो हक्क आहे, त्या पासून मला वंचित केले होते."

या अशा प्रकारचे दर्जेदार, संयत, संतुलित आणि प्रखर भावनेने भारलेले लिखाण काबिलीया या लेखमालेत वारंवार आढळते. उदा. कामू एका डोंगरावर उभे आहेत; तेथून दिसणाऱ्या दृष्याचे वर्णन करताना कामूंनी लिहिले आहे 'आजूबाजूचा प्रदेश न्याहाळतो आहे.



अनुक्रमणिका

हा विस्तीर्ण ग्रामीण भूप्रदेश सकाळच्या सूर्यप्रकाश अस्पष्ट अशा विवरावर पुढे झेपावतो, त्या विवरातून झाडे काळ्याकुट्ट अंधाराच्या ठिपक्या सारखी दिसतात. आणि तेथे सूर्य प्रकाशाच्या माऱ्याखाली धरती वाफाळते आहे "आणि कामूंना मग समजले की, ही माणसे कोठच्या तरी दुव्यांनी जोडलेली आहेत आणि आपल्या भूमीशी करार झाल्यागत बांधली गेली आहेत. कामू हे 'अल्जेरिया प्रजासत्ताक' या वृत्तपत्राचे सामाजिक जाणीव असलेले पत्रकार, NOCE आणि L'ENVER ET L'ENDROIT या पुस्तकांचे लेखक, ABSURD (तर्क विसंगती) या तत्त्वज्ञानाने एकच ईश्वर न मानता अनेक देव मानले आहेत असे मानणारे व त्या सर्व देवांचे उत्साही प्रचारक शिष्य ही त्यांची त्याकाळची ओळख होती. त्यांच्या एकंदर विकासाच्या वाटचालीतील तो एक टप्पा होता. कामूंच्या एकंदर वाटचालीतील हा काळ अगदी परस्पर विरोधी विचारांनी व कृतींनी भरलेला आहे. एकीकडे त्यांचे अगदी सुरुवातीचे वाङ्मयीन लेख/लघुनिबंध पहाता हा लेखक सामाजिक आणि राजकीय प्रश्नाबद्दल ज्याला दिलचस्पी नाही, नैतिक मूल्यावर ज्यास श्रद्धा ठेवता येत नाही, असा लेखक होता, असा निष्कर्ष काढावा लागतो. परंतु त्याजबरोबर फ्रेंच उत्तर आफ्रिकेतील देशात तोवर जे दुष्काळ पडले होते, त्याहीपेक्षा भयाण दुष्काळ काबिलीया, या अल्जेरियातील या विभागांत पडला होता, त्या दुष्काळाची तीव्रता कमी कशी करावी या विषयी उपाय सुचविणारा आणि न्याय म्हणजे काय? हे जाणण्यासाठी अगदी कमालीच्या एकाग्रतेने व्यस्त असलेला, त्यासाठी आपला बराचसा वेळ व ऊर्जा खर्ची घालण्याची तयारी व पात्रता असलेला, त्यासाठी राजी असलेला कामू हा लेखक होता, असे त्या अगदी सुरुवातीच्या काळातील कामू यांच्या लेखनावरून दिसून येते.

कामू हे एखाद्या भारलेल्या माणसारखे काम करीत होते हे आजवर सांगितलेल्या हकीकतीवरून स्पष्ट आहे. आपले पोट भरण्यासाठी वेगवेगळ्या नोकऱ्या करणे, 'कामगार रंगभूमी' व त्यानंतर नाट्यसंघ यांच्यासाठी नाटके लिहिणे, नाटकातून कामे करणे हे सारे करीत असताना त्यांना मागाहून ज्या नाटकाने प्रसिद्धी दिली ते CALIGULA हे नाट्य इ. स. १९३८ साली त्यांनी लिहिले. 'तर्कविसंगत' (ABSURD) या तत्त्वज्ञानात जमा होणाऱ्या विषयासंबंधी प्रदीर्घ लेख लिहिता यावा यासाठी संदर्भांची जमवाजमव करून त्या प्रदीर्घ निबंध लेखनाच्या प्राथमिक कामाला त्यांनी याच काळात सुरुवात केली होती. कालांतराने हा निबंध 'सिसिकसची मिथ' या नावाने प्रसिद्ध झाला व तो चांगलाच गाजला. या निबंधासाठी ते एकीकडे काम करीत असताना ते आपली पहिली कादंबरी L'ÉTRANGER साठी टिपणे काढीत होते. शिवाय या दोन वर्षात इ. स. १९३७ आणि ३८ ते आणखी एका लेख-संग्रहासाठी, संदर्भ, शोधणे, टिपणे काढणे अशा प्रकारचे काम करीतच होते. पुढे हा संग्रह NOCES (मिलन) या नांवाने इ. स. १९३९ साली प्रसिद्ध झाला. काबिलीयात गेले ते हे सारे करीत असताना.



अनुक्रमणिका

काबिलीया या अल्जेरीयातील डोंगरराजींच्या प्रदेशातील ९०% (नव्वद टक्के) भागात मुलांकरता शाळाच नव्हत्या. या प्रदेशातील जवळ जवळ सर्वच मुसलमान कुटुंबाच्या रोजच्या जेवणात, थिसळ झुडुपाच्या मुळापासून बनविलेले पदार्थ हेच त्यांच्या भोजनात जवळ जवळ नेहमीच प्रामुख्याने असत. या विभागातील एका खेड्यात ९६% (शहाण्णव टक्के) लोक हे भिकारी आहेत अशी वर्गवारी खुद्द फ्रेंच सरकारनेच केली होती. काबिलीया डोंगरातील ही जी परिस्थिती होती, तिची प्रकृती ही एकाच वेळी आर्थिक, राजकीय व सामाजिक होती; असे या विपन्नावस्थेबद्दल स्पष्टीकरण देताना कामूंनी सांगितले होते. आर्थिक दृष्ट्या विचार केला असता त्यांनी असे दाखवून दिले होते की इ. स. १९३० च्या सुमारास जी आर्थिक मंदी आली, तिच्या सर्वसाधारण परिणामातून काबिलीया डोंगरराजीतील रहिवाश्यांच्या यातनांचा व दुःखाचा उगम झालेला आहे. मंदी अगोदरच्या सर्वसामान्य परिस्थितीत जे काबिलीया कामगार फ्रान्समध्ये काम करीत असत, ते आपल्या कुटुंबाची उपासमार होणार नाही यासाठी जे आवश्यक पैसे होते तेवढे नक्कीच पाठवीत असत. दुसरे कारण असे होते की इ. स. १९३५ सालपासून फ्रेंच उत्तर आफ्रिकेतील कामगारांनी फ्रान्समध्ये प्रवेशच करू नये, थोडक्यात त्यांनी फ्रान्समध्ये प्रवेशच मिळावा यासाठी ज्या अटी होत्या, त्या अधिक अडचणीच्या केल्या गेल्या होत्या. या दोन्ही गोष्टींचा परिणाम होऊन, फ्रान्समधील काबिलिया कामगारांपासून त्यांच्या कुटुंबीयांना जितके पैसे येत होते, त्याच्या फक्त एक दशांश पैसे अल्जेरियात येऊ लागले. अधिक सर्वसाधारण असे सांस्कृतिक कारण एका वेगळ्याच वास्तवात होते. कामूंनी यासंबंधी लिहिताना म्हटले होते, की "आपल्या विद्यमान काळामागे तीन शतकांतील काळात राहणाऱ्या लोकांशी आपला रोजचाच संबंध आहे, (आणि असे असूनही) या प्रचंड सांस्कृतिक दरीची जाणीव नसलेले फक्त आपणच आहोत." याचबरोबर त्यांनी असेही दाखवून दिले की, ही सांस्कृतिक दरी वाढावी, सखोल व्हावी यासाठी फ्रेंच शासनाची काही वैशिष्ट्ये जबाबदार आहेत. या ठिकाणी कामू एखाद्या धर्मप्रसारकाच्या भूमिकेत असल्याचे जाणवते. त्यांची पददलितांबद्दलची जाणीव इतकी तीव्र आहे की ते आपण या समाज-समीक्षकाच्या भूमिकेपर्यंत येऊन कसे पोचलो याचा विचार त्यांना पडलेला आहे. आजवरचे प्रत्येक फ्रेंच सरकार, फ्रेंच राज्यक्रांतीने उद्घोषिलेले 'प्रत्येक फ्रेंच नागरिकांना समान संधी' हे मूल्य प्रत्यक्ष कार्यवाहीत आणण्यासाठी कटिबद्ध होते. म्हणून ज्या काही शाळा बांधायच्या त्या सारख्याच असल्या पाहिजेत, त्यातल्या शिक्षकांनीही या शाळांना साजेसे शिक्षण दिले पाहिजे, असा प्रत्येक फ्रेंच सरकारचा आग्रह होता. खुद्द कामूही या धोरणामुळेच त्यांना मिळालेले महागडे शिक्षण घेऊन ते भविष्यकाळात महान लेखक होण्याची मनीषा बाळगून होते. फ्रेंच सरकारच्या या धोरणावर रास्तपणे टीका करताना त्यांनी म्हटले होते, "अनेक कमी खर्चाच्या शाळा बांधण्याऐवजी, राजकीय स्मारके ठरतील अशा काही प्रचंड पण मोजक्याच शाळांवर जेवढा प्रचंड पैसा खर्च झाला होता, त्याच्यापेक्षा कमी खर्चात अनेक साध्या शाळा बांधून झाल्या असत्या. पण थोड्याच 'स्मारक शाळा' बांधल्याने

अगोदरच असलेली सांस्कृतिक दरी विस्तारित होत गेली. फ्रेंच सरकारने किमान मजुरीचे दर किती असावेत हे कायदा करून ठरवून दिलेले होते, पण प्रत्यक्षात फारच कमी पैसे मजुराच्या हातावर ठेवण्यात येत. या कृत्याच्या समर्थनार्थ अल्जेरियातील प्रचंड व सर्वच पसरलेल्या बेकारीला या धोरणामुळे थोडासा अवसर मिळतो हे कारण या कृत्याच्या समर्थनार्थ पुढे करण्यात येई.''

या सर्व प्रश्नांची सोडवणूक करण्यासाठी कामूंनी सुचविलेले उपाय हे मूलत: व्यवहारिक होते. अल्जेरियाच्या प्रश्नाबाबत त्यांचे ते विचार होते, त्यात आणि या उपायात सलगता आहे. हे खास करून लक्षणीय आहे. या सूचना व उपाय अमलात आणण्यासाठी जी काही मदत आवश्यक होती त्यातील बहुतेक आर्थिक व तंत्रवैज्ञानिक स्वरूपाची मदत ही राज्यकर्त्या फ्रान्सकडून येणे अटळ आहे, हे कामूंना मान्य होते. त्यांनी या संबंधात म्हटले होते की ''मी असे म्हणतो याचे कारण जी कोठची राजवट फ्रान्स व अल्जेरिया यांना अलग करू पहाते, ती या दोन्ही देशांना दु:खात लोटीत आहे.'' अल्जेरिया हा देश फ्रान्सचा भाग न राहण्याच्या शक्यतेचा विचार करण्याचे कामू सातत्याने नाकारीत होते, याचे कारण ते दुराभिमानी असे राष्ट्राभिमानी होते हे नाही. तंत्रवैज्ञानिक मदत मिळाल्याशिवाय उत्तर आफ्रिकेची आर्थिक परिस्थिती कधीही सुधारणार नाही आणि ती मदत फक्त फ्रान्सच देऊ शकतो हे त्या सातत्याने नकार देण्यामागचे कारण होते. या पुढे जाऊन त्यांनी इ. स. १९३९ साली असे प्रतिपादन केले होते की ''ही अशी मदत देण्यासाठी खुद्द उत्तर आफ्रिकेतील समाजपद्धतीत मूलभूत दुरुस्ती व्हावयास पाहिजे. एवढेच नाही तर त्याजबरोबर अल्जेरिया व फ्रान्स यांच्यात सलोख्याचे संबंध असणे हेही आवश्यक आहे. काबिलियन कामगारांना फ्रान्समध्ये फारसा त्रास न देता प्रवेश मिळाला पाहिजे. अल्जेरियात सार्वजनिक बांधकामे करण्यास प्रोत्साहन द्यायला हवे; कायद्याने ठरवून दिलेल्या किमान मजुरीच्या पातळीवर मजुरीचे दर आणून ठेवले पाहिजेत, खेड्यांनी आपला कारभार आपणच पहावा यासाठी त्यांना अधिक स्वातंत्र्य दिले पाहिजे. काबिलिया या प्रदेशात मुख्यत्वे करून ऑलीव्ह अंजीर यांचेच उत्पादन होते, त्यांच्या किंमतीत वाढ व्हावी यासाठी फ्रान्सने आर्थिक सहाय्य केले पाहिजे आणि खुद्द अल्जेरियात २ लाख हेक्टर जमीन तशीच पडून आहे, ती काबिलियन जनतेला लागवडीसाठी उपलब्ध करून दिली पाहिजे.''

या वृत्तपत्रीय लेखातूनं कामू यांच्या अल्जेरियावरील लिखाणातील आणखी एक वैशिष्ट्य अधोरेखित होते. अल्जेरियाने फ्रान्सबरोबर चांगले घनिष्ट संबंध ठेवले पाहिजेत यावर या लेखातून कामू सातत्याने भर देत होते. यामुळे त्यांच्या पुढील आयुष्यात, फ्रान्समधील अनेक नामवंत डाव्यांनी त्यांच्यावर केलेल्या टिकेला, त्यांना सामोरे जावे लागले होते. फ्रान्सने अल्जेरियात जी वसाहतपद्धती अंमलात आणली होती, त्यातून काबिलिया विभागातील विपन्नता व दुष्काळी परिस्थिती निर्माण झाली हे मान्य करण्यास कामू नकार देत. त्यांनी काबिलियावरील लेखमालेचा समारोप करताना लिहिले होते या अवस्थेस 'जे कोणी



अनुक्रमणिका

जबाबदार आहेत. त्यांना शोधून काढणे हे माझे उद्दिष्ट नाही. आरोप करणाराच्या भूमिकेत जाण्याची मला फारशी रुची नाही. . . . . आर्थिक पेचप्रसंगाने काबिलिया भागात जे दुःख निर्माण झाले आहे. त्याबद्दल मला चांगलीच जाण आहे. याच कारणामुळे फारच थोड्या तथाकथित गुन्हेगाराविरुद्ध आरोपपत्र दाखल करणे म्हणूनच मला खुळेपणाचे वाटते.[६] इ. स. १९५० साली अनेक डाव्या गटाच्या समीक्षकांनी कामूंवर प्रतिगामित्वाचा आणि भित्रेपणाचा आरोप केला होता. (हे किती चुकीचे व लबाडीचे होते. हे आपण पुढे पाहणारच आहोत) परंतु कामूंच्या या लिखाणाने त्यांना आरोप करण्यासाठी चांगलाच पुरावा उपलब्ध करून दिला होता ! त्याच्या जोडीला, या अल्जेरियातील या मागास प्रदेशांना दिलासा देण्याकरता, ताबडतोब मदतीची आवश्यकता आहे, हेही त्यांनी आपल्या त्या काळातील लेखातून लिहिले होते. कामू हे 'प्रतिगामित्वाचा' पुरस्कार करणारे आहेत, व भित्रे आहेत. या आरोपास ते लिखाण पूरक ठरणार होते. तत्कालीन अल्जेरियात, जे कोणी प्रशासक होते, त्यांनाही कामू काबिलियन जनतेच्यावतीने जे काही प्रयत्न करीत होते त्यांचे अजिबात कौतुक नव्हते. इ. स. १९४० साली सरकारी धोरणामुळे त्यांना आपले वृत्तपत्र बंद करावे लागले. शिवाय त्यांना असेही आढळून आले की स्थानिक नोकरशाहीचा राग आपण ओढवून घेतला असल्याकारणाने आपणास अल्जेरियात कोणीही नोकरीस ठेवण्यास तयार नाही. गंमत अशी आहे की कामूंवर टीका व दोषारोप करणाऱ्या जहाल डाव्यांना फ्रेंच सरकारचा त्यांनी रोष ओढविल्याकारणाने त्यांना नोकऱ्या सोडाव्या लागल्या नव्हत्या वा मिळत नव्हत्या असेही नाही. पण 'प्रतिगामी' व 'भित्र्या' कामूंना या आपत्तीला सामोरे जावे लागले होते. सरतेशेवटी पॅरीसला स्थलांतर करणे त्यांना भाग पडले. त्यांचा मित्र बिस पारेन याने कालांतराने लिहिले होते की, 'अल्जेरियातून हद्पार करण्यात आलेला पहिला पत्रकार कामू.''

२७ ऑक्टोबर १९३९ रोजी 'अल्जेरिया प्रजासत्ताक' या वृत्तपत्राचे प्रकाशन थांबविण्यात आले. फ्रेंच सैनिकी अधिकाऱ्यांनी जी सेन्सारशिप व्यवस्था प्रस्थापित केली होती. तिच्या बरोबरचा संघर्ष कामूंना एकट्यालाच चालू ठेवणे भाग होते. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात रशियाने पोलंडवर हल्ला केला होता. त्यासंबंधी कामूंनी एक लेख लिहिला होता. दुसरा त्यांनी १ जानेवारी १९४० रोजी लिहिला. या युद्धाच्या सुरुवातीला त्यांना जी आत्यंतिक विमनस्कता आली होती ती दर्शविणारा तो लेख होता. त्या लेखात असेही सूचन होते की निश्चित अशा नैतिक आणि तत्त्वज्ञानीय कल्पनांचा मागाहून अधिक तपशिलात जाऊन विचार करण्यात येईल. त्यांनी ७ सप्टेंबर १९३९ रोजी असे लिहिले होते की "डाव्या गटाच्या लढाऊंना असह्यजनक व नैराश्यजनक वाटणारी अशी, व इतकी कारणे, आजवर कधीही नव्हती. या युद्धाला तोंड फुटल्यानंतर अनेक आशा व श्रद्धा कोसळल्या आहेत. हे सारे जे अंतर्विरोध आहेत, त्याने हे सारे जग 'गदगदा हालले.' स्पष्ट विचार करणे आणि सर्वच गोष्टींना नकार देणे माणसालाच भाग पडले होते ...... एका निश्चित अशा

आत्यंतिक बिंदूला जाऊन जेव्हा असाह्यता पोचते, तेव्हा त्या परिस्थितीतून आपणास कशाचीच काहीही कर्तव्य नाही अशा प्रकारची भावना निर्माण होते आणि मग त्याच्या पाठोपाठ दैवावर हवाला ठेवण्याची भावना, व त्या संबंधीची रुचीही चालून येते. इ. स. १९१४ च्या लढाईत भाग घेण्यासाठी स्फूर्ती देणाऱ्या अनेक प्रकारच्या आशा होत्या. परंतु इ. स. १९३९ च्या लढाईत भाग घेण्यासाठी स्फूर्ती देण्यासाठी त्याही नाहीयेत." हे सांगितल्यानंतर ते पुढे असे म्हणतात, "या अशा जीवघेण्याप्रसंगी आपण कशाकडे वळतो? भविष्यकाळाकडे वा भवितव्याकडे जात नाही. आपण जातो ते जेव्हा आयुष्याला अजूनही काही अर्थ होता अशा गतकाळातील ठिसूळ आणि मौल्यवान प्रतिमाकडे. उदा. शरीरापासून, सूर्यापासून, आणि पाण्यापासून मिळणारा आनंद, वसंत ऋतूच्या अखेरीस फुलांना येणारा बहर, माणसा-माणसातील भातृभाव, आशेतील वेडगळपणा, इत्यादी. हाच आनंद आपली मूल्ये टिकवून आहे, परंतु इत:पर हेही शक्य नाही, माणसाच्या माणुसकीवर असलेली श्रद्धा, गमावून बसणे, ही कदाचित बंडखोरीची परमावधी असलेही. कदाचित या युद्धानंतरही वृक्ष फळा-फुलांनी बहरतील. याचे कारण इतिहासाचा पराजय करून हे जग सरतेशेवटी नेहमीच विजयी होते. परंतु या बहरलेल्या वृक्षांकडे बघण्यासाठी कितीजण जिवंत राहणार आहेत, हे मला सांगता येणार नाही. आणि ते काहीही असो, एक दिवस असा येईल की त्या दिवशी, या (जिवंत राहिलेल्या) व्यक्तींनाही आपणास बळी जावे लागणार आहे, याबद्दल त्यांची खात्री असेल."

१ जानेवारी १९४० रोजी लिहिलेल्या लेखात दुसऱ्या महायुद्धाकडे पाहण्याचा कामूंचा दृष्टिकोन हा अधिक धीरोदत्त व जे अंगावर आले आहे त्याला कसलीही अभिलाषा न बाळगता तोंड दिले पाहिजे असा होता असे दिसून येते. कामूंनी त्या लेखात लिहिले होते "आपणापेक्षाही जे अधिक बलवान आहेत त्या विरुद्ध लढत देणे यातच माणसाचे खरे मोठेपण आहे. आज आपणास सुख मिळालेच पाहिजे अशी आशा न करता, असाह्यतेतही निश्चित असे भव्य-दिव्य काही साध्य होईल ही आशा केली पाहिजे." मनुष्य आणि या जगातील आनंद या दोघांमध्ये इतिहासाच्या शक्ती भिंत उभी करतात. या अशा इतिहासाच्या शक्तीवर कामूंनी हल्ला चढविला होता. भविष्यकाळात फ्रान्समधील (RESISTANCE MOVEMENT) भूमिगत चळवळीत त्यांनी जे कार्य केले त्याच्या तत्त्वज्ञानीय समर्थनच्या पहिल्या खुणा इ. स. १९४०च्या लिखाणात आढळतात. क्षयरोग झाला असल्याकारणाने त्यांना सैन्यात दाखल करून घेण्यात आले नाही. सांज प्रजासत्ताक (ल सुआर रेपब्लिकन) या वृत्तपत्राचे ते संपादक होते. पण युद्धकाळात फ्रेंच सैन्याधिकाऱ्यांनी सर्वच वृत्तपत्रांवर, जिला कसलेच नियम नाहीत अशी लहरी सेन्सारशिप लादली होती. या कारणामुळे सांजप्रजासत्ताकचे संपादन करणे हे फारच कठीण होऊन बसले. फ्रेंच सैन्याच्या घोडदळातील दोन अधिकाऱ्यांवर कामूंच्या वृत्तपत्रांच्या तपासणीचे काम सोपविण्यात आले होते. एक दिवस

पहिल्या पानावर संध्या प्रजासत्ताकचे ध्येयवाक्य "सांज प्रजासत्ताक हे इतर वृत्तपत्रासारखे नाही, ते नेहमीच वाचनीय असे काही तरी देते." हे त्या पानाच्या मध्यभागी छापण्यात आले आणि बाकीची सर्व जागा रिकामी राहिली, कारण त्या मजकुराला सेन्सारची कात्री लागली होती. कामू आणि सेन्सार यांच्यातील हा संघर्ष दोन असमान बाजूत होता. असे होते तरी कामूंच्या दमदार विनोदी, वृत्तीमुळे, ते बरेच दिवस तग धरून राहिले. आपल्या वृत्तपत्राची तपासणी करणारे बुचकळ्यात पडतील त्यांच्या मनात गोंधळ निर्माण व्हावा या हेतूने सेन्सारला देशद्रोही वाटतील असे उद्गार हे इतिहासात प्रसिद्ध असलेल्या व्यक्तीने काढलेले उद्गार आहेत असे कामू भासवीत. उदा. ८ जानेवारी रोजी 'मनुष्य जेव्हा घोड्यावर बसतो, तेव्हा त्या दोघात घोडा हाच बुद्धिमान असतो.' हे सुभाषित प्रख्यात फ्रेंच लेखक आँद्रे मोरवा यांचे आहे, असे सांगून छापण्यात आले होते. ३ जानेवारी रोजी "आपल्या शक्तीचा वापर माणसे कसा करतात, त्यावरून त्यांना जोरवता येते. खालच्या दर्जाची मने, त्यांच्या हातात केवळ योगायोगाने अगर मूर्खपणामुळे जी सत्ता येते, तिचा ते नेहमीच गैरवापर करतात हे नोंद घेण्यासारखे आहे." हे वाक्य कॅलीगुलाचे म्हणून छापण्यात आले होते. पण या साऱ्या खटपटी लटपटी करून सरते शेवटी सांज प्रजासत्ताक कामूंना बंद करावे लागले.

सांज प्रजासत्ताक हे वृत्तपत्र बंद झाले आणि फ्रेंच सरकारच्या नाराजीमुळे दुसरी नोकरीही मिळेना. या कारणामुळे कामूंना अल्जेरिया सोडून पॅरीसला जाणे भाग पडले. पॅरीसमध्ये असताना इ. स. १९४० सालातील पहिले काही महिने (SOIR A PARIS) त्यांनी सांज पॅरीस या वृत्तपत्रात काम केले. शिवाय याच कालखंडात LA LUMIÉRE (दिप) या आत्यंतिक डाव्या गटाच्या साप्ताहिकात कामू वाङ्मयीन लेख लिहीत असत. इ. स. १९४० च्या मे महिन्यात जर्मन फौजा पॅरीसच्या रोखाने झपाट्याने येत होत्या. परंतु फ्रेंच वृत्तपत्रात, दणदणीत विजय होत आहे, अशा बातम्या छापल्या जात होत्या. पॅरीसमधून त्या शहरातील लोकांची पळापळ होईपर्यंत या बातम्या छापण्यात येतच होत्या. थोडक्यात एकंदर वातावरण "खोट्या (PHONEY) लढाईचे होते. वास्तव युद्धाचे नव्हते. हे सर्व पाहून व प्रत्यक्ष अनुभवून एका नव्या प्रकारचे वृत्तपत्र आपण काढावे असा निश्चय कामूंनी केला होता. भूमिगत चळवळीत ते कॉम्बॅट या नावाच्या वृत्तपत्राचे संपादक होते. भूमिगत अवस्थेतून हे वृत्तपत्र ऑगस्ट १९४४ मध्ये बाहेर पडले व ते जाहीरपणे प्रसिद्ध होऊ लागले. त्यावेळी कामूच त्याचे संपादक होते. नव्या प्रकारचे वृत्तपत्र निर्माण करावे ही जी त्यांची महत्त्वाकांक्षा होती ती अखेरीस साकार झाली होती. दुसरे महायुद्ध, त्यात झालेला मानवी संहार, लोकांना सोसाव्या लागणाऱ्या यमयातना, हे सारेच भयावह होते. ती एक प्रचंड अशी मानवी शोकांतिका होती. पण काळ्याकुट्ट ढगाची रूपेरी कडा या चालीवर कामूयांना आपले स्वत:चे असे वर्तमानपत्र चालवावयास मिळाले. फ्रेंच उत्तर आफ्रिकेतील त्यांच्या आयुष्याच्या कालखंडात त्यांना जे अनुभव आलेहोते त्यांचा उपयोग करून त्यांनी जे साहित्य निर्माण केले आणि



अनुक्रमणिका

त्यायोगे जी वातावरण निर्मिती केली, तिचे लगेच कौतुक झाले तिला जनमान्यताही मिळाली.

येथवरच्या आयुष्यात त्यांना समाज-समीक्षकाची भूमिका वठविताना त्रास झाला तो ज्यांचा समाजवादावर, उदारमतवादी लोकशाहीवर विश्वास नव्हता अशा टीकाकारांकडून, साम्राज्यवादी दृष्टिकोनाच्या नोकरशहाकडून वा त्याच प्रवृत्तीच्या राज्यकर्त्यांकडून. अल्जेरिया फ्रान्स युद्धाला तोंड फुटल्यानंतर त्यांना एका वेगळ्याच आव्हानाला सामोरे जावे लागले. त्याचा आपण पुढे विस्ताराने विचार करणारच आहोत.

इ. स. १९४० सालापासून कामूंनी अल्जेरिया जवळ जवळ सोडून ते फ्रान्स मध्ये रहावयास गेले होते. इ. स. १९४१ साली ते अठ्ठावीस वर्षांचे होते. त्यांनी तोवर त्यांच्या अत्यंत महत्त्वाच्या समजल्या जाणाऱ्या साहित्यकृती लिहून हातावेगळ्या केल्या होत्या. कॅलीगुला हे नाटक, ले'ट्रॉनजेर ही त्यांची कादंबरी, 'ल मिथ सिसिफस' हा त्यांचा प्रदीर्घ तत्त्वज्ञान विषयक निबंध. कामूंच्या एकंदर साहित्य निर्मितीत या साहित्यकृती महत्त्वाच्या समजल्या जातात. त्यांना वाचकांनी व सर्वच समीक्षकांनी मान्यता दिली होती याचा उल्लेख या पूर्वी आलाच आहे. आजकाल त्यांचे प्रामुख्याने स्मरण होते, ते या तीन साहित्यकृतीमुळे.

कामूंचा एकंदर जीवनविषयक दृष्टिकोन व त्यांचे विचार समजावून घेण्यासाठी काही प्रश्न उपस्थित करणे आवश्यक आहे. त्याजबरोबर त्यांच्या जीवनात ज्या मोकळ्या जागा होत्या त्यांच्या अस्तित्वाची नोंदही घेतली पाहिजे. त्या दृष्टिकोनाचा सामाजिक व राजकीय संदर्भ जाणण्यासाठी तसे हे करणे जरुरी आहे.

अल्जेरियात कामू जन्माला आले, तेथेच त्यांचे शिक्षण झाले, त्याच ठिकाणी त्यांनी लेखनासही सुरुवात केली. अल्जेरिया ही सिद्धांताच्या पातळीवर तरी वसाहत नव्हती. या देशाचे एकंदर तीन विभाग करून, ते फ्रेंच प्रजासत्ताकाचे भाग समजले जात असत. परंतु हा झाला सिद्धांत. प्रत्यक्ष व्यवहार फारच वेगळा होता. कोणत्याही साम्राज्यात जे वसाहती प्रदेश समाविष्ट असत, त्या ठिकाणच्या रहिवाश्यांना जो जीवनविषयक अनुभव येतो तोच त्या विभागातील रहिवाशांनाही येत होता. हा प्रदेश इ. स. १८३६ साली फ्रान्सला जोडण्यात आला होता. कामूंचे पूर्वज त्या देशात इ. स. १८७१ साली आले. अल्जियर्सच्या लोकसंख्येत वेगवेगळ्या युरोपीय उदा. फ्रेंच, स्पॅनिश इटालियन, माल्टीज जमातीचे लोक होते. पण ते संख्येने अल्पसंख्य होते, मुसलमान अरब व बर्बर या जमातीचे लोक बहुसंख्य होते. बहुसंख्य अरब व बर्बर यांची भाषा अरेबिक होती. या बहुसंख्यांना, आपण फ्रेंच प्रजासत्ताकाचा एक भाग आहोत असे वाटत नव्हते. असे होते तरी त्यातील काही जणांना, काही काळतरी फ्रेंच प्रजासत्ताकाचा आपण खरोखरच एक भाग व्हावे असे वाटत होते

कामू हे युरोपीय कामगार वर्गातील अगदी तळागाळातील थरात लहानाचे मोठे झाले. या

युरोपीय कामगार वर्गाचे त्याच शहरात बहुसंख्येने वस्ती करून असलेल्या अरेबिक भाषा बोलणाऱ्या मुसलमानांशी कशा प्रकारचे संबंध होते?

GERMAINE BRÉE जरमेन ब्रेअ, या साक्षेपी विद्वान बाईंनी या संदर्भात कामूबद्दल खूप विस्ताराने लिहिले आहे. त्या आपणास असे सांगतात की युरोपीय आणि मुसलमान या दोन कामगारवर्गात कसल्याही प्रकारचा दुरावा होता असे कोणीही सांगितलेले नाही. उदा. या दोन कामगार वर्गात एकोपा व सलोखा होता, याची जाण कामूंनी आपणास प्रथम करून दिली असे त्यांचे प्रतिपादन आहे. "न थकणाऱ्या सूर्याची कीर्ती आणि आफ्रिकन समुद्र किनारपट्टीच्या सौंदर्याचे वर्णन कामूंनी केले होते. नेटीव्ह (स्थानिक) लोकांची विशिष्ट भावनात्मकता, त्यांची नैतिकता, त्यांचा दृष्टिकोन, त्यांची भाषा, या सर्वांबाबत कामूंना जितके अगदी घरच्या सारखे वाटत असे, तसे दुसऱ्या कोणाबरोबरही त्यांना वाटत नसे." असे त्यांनी कामूंवरील आपल्या ग्रंथात नमूद केले आहे. या विधानाच्या समर्थनार्थ कामूंच्या लेखनात व त्याच्या समकालिनांच्या आठवणीत भरपूर पुरावा उपलब्ध आहे. असे त्या सांगतात. जरमेन ब्रेअ या पुढे जाऊन असेही सांगतात की सधन युरोपीय मध्यम वर्गियात आपण तळागाळातील लोकांपेक्षा, कनिष्ठ मध्यमवर्गियांपेक्षा वेगळे व श्रेष्ठ आहोत ही भावना त्यांच्या मनात कायम घर करून असे. या भावनेचा स्पर्शही बेलकोर्ट या कामगार वस्तीत राहणाऱ्या, भिन्न भिन्न युरोपीय देशातून आलेल्या ख्रिश्चन धर्मीय आणि ज्यू धर्मीय यांच्या मिश्रणातून तयार झालेल्या गौरवर्णीय कामगारवर्गाच्या मनाला झालेला नव्हता. बर्बर, अरब आणि आपण गौरवर्णीय युरोपीय लोक एकच असे त्यांना वाटत होते कामूंना बर्बर आणि अरब कधीही परके वाटले नाहीत असे जरमेन ब्रेअ यांनी सांगितले आहे.

या बाईंची विद्वता, बुद्धिमत्ता, संशोधनाकरता घेतलेली मेहनत हे सारे जमेस धरून, त्या आपणास जे काही सांगत आहेत. ती वस्तुस्थिती होती का? या ठिकाणी भारतीयांना जो गौरवर्णियांच्या विचारसरणीचा अनुभव आहे, तो विवेचनाच्या संदर्भासाठी नमूद करणे वाजवी ठरवे. भारतात 'फोडा झोडा व राज्य करा' ही त्रिसुत्री राज्यकर्त्यांनी वापरली. परंतु मुसलमानांना-इतर भारतीयांपासून अलग करण्यासाठी मुसलमान आणि बिगर मुसलमान हा शब्दप्रयोग गौरवर्णीय युरोपियनांनी भारतात आणला हे असे करण्यामागे त्यांचा एक गैरसमज होता. त्यांना तो सोईस्कर असल्याकारणाने, त्या गैरसमजूतीतून उत्पन्न होणाऱ्या परिणामाचे त्यांना चटके बसत नसल्याकारणाने, पाश्चिमात्य स्वभावानुसार त्यांनी या गैरसमजात अधिक तपशिलात जाऊन, संशोधन करावयास हवे होते पण ते त्यांनी केले नाही. विद्यमान काळी या साम्राज्यवादी देशातून मुसलमानांची वस्ती वाढल्याकारणाने, त्यांनी आपल्या गैरसमजातून उद्‌भविलेल्या विचारसरणीतून आजवर आपण ठरविलेली धोरणे किती आत्मघातकी आहेत हे पटू लागले आहे. विशेष करून फ्रान्स ब्रिटन, जर्मनी आणि होय खुद्द अमेरीकेतील राज्यकर्त्यांना, आपले जे 'गैरसमज' होते ते किती आत्मघातकी होते हे पटू लागलेले आहे. जरमेन ब्रेअ वा कामूही हा अनुभव येण्याच्या अगोदरच्या कालखंडातले

असल्याकारणाने त्यांचे 'गैरसमज' क्षम्य मानले पाहिजेत. दुर्दैवाची गोष्ट अशी आहे की, कामूंच्या या ''गैरसमजामुळे'' काही काळ का होईना त्यांच्या कीर्तीला कलंक लागण्याची परिस्थिती निर्माण झाली होती. जर्मेन ब्रेअ आणि कामू यांना याची जाण झाली नव्हती की 'तथाकथित धर्मगुरूंनी सांगितलेल्या तत्त्वावर निष्ठा नसेल, तर मग आपणा स्वत:स मुसलमान समजणारी व्यक्ती लगेच अ-मुसलमान होते. 'स्टॅलीनच्या काळात विशेष करून, व सोव्हियट युनियनचे ते तसे' होण्यापूर्वीही जगातील सर्व कम्युनिस्ट पक्ष, हे याच मार्गदर्शक सूत्रानुसारच दैनंदिन व्यवहार करीत, एवंच जे कोणी स्वत:स मार्क्सवादी समजत असत, त्यांची निष्ठा मॉस्कोने काढलेल्या फतव्यावर नसेल तर मग ते 'मार्क्सवादी' नक्कीच नव्हते, आणि यापैकी कोणी अभागी व्यक्ती कम्युनिस्ट पक्षाची सदस्य असली तर तिला लगेच बाहेरचा दरवाजा दाखविण्यात येई. कामूंना अरब वा बर्बर या मुसलमानांची ही प्रवृत्ती न समजणे हा त्यांचा दोष नव्हता. एकतर ते फ्रेंच साम्राज्यवादाचे विरोधक असल्याकारणाने ते अल्जेरियातील मुसलमानांच्या ज्या अरब व बर्बर या जमाती होत्या त्यांचे मित्र होते. या कारणामुळे जो भातृभाव प्रकट होई, त्यांनी कामू चांगलेच चकले; आणि त्यांनी आपल्या विचारांना त्या चुकीच्या दिशेने आगेकूच करावयास लावले.

वांशिक (RACE) भिन्नतेचा कामगार वर्गालाही स्पर्श न होणे ही सामान्यपणे न आढळणारी प्रक्रिया आहे. (आपणा सर्वच भारतीयांना याची चांगलीच जाण आहे. एरवी मराठी कामगार, तामिळ कामगार असे विभाजन आपल्या मनात आलेच नसते व राजकीय प्रचारकांनी त्याचा फायदाही घेतला नसता) शिवाय अल्जेरियात फक्त वांशिक भिन्नता हा प्रश्न नव्हता. धर्म, भाषा आणि संस्कृती या सर्वच गोष्टी आप-आपल्यापरीने वेगळ्या आहेत. म्हणूनच अल्जेरियात केवळ वांशिकता (RACE) हा प्रश्न नव्हता. धर्म भाषा आणि संस्कृती या वांशिकतेच्या भावनेला बळकटी आणतात. अल्जेरियातील तत्कालिन अरब आणि युरोपीयन गौरवर्णीय यांच्या बाबतीतही ते होते. विद्यमान काळी अरब आणि बर्बर या मुसलमान धर्मियात अल्जेरियात जे यादवी युद्ध चालू आहे, त्यावरूनही हे सिद्ध होते. गौरवर्णीय युरोपीय कामगार वर्ग आणि अरब बर्बर मुसलमान धर्मीय कामगार वर्ग, या दोन कामगार वर्गात धर्म, भाषा संस्कृती यामुळेच दुरावा निर्माण होणे क्रमप्राप्तच होते. म्हणूनच जर्मेन ब्रेअ यांनी आर्वजून जे सांगितले आहे की या दोन कामगार वर्गांना 'वांशिक' भावनेचा स्पर्शही झाला नाही, ही गोष्ट अगदी जगावेगळीच आहे. विद्यमान अल्जेरियाने या विधानाची सत्यता पटवून दिली आहे. कामू हे या अगोदर नमूद केलेल्या 'गौरवर्णीय गैरसमजुतीचे' भाबडे बळी होते. म्हणूनच कामूंचा लिखाणात वस्तुस्थितीचे पडसाद दिसून येत नाहीत. सर्वच युरोपमध्ये गौरवर्णीय समाजात जे वातावरण होते, त्यांनी कामूंना हुलकावणी दिली व त्याचे प्रतिबिंब त्यांच्या लिखाणात आपणास आढळते. जर्मेन ब्रेअ याच केवळ त्या वरवरच्या ऐक्याच्या सलोख्याच्या देखाव्याने फसल्या नव्हत्या, कामूही फसले होते.

कामूंच्या आयुष्यातील शेवटची सहा वर्षे ही फ्रान्स-अल्जेरिया या युद्धाच्या धुमश्चक्रीची. या युद्धात अल्जेरियातील लोकसंख्येत दोन अगदी स्पष्ट तट होते. एका बाजूला फ्रेंचासकट सर्व युरोपीयन. त्यांच्या विरुद्ध बाजूला स्थानिक अरब व बर्बर मुसलमान. अल्जेरियातील युरोपीय कामगार वर्गाचा फ्रेंच सरकारला सक्रीय व निश्चियी पाठिंवा होता. स्थानिक मुसलमानांचे ते कट्टर व कडवट शत्रू होते. कामू या युरोपियन गटात नव्हते, तसाच त्यांचा स्थानिक मुसलमान करीत होते त्या हिंसेलाही पाठिंबा नव्हता. अर्थात कामूंच्या तरुणपणी ही अशा प्रकारची उघड यादवी नव्हती हे खरे आहे. पण जर्मेन ब्रेअं यांनी वापरलेली आदर्श स्थिती प्रत्यक्ष अस्तित्वात होती असे मानण्याचे कारण नाही. प्रत्येक परतंत्र राष्ट्रात, आपल्या राज्यकर्त्यांबद्दल अगदी तीव्र नापसंती असणे, त्यांच्याबद्दल शत्रुत्व असणे या एका टोकाच्या भूमिकेपासून तो राज्यकर्त्यांबद्दल आदर वा प्रेम दाखविणे, त्यांच्यासमोर नतमस्तक होणे, राज्यकर्त्यांना आदर्श मानून त्यांचे अनुकरण करण्याचा प्रयत्न करणे या भूमिकेपर्यंतच्या सर्व भूमिका अस्तित्वात असतात. असे असले तरी हे राज्यकर्ते जाऊन आपले राज्य त्या ठिकाणी यावे हे प्रत्येक परतंत्र राज्यातील नागरिकाला वाटत असते. त्याबाबत सर्वत्र एक वाक्यता असते. भारतात आपण याचा अनुभव घेतला आहे. अल्जेरिया याला अपवाद नव्हता.

कामू यांच्या लिखाणातून आपणास काय ज्ञात होते? मुसलमान व युरोपियन या दोन जमातीचे संबंध कशा प्रकारचे होते याबद्दल त्यांच्या लिखाणातून फारच थोडी माहिती मिळते. कम्युनिस्ट पक्षाच्या वतीने ते मुसलमान समाजात प्रचारक म्हणून काम करीत होते. याचा उल्लेख येऊन गेलाच आहे. परंतु कामूंच्या लिखाणात ते प्रचार करीत असताना जे अनुभव त्यांना आले, त्यांनी जे प्रत्यक्ष निरीक्षण केले असेल त्याचे प्रतिबिंब पडलेले दिसत नाही. मुसलमान समाजावरतीही कामूंनी त्या समाजात केलेल्या कामाचा वा प्रचाराचा परिणाम झाल्याचे आढळत नाही. यात आश्चर्य करण्याचे कारण नाही. कारण अल्जेरिया स्वतंत्र झाल्यानंतर त्या ठिकाणी अरब-बर्बर या दोन मुसलमान समुहात जे यादवी युद्ध झाले व एकंदर ज्या स्वरूपाच्या घटना घडल्या त्यावरून ते दिसूनच येते. कामूंचे आपणास जे समग्र वाङ्मय उपलब्ध आहे, त्यात त्यांचे इतर कम्युनिस्टांशी या मुसलमान जमातीशी जे काही प्रत्यक्ष संबंध होते, त्यांची पुसटती निशाणीही आपल्याला आढळत नाही. त्यांची बौद्धिक संस्कृती ही तत्कालिन मध्यमवर्गीय फ्रेंच युवकासारखीच होती. नीत्से, मार्लो आणि जीद या लेखकांचा त्यांच्यावर जेवढा जबरदस्त प्रभाव होता, तेवढाच तो MAURICE BARRES (१८६२-१९२३) मॉरीस बार्रेस या लेखकाचाही होता. बार्रेस हा लेखक आजकाल कोणालाच परिचित नाही, हे लक्षात घेऊन त्यांच्याबद्दल दोन शब्द सांगणे उचित ठरावे. बार्रेस यांनी नानसी (NANCY) येथे कायद्याची पदवी मिळविली. त्यानंतर त्यांनी पॅरीस येथे इ. स. १८८४ साली आपल्या वाङ्मयीन कारकीर्दीस आरंभ केला. निबंधकार, कादंबरीकार म्हणून नाव मिळविले. त्याकाळी ते पहिल्या रांगेतले कादंबरीकार समजले जात. समकालीन लेखकात त्यांचे अनेक अनुयायी होते. एक प्रकारच्या गूढ राष्ट्रवादा- (MYSTICO

NATIONALISM) कडे बार्रेस आकर्षित झालेले होते. या लेखकाकडे कामू आपल्या तरुण वयात आकर्षित झाल्याचे स्पष्टपणे दिसून येते. परंतु मार्क्सवादाचा त्यांच्या विचारावर प्रभाव पडल्याच्या काहीही खुणा दिसत नाहीत. असल्याच तर त्या न दिसण्याइतक्या अस्पष्ट आहेत. मार्लो या लेखकाकरवी हेही संशयास्पद आहे-जो काही प्रभाव पडला असेल तेवढाच मार्क्सवादाचा प्रभाव त्यांच्यावर पडला असवा. **याचा अर्थ कामूंची समाजवादावर श्रद्धा नव्हती असा नाही.** कामूंनी एके ठिकाणी म्हटले आहे, लोकशाहीला प्राधान्य देणाऱ्या डाव्या गटावर त्यांची अविचल श्रद्धा होती. हंगेरीतील इ. स. १९५६ च्या कम्युनिस्ट रशियाच्या विरुद्ध झालेल्या क्रांतीनंतर कामूंनी इ. स. १९५७ साली लिहिलेल्या एका निबंधात म्हटले होते, "स्वातंत्र्य आणि सत्य, कामगार वर्ग आणि बुद्धिजीवी विचारवंत यांचा समूह .... आर्थिक लोकशाही सिद्ध होण्यासाठी पुरेशी नव्हे पण अत्यावश्यक व जरुरी अशी लोकशाही व्यवस्था; यावर अथकपणे भर देणे ... याचेच रक्षण बुडापेस्ट हंगेरीयन क्रांती करीत होती. आणि त्या शहराने ते करून, सत्याचा व ज्याचा महानतेचा ज्या पश्चिम युरोपला, विसर पडला होता, त्याची क्रांति-युद्धाने आठवण करून दिली. आपल्या समाजातील बहुतेक सर्व बुद्धिजीवी विचारवंत एका चमत्कारिक न्यूनगंडाच्या भावनेने पछाडले गेले होते, आणि त्यामुळे ते दोलायमान, कमकुवत व निरुत्साही झाले होते. मीच एक असा आहे की मी अशा अवस्थेला वा भावनेला शरण जाण्याचे नाकारतो. हंगेरीयन क्रांतीने तो न्यूनगंड, ती दोलायमान अवस्था, कमकुवतपणा व निरुत्साह हे सारे निकालात काढले." **'एवंच कामू हे लोकशाही-डाव्या गटाचे त्यांच्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसापर्यंत होते.** दोलायमान अवस्था व निरुत्साह या भावनांना आविष्कृत करणारे उजव्या गटाचे प्रकार आहेत तसे ते डाव्या गटांचेही असतात याचे स्मरण आपण सर्वांनी ठेवले पाहिजे. कामूंनी सुरुवातीच्या 'ना इकडे ना तिकडे' या निबंध संग्रहातून त्यांना आपल्या बालपणी जो दरिद्र्याचा अनुभव आला होता, तो अगदी कमालीच्या स्पष्टतेने प्रतिबिंबित झालेला आहे. या अनुभवाने त्याच्या मनावर काढलेले ओरखडे हे त्यांच्या आयुष्यभर तसेच राहिले होते. आपल्या तब्येतीबद्दल लिहिताना त्यांनी म्हटले होते, "कठड्याबद्दल सहजप्रवृत्तीगत जे भय होते ते मला सोडून कधीच गेले नाही." हेच त्यांना वाटणाऱ्या एकाकीपणाबद्दल, नैराश्याबद्दल, आणि वेळप्रसंगी होणारा जो आनंद होता, या सर्वांची जी प्रत होती त्याबद्दल नि:संशय म्हणता येईल. फ्रेंच मध्यम वर्गाची जी संस्कृती होती. तिच्याबद्दल त्यांच्या बालपणातील दारिद्र्याच्या अनुभवामुळे, आपण त्या वर्गापासून किती दूर आहोत याचे भान असल्याकारणाने त्या वर्गाबद्दल त्यांना आकर्षण होते. फ्रेंच मध्यम वर्गीयात जन्मापासून असलेल्या मुलांना या वर्गीयाबद्दल जितके आकर्षण होते, त्यापेक्षा कामूंना वाटणारे आकर्षण अधिक होते हे निश्चित. या संदर्भात काही समीक्षक जाँ पॉल सार्त्र यांचे उदाहरण पेश करतात. त्यांचा जन्म मध्यम वर्गात झाला होता. म्हणून त्यांनी त्या वर्गाची



अनुक्रमणिका

चालचालणूक नजाकत (EELEGANCE) आणि वाङ्‌मयीन परंपराचे भान त्याज्य ठरविले ते सामान्य जनांच्या अनालंकृत व त्या वर्गाच्या संभाषण पद्धती व्यक्त होणाऱ्या शैलीने लेखन करू लागले. या उलट कामूंचे होते. सामान्यपणे न आढळणाऱ्या, अशा कमालीच्या जपलेल्या जाणीवपूर्वक नजाकतीने कामू लिहीत. सतराव्या अठराव्या शतकातील लेखनाची स्मृती जागविली जाते. प्रख्यात फ्रेंच लेख जीद यांच्या स्मृतीची जागृत होते. कामू यांच्या या लेखनशैलीवर टीकाही झालेली आहे. कामूबद्दल शत्रुत्वाची भावना असलेल्या ANNE DURAND आन डयूरॉन्ड या अल्जेरियन फ्रेंच लेखिका, ही कामूंची समकालीन होती. कामूंनी आपल्या साहित्यातील अल्जेरियन व्यक्तिंच्या मुखी शहरी व वस्त्रगाळ अशी मुलायम फ्रेंच भाषा घातलेली आहे असे त्यांनी लेट्रॉंजेर (परका) या कादंबरीचे परिक्षण करताना म्हटले होते. (या ठिकाणी एक मुद्दा स्पष्ट करणे आवश्यक आहे. सार्त्र यांनी केवळ वैयक्तिक स्वार्थापोटी आपला लेखन ढंग पत्करला होता. या संबंधीचे विवेचन या लेखात पुढे येणारच आहे)

कामूंची जडणघडण एका विशिष्ट वातावरणात झालेली आहे. ते जन्माने काही प्रमाणात फ्रेंच (त्यांचे पिताजी फ्रेंच होते) आणि काहीसे युरोपीयन होते. परंतु फ्रेंच शिक्षण पद्धती ही फ्रान्समध्ये आणि फ्रेंच वसहतीत एकच होती. एकाच प्रकारचे शिक्षण या शाळातून दिले जाई. इतकेच नव्हे तर सर्वसामान्यपणे इतरत्र कोठेही आढळणार नाही इतकी तपशिलात जाऊन, कार्यवाही करणारी ती शिक्षण पद्धती होती. विद्यार्थ्याला/विद्यार्थिनीला घाम गाळावाच लागेल, रात्रीचा दिवस करावा लागेल अशीच ती होती, थोडक्यात कामू या शिक्षण पद्धतीमुळे 'फ्रेंच' झाले होते. गंमत अशी आहे की, कामूंनी स्वत:च ही वस्तुस्थिती नाकारली होती. इ. स. १९३७ सालच्या फेब्रुवारी महिन्यात अल्जेरियातील 'संस्कृती सदन' या ठिकाणी त्यांनी एक व्याख्यान दिले होते. त्यात त्यांनी भू-मध्य सागरी संस्कृतीचे' पुनर्वसन, कसे करता येईल याबद्दल ऊहापोह केला होता. त्या व्याख्यानात ते म्हणाले होते, "पूर्वे (कडील संस्कृती) आणि पश्चिमेकडील (संस्कृती) ज्या ठिकाणी ('गुण्या गोविंदाने') रहात आहेत अशा फार थोड्या देशांपैकी उत्तर आफ्रिका हा प्रदेश आहे. या संस्कृती संगमाच्या ठिकाणी अल्जेरिया बंदराच्या धक्क्याजवळ राहणाऱ्या स्पॅनिश, अगर इटालियन नागरीकांच्या वागणुकीचा ढंग, आणि त्यांच्या अवती-भोवती असणाऱ्या बहुसंख्य अरबांच्या वागणुकींच्या ढंगात अजिबात फरक नाही. पूर्व आणि पश्चिम यांच्या मिलनातून जन्माला आलेली ही संस्कृती आहे. या दोन संस्कृतीचे जे आदान-प्रदान आहे इतिहास आणि भौगोलिक स्थान आहे या दोन्हीही दृष्टीने अत्यंत एकमेव असेच ते आहे. भू-मध्यसागरी "संस्कृतीच्या जिनिएस (GENIUS) मधील अत्यंत आवश्यक असा भाग याच आदान-प्रदानातून निर्माण झालेला आहे ..... भू-मध्य सागरी संस्कृती अस्तित्वात आहे आणि ती जीवनाच्या प्रत्येक अंगातून आविष्कृत होते.. .(१) भाषिक ऐक्य. एखाद्याला जेव्हा लॅटीन भाषिक गटातील एखादी भाषा जेव्हा अवगत

असते, तेव्हा लॅटीन भाषिक गटातील दुसरी एखादी भाषा सहजपणे शिकता येण्याची सुविधा. (२) आपण (म्हणजे लॅटीन संस्कृतीचे लोक) ज्या मूलस्त्रोतातून उगम पावलो त्याबद्दल एकवाक्यता, युरोपीय मध्ययुगातील कोणासही आश्चर्यचकित असे सामुहिकीकरण, उदा. ऑर्डर ऑफ नाईटस, धार्मिक संरजामदारींची ऑर्डर. (या शब्दाचा या ठिकाणी हुकूम देणे, अनुक्रम दर्शविणे हा अर्थ नसून समान धार्मिक वा व्यावसायिक समान हितसंबंध असलेल्या व्यक्तींचा बंधुभाव व्यक्त करणारी संघटना असा आहे)

कामू यांच्या व्याख्यानातील हा उतारा, त्यातील विचारात जो अंतर्विरोध आहे, हा त्या दृष्टीने लक्षात घेण्याजोगा आहे. एकीकडे कामू भू-मध्यसागरी संस्कृतीच्या ऐक्यावर भर देतात. पूर्व आणि पश्चिम यांचे मिलन म्हणजे ती संस्कृती असे ते सांगतात. पण त्याचवेळी फ्रेंच संस्कृती आत्मसात केलेली व्यक्ती बोलेल, ज्या प्रमाणे विचार व्यक्त करील, त्यानुसारच बोलतात वा विचार करतात. त्या पलिकडे ते जात नाहीत. एक मुद्दा उन्मेरवून लक्षात ठेवला पाहिजे. कामूंच्या विचारावर मॉरीस बाररेस  या लेखकाच्या विचारांचा परिणाम झाला होता हे नमूद केलेले आहेच. परंतु मॉरीस यांच्या राष्ट्रवादी संकल्पनांना फॅसिझम सारख्या हुकुमशाहीची डूब होती. ती कामूंना अजिवात मान्य नव्हती. मुसोलिनीने इथोपियावर स्वारी केली होती. त्याचा निषेध कामूंनी जाहीरपणे केला होता. कामू भू-मध्य सागरीसंस्कृतीच्या ऐक्याचा निर्देष करतात. पण ते अल्जेरियात जन्माला आले होते व तेथेच लहानाचे मोठे झाले. त्या देशातील बहुसंख्य नागरिक हे अरेबिक बोलणारे आहेत. हे दृष्टिआड करतात. थोडक्यात त्यांनी पुरस्कारलेली भू-मध्य सागरीसंस्कृती ही वास्तविक युरोपीय होती आणि अल्जेरियापुरती फ्रेंच होती. म्हणजे जे कोणी अरब या अल्जेरियन संस्कृतीचा एक भाग होते, ते फ्रेंच-अरब बनणार होते.

कामूंच्या विचारातील हा गोंधळ **सगळ्याच गौरवर्णीय युरोपियन वसाहतदारांच्या मनातही असे.** गौरवर्णीय युरोपियन, आणि ते वसाहत करावयास गेलेल्या देशातील मूळ स्थानिक रहिवाशी-नेटीव्ह-यांच्यात सांस्कृतिक एकवाक्यता होती असे मानणे हे मुळातच चुकीचे होते. गौरवर्णीय युरोपीय कम्युनिस्ट वसाहतदारांच्या मनातही हाच विचार सुप्तपणे वावरत होता. या बाबतीतही ते मार्क्सचे सच्चे अनुयायी होते. वसाहतदार आणि स्थानिक रहीवासी यांच्यात अशी सांस्कृतिक एकवाक्यता कधीही नसते. त्यांच्यातल्या संबंधात एक प्रकारची सुप्त हिंसकता कायम घर करून असते. वसाहतदार गौरवर्णीय युरोपीय काही गोष्टी गृहीत धरीत असे. आपली संस्कृती ही नोटिव्हापेक्षा वरच्या दर्जाची आहे, ही त्यापैकी एक गोष्ट होती. गौरवर्णीय युरोपीय कम्युनिस्टही ही गोष्ट गृहीत धरीत होते, थोडक्यात फ्रान्सच्या अंमलाखाली अल्जेरिया असणे यात अन्याय असे काही नाही !

या ठिकाणी कामूंचे वैशिष्ट्य ध्यानात घेतले पाहिजे. अल्जेरियातील अरब हे फ्रेंच अरब आहेत हे गृहीत धरल्यानंतर **या फ्रेंच अरबांना, युरोपियन फ्रेंच माणसाला जे हक्क आहेत ते मिळालेच पाहिजेत हा आग्रह कामूंनी नेहमीच धरला** होता व त्यासाठी ते

नेहमीच खटपट करीत असत. काबिलियातील विपन्नावस्था या लेखमालेचा उल्लेख या पूर्वी आलाच आहे. या लेखमालेत त्यांनी आपल्या या आग्रहावर अगदी स्पष्टपणे भर दिलेला आहे हे दिसून येते. त्यांनी याच मुद्यावर अन्य ठिकाणी देखील सातत्याने भर दिला होता. या त्यांच्या वागणुकीमुळे सरकारची गैरमर्जी त्यांनी ओढवून घेतली आणि स्वत:ला अनेक वेळा अडचणीत आणले. परंतु अल्जेरिया-फ्रान्स युद्धाला सुरुवात झाल्यानंतर सांस्कृतिक एकवाक्यता, अरब फ्रेंच यांच्यात दुरावा नाही, त्यांच्यातले संबंध प्रेमाचे आहेत. ही आपली मूळ समजूत किती चुकीची आहे हे समजण्यास त्यांना वेळ लागला नाही. कामूंची बुद्धिमत्ता कोणाचेही लक्ष वेधून घेईल अशीच होती. त्यांना उत्तम शिक्षण मिळालेले होते. सारे आयुष्य त्यांनी अरेबिक-भाषिक लोकात घालविले होते. असे असले तरी, थोडक्यात सांगावयाचे झाल्यास कामू हे फ्रेंच अंमलाखालील आफ्रिकन देशात विचारांच्या पातळीवर 'परके' होते. ही सारीच वस्तुस्थिती चांगलीच गुंतागुंतीची होती. फ्रेंच आफ्रिकेत कामूंच्या भोवती-अरब भाषिक लोकांचा वेढा होता. हे अरब भाषिक फ्रान्समध्ये परकेच मानले जात. पण हे 'परके' कायदेशिररित्या फ्रान्सचा एक भाग आहेत असे समजले जाई. थोडक्यात फ्रेंच-अल्जेरिया युद्ध चालू असताना या फ्रेंच लोकांची कत्तल होऊ नये, त्यांचा बचाव झालाच पाहिजे, असा आग्रह धरणारे कामू हे त्या फ्रेंच समाजाचाच एक भाग होते. यासाठी त्यांनी तो धरणे क्रमप्राप्तच होते. अल्जेरियातील अरबांचे हक्क खुल्या अंत:करणाने अल्जेरियातील फ्रेंचांनी मान्य करावेत यासाठी सातत्याने लेखणी झिजविणाऱ्या कामूंवर ही शृंगापत्ती आली होती. अरब आणि फ्रेंच या दोन्ही समाजांना आत्मीयता वाटत असलेल्या मुद्यांचा ते आग्रह धरीत होते. ही अशी तारेवरची कसरत कामूंसारख्या समाज-समीक्षकाला अडचणीत न आणती तरच नवलाचे ठरले असते.'

## तीन

## कामूचे टीकाकार : सार्त्र

आल्बेर कामू या लेखकाची अल्जेरियन युद्धासंबंधीची जी भूमिका होती त्याच्यावर अनेकांनी टीका केली. सार्त्र, सिमॉ द बुव्हार या सारख्या मॉस्को छाप लाल डाव्यापासून, तो रेमॉं आरॉं या सारख्या उजव्या गटातील प्रख्यात फ्रेंच समाजशास्त्रज्ञ, यासारख्या अनेक टीकाकारांचा त्यात समावेश होता. या साऱ्या टीकेमुळे आल्बेर कामू यांची सामाजिक प्रतिमा चांगलीच मलीन झाली. दुसऱ्या महायुद्धानंतर फ्रान्स मुक्त झाला, त्या काळात कामूंना फार मोठी सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त झाली होती ती सारी ते गमावून बसले. कामू यांनी या अल्जेरिया-फ्रान्स युद्धात, अल्जेरियन स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या एफ. एल. एन. या संघटनेला विना-अट पाठिंबा देण्याचे नाकारले होते. तत्कालीन बहुसंख्य फ्रेंच बुद्धिजीवी-विचारवंतांनी एफ. एल. एनला बिनशर्त पाठिंबा दिला होता. या कारणाने कामू एकाकी पडले आणि त्यांची

सामाजिक पत घसरली. त्यांच्या मृत्यूपूर्वी तिने कमालीची खालची पातळी गाठली होती. कामूंची सामाजिक पत घसरण्याची आणखीही कारणे होती. त्यांनी अल्जेरियन स्वातंत्र्याबद्दल घेतलेली भूमिका एवढे एकच कारण नव्हते. फ्रान्सिस जाँसाँ (FRANCIS JEASON) हे अल्जेरियातील स्वातंत्र्य सैनिकांना भूमिगतपणे पाठिंबा देणाऱ्या फ्रेंच सहानुभूतीदारांचे एक सक्रीय नेते. त्यांनी सार्त्र यांच्या ले टाँप मॉर्डर्न (आधुनिक काळ) या नियतकालिकात कामू यांच्यावर फारच प्रखर हल्ला केला होता. त्यांचाही परिणाम कामू यांच्या राजकीय प्रतिष्ठेवर होणे अटळ होते. परंतु त्यानंतरच्या काळात अनेक घटना घडल्या. सोव्हियट युनियनचे विघटन व विसर्जन होणे ही त्यापैकी एक अत्यंत महत्वाची घटना. फ्रेंच बुद्धिजीवी-विचारवंतांना या घटना घडल्याकारणाने आपण कामूंच्यावर टीका करण्याबाबत झालेली आपली चूक उमजली असावी. त्याचा परिणाम कामूंची राजकीय क्षेत्रातील पत पुन्हा एकदा प्रस्थापित होऊन, फ्रेंच जनमानसात त्यांचे पुनर्वसन झाले आहे.

विद्यमान काळी फ्रेंच समाजाच्या मानसिकतेत आमूलाग्र परिवर्तन झाल्याची ती खूण आहे. पण दुसरे महायुद्ध ते इ. स. १९७० च्या दरम्यान फ्रेंच बुद्धिजीवी– विचारवंत हे मार्क्सवादाच्या आकंठ प्रेमात पडलेले होते. सोव्हियट युनियन आणि पूर्व युरोपातील मध्यंतरीच्या काळातील घडामोडीमुळे ही मंडळी आपल्या मार्क्सवादी भूमिकेचा नव्याने विचार करू लागली. यातून त्या भूमिकेविरुद्ध तीव्र प्रतिक्रिया व्यक्त होऊ लागल्या. सोव्हियट युनियन आणि फ्रेंच कम्युनिस्ट पक्ष ह्यांच्या हितसंबंधाचे संरक्षण करणे आणि त्यांना हातभार लावणे हे आपले परमकर्तव्य आहे असे सार्त्र आणि त्यांच्या विचाराचे लोक आग्रहाने सांगत असत. कारण त्यांच्या मते सोव्हियट युनियन आणि फ्रेंच कामगारवर्गाचे हितसंबंध यांच्यात एकवाक्यता होती. निदान दैनंदिन राजकारणाच्या बाबतीत तरी होती यावर हे सारे मार्क्सवादी विचारवंत भर देत असत. दुसरे महायुद्ध आणि इ. स. १९७०च्या दरम्यान घडलेल्या घडामोडीमुळे हा सारा आग्रह एका झटक्यात नाहीसा झाला आहे. याचा परिणाम कामू यांच्या नावाचा पूर्वी जो प्रभाव होता, त्याला नव्याने उभारी येण्यात झाला आहे.

एकच उदाहरण वानगीदाखल देत आहे. ते चांगलेच बोलके व पुरेसे आहे. ENQETE SUR LES IDÉES CONTEMPORAINES (विद्यमान वैचारिक कल्पनांचा शोध) या शिर्षकाची एक छोटी पुस्तिका काही वर्षापूर्वी पॅरिसमध्ये प्रसिद्ध झाली. वृत्तपत्रात आलेल्या लेखांचे प्रख्यात फ्रेंच समीक्षक J.M.DOMENACH झे. एम. डॉमाँनाच यांनी केलेले ते संकलन आहे. सार्त्र आणि कामू यांच्यातील वादांशी ज्यांचा चांगला परिचय नाही त्यांच्या माहितीसाठी तत्कालीन फ्रेंच सांस्कृतिक वातावरणाची माहिती करून देण्याचा तो प्रयत्न आहे. त्यात ते म्हणतात.

**"आह ! कामू तुमच्या रुग्ण-वाहिका नैतिकतेकडे (रुग्ण-वाहिका नैतिकता याचा अर्थ कहीही उद्दिष्ट वा ध्येय असो, परंतु एखाद्या अस्मानी सुलतानी संकटात**

**जखमी झालेल्यांच्या मदतीला जाणे) सार्त्रनी किती तुच्छतेने पाहिले होते. परंतु मार्क्सवाद्यांचे वस्त्रहरण झाल्यानंतर (मार्क्सवाद्यांत नव-तत्त्वज्ञानी, गत- माओवादी आणि त्यांच्यासारख्या इतर अनेकांचा समावेश आहे) हे सारे 'सीमा न मानता मदतीस जाणारी वैद्यकीय पथके' उभारीत आहेत आणि काम्बोडिया जिवंत राहावा या उद्दिष्टाने काढलेले लाँग मार्च संघटित करीत आहेत (ही रुग्ण-वाहिका नैतिकता नाही का?)**

फ्रेंच वृत्तपत्रातील बहुतेक वृत्तपत्रे इ. स. १९८० ते इ. स. १९९० च्या दरम्यान अफगाणिस्थानातील बंडखोरासंबंधी वार्तापत्रे सादर करीत असत. यातील बहुतेक मजकूर (सीमा न मानता मदतीस जाणारे) DOCTOR WITHOUT FRONTIERS या संघटनेने गनिमीकाव्याने लढणाऱ्या बंडखोरास मदत व त्यांची शुश्रुषा करावयास अफगाणिस्तानात गेलेल्या तरुण डॉक्टरांच्या माहितीवर आधारित होता. (पुन्हा एकदा रुग्ण वाहिका नैतिकता) डॉमॉनाच यांनी खरे म्हणजे आणखी एका घटनेचा उल्लेख करावयास हवा होता. व्हिएटनाम मध्ये अमेरिकनांचा लष्करी पराभव झाल्यानंतरच्या व्हिएटनामी लोकांच्या पळापळीत अनेकजण, आपल्याला कोठे आसरा मिळतो का याच्या शोधात होते. या लोकांच्या वतीने झालेल्या एका प्रसिद्ध सभेत दोन महाविख्यात वर्गबंधूंची भेट झाली. तीस वर्षांच्या राजकीय वैमनस्यास मागे सारून त्यानी हस्तांदोलन केले. रेमाँ आराँ हे आत्यंतिक उजव्या गटाचे समाजशास्त्रज्ञ आणि सार्त्र हे ÉCOLE NORMALE (प्रशिक्षण महाविद्यालय) या महाविख्यात महाविद्यालयाचे विद्यार्थी व वर्गबंधू. कामू हयात असते तर ते या सभेस खासच हजर राहिले असते. वस्तुस्थिती अशी होती की हा अशा प्रकारचा समारंभ आयोजित करून संघटित केला जाणे हाच कामू यांच्या रुग्णवाहिक नैतिकता या धोरणाचा, त्यांच्या मरणानंतर का होईना झालेला प्रचंड विजय होता.

याचा अर्थ थोडक्यात असा आहे की, कोणत्याही राजकीय कृतीला असलेला नैतिकतेचा पाया (अगर नैतिकतेच्या संज्ञात राजकीय कृती उलगडून दाखविण्याचा प्रयत्न) या विचाराला फ्रान्समध्ये पुन्हा एकदा नव्याने महत्त्व प्राप्त झाले आहे. दुर्दैवाची गोष्ट ही आहे की ज्या काळात कामू कार्यरत होत, त्या काळात लेखणीच्या एका आक्रमक फटक्यात तो विचार त्याज्य ठरविण्यात आला होता.

सार्त्रनी SAINT GENET (सन्त गने) नावाचे एक पुस्तक लिहिले आहे. त्यातला एक परिच्छेद चांगलाच कुविख्यात आहे. "प्रत्येक नैतिकता जी आपणास आजकाल केवळ **अशक्य** अशा स्वरूपात स्वत:स सादर करीत नाही ती नैतिकता मानव जातीच्या दुराव्याला आणि तिला गूढत्व प्राप्त करून देण्याला (mystification of mankind) हातभार लावते" असे त्यांनी त्या परिच्छेदात लिहिले आहे. थोडक्यात दुसऱ्या महायुद्धोत्तर प्राप्त अशी जी राजकीय परिस्थिती आहे, त्या ठिकाणी नैतिकता ही अप्रस्तुत आहे, असे मानून तिची

रवानगी माळ्यावर करावयाची. सार्त्र हे स्वत: सच्चे व चांगलेच अस्तित्ववादी असल्या-कारणाने ते आपणा सर्वास असे बजाविण्यास विसरत नाही की 'सदसद्‌विवेकबुद्धी (हे याठिकाणी ते आपल्या स्वत:बद्दल सांगत आहेत हे गृहीत धरावयाचे) हृदयाला दु:ख देणाऱ्या परिस्थितीत वास्तव्य करीत असताना (त्याचे कारण) जिचा पाडाव करता येणार नाही अशा अशक्यतेच्या वातावरणात, मानवी कृतीला आपण स्वत:च निर्माण केलेले मानदंड वापरून तिचे मूल्यमापन करावे लागते.' परंतु सार्त्र यांचा एकंदर जीवनपट तपासला असता, या त्यांनी सांगितलेल्या 'हृदयाला दु:ख देणाऱ्या परिस्थितीबद्दल' आपल्या हाती फारच अल्प पुरावा हाती लागतो. तीच गोष्ट त्यांची जिवा-भावाची मैत्रीण व आजन्म सहचरी सिमाँ द बुव्हार हिच्या आत्मचरित्रातून जे चित्र उभे राहते, त्यातूनही आपल्या हाती विशेष काही येत नाही. सदसद्‌विवेकबुद्धीशी झटापट करावयाची असेल, तिच्याशी कुस्ती करावयाची असेल, तर त्यासाठी सार्त्र यांच्या लिखाणाकडे न वळता कामू यांच्या लिखाणाकडे पहावे लागेल. याचे कारण कामू हे नैतिकतेचा मानदंड व तिचा आदर्श या दोन्ही गोष्टींची फारच गंभीरपणे दखल घेतात, व त्यांना त्यांच्याशीच कर्तव्य होते. या संदर्भात डिस्सेंट (मतभेद) या प्रख्यात अमेरिकन द्वैमासिकाचे मान्यवर संपादक मायकेल वॉल्झर यांनी म्हटले आहे. "प्राप्त क्षणी डाव्या गटानी दिलेल्या आदेशापुढे नैतिकतेने (या नैतिकतेत (राजकीय अमूर्तता (abstractions) अंतर्भूत नसून त्यात जनता समाविष्ट असते,) दुय्यम स्थान पत्करण्यास कामूंनी साफ नकार दिला होता."

अगदी अलिकडच्या काळात अशा प्रकारे नैतिकतेला दुय्यम स्थान देण्याबाबत, लक्षणीय अशी घृणा व्यक्त करण्यात आलेली आहे. उदा. एका 'नव-तत्त्वज्ञाने' ('New Philosophers') एक ग्रंथ लिहिला. या तत्त्वज्ञाचे नाव BERNARD HENRI LÉVY बेरनार्ड हेन्री लेव्ही. ग्रंथाचे शीर्षक आहे "Le Testament de Dieu" (ईश्वराचे निवेदन) ते लिहितात, "नैतिकतेला तिचे योग्य स्थान देण्यासाठी राजकारण हीच सीमारेषा आहे" हे विधान कामू यांच्या ACTUELLES (विद्यमान काळ) या वृत्तपत्रीय लेखसंग्रहाच्या एक खंडातील लेखावरून अगदी थेट स्फूर्ती घेऊन केलेले आहे. त्यांनी हृदयापासून अगदी मनापासून आपल्या आदर्शाला मानवंदना देऊन लिहिले आहे की "कामू ही किती ताठ मानेची व पारदर्शक व्यक्ती होती. तशीच बुद्धिजीवी विचारवंतही. अजूनही त्यांचे हेच स्थान कायम आहे. या विधानाचा वारंवार पुनरुच्चार करणे शक्य नाही." त्याचे कारण तसे करताना आपणास थकावट येईल. पण ते विधान वास्तव असल्याकारणाने राहातेच. हेन्री यांच्या या ग्रंथात ज्या व्यक्तीनी मार्क्सवादी-लेनिनवाद यांचा बुरखा प्रामुख्याने (अर्थात या व्यक्तींची ही मिरसदारी नव्हती) घेतल्याकारणाने ज्यांना इतिहासात देवता स्वरूप दिले गेले होते अशा व्यक्तीवर अत्यंत धारदार शब्दात हल्ला चढविलेला आहे. अर्थात हेन्री यांचे 'लक्ष' केवळ अशाच व्यक्ती नाहीत. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात अनेक वर्षे, फ्रान्समधील बहुसंख्य

फ्रेंच बुद्धीजीवी-विचारवंतांना मार्क्सवाद-लेनिनवादाने *नैतिकतेचा* आदर्श कसा असावा याबाबत धडे दिले होते. हेन्री यांनी हा प्रखर हल्ला करताना ते अतिशयोक्ती करीत होते असे म्हणता येणार नाही. एका नामवंत उदाहरणावरून हा मुद्दा स्पष्ट होईल. सिमाँ द बुव्हॉर यांनी आपल्या आयुष्याच्या अखेरच्या काळात आत्मचरित्र लिहिले. ते चांगले चार खंडात आहे. त्यातला तिसरा खंड "La force des choses" या नावाने प्रसिद्ध आहे. त्यात त्यांनी कामूबद्दल पुढील विधान केले आहे. "कामू हे ध्येयवादी, नीतिवादी आणि कम्युनिस्ट विरोधक होते." "**इतिहासात** असा एक क्षण येईल की त्यावेळी त्यांना नतमस्तक व्हावेच लागेल. परंतु त्यापासून आपण लवकरात लवकर माघार घ्यावी यासाठी ते प्रयत्नशील असत." (यातील इतिहास शब्द त्यांनीच अधोरेखित केला आहे. तोच सारी कथा सांगतो) सिमाँ-द-बुव्हार यांच्याबद्दल भले शब्द उच्चारणाऱ्यांच्या मते "बोव्हार यांच्या आठवणी विलोभनीय रसरशीत व खुल्या अंत:करणाने लिहिलेल्या आहेत." पहिले विशेषण अनेकांना कदाचित मान्य होईलही. पण 'खुल्या अंत:करणाचे' काय? परंतु त्यांनी कामू यांचे त्या आत्मचरित्रात जे वर्णन केले आहे त्यात'खुल्या अंत:करणा'चा मागमूसही सापडणार नाही. याउलट कामूबाबत त्या चांगल्याच कुत्सित व सूडबुद्धी प्रकट करणाऱ्या आहेत. तत्कालीन कामू आणि सार्त्र यांच्या लोकप्रियतेबाबतच्या शर्यतीत कामू हे तात्पुरते मागे पडत होते हे सर्वज्ञातच आहे. या वस्तुस्थितीचा फायदा घेऊन बोव्हार त्यावेळी नेहमीच असे सांगत की, त्या मतभेदाला – कामू यांच्या प्रतिपादनाला-तसा काही अर्थ नव्हता. कामू यांच्या प्रतिष्ठेला मिळालेला हादरा व त्याकारणाने त्यांची झालेली मानखंडना या कारणामुळे कामूंच्या मनाला जखमा झाल्या होत्या. त्यातच या दोघांच्या मतभेदाचा उगम आहे. हा युक्तिवाद "बोव्हार" यांच्या हेतूबद्दल बरेच काहीसे सांगतोच. बोव्हार यांनी आपले विधान करताना इतिहास हा शब्द अधोरेखित केला होता. तोच शब्द सारी कथा सांगतो. 'इतिहास' हुकूम देत होता असे सांगितले म्हणजे त्या वादविवादात जो प्रश्न अंतर्भूत होता तो काहीसा धूसर होतो. आपली आई आणि आपल्या ज्ञाती बांधवांचा समूह (PIED NOIR) यांचा त्याग करण्यास कामू यांनी तयार नसणे, नकार देणे, हे 'प्रेमाचे' प्रतीक आहे असे सांगायचे आणि अधिक विश्वासत्मकता असलेला 'न्याय' हे मूल्य प्रस्थापित करणारा जो 'कायदा' आहे, त्यांची वकिली वा पुरस्कार सार्त्र करीत आहे असे म्हणावयाचे– असे करणे म्हणजे मुळात जो प्रश्न होता, त्याकडे दुर्लक्ष करण्यासारखे होते.

सार्त्र आणि बुव्हार यांचे मत आपण बुव्हार यांच्या लिखाणावरून समजावून घेणार असलो, तर सार्त्रवादी, प्रस्तुत प्रश्नाची भेदके या प्रकारे करून आपल्या वागणुकीचे समर्थन करीत नव्हते असा निष्कर्ष काढावा लागेल. नैतिकता ही बुर्झ्वा-बुद्धिजीवी विचारवंतांची केवळ एक हौस-मजेची गोष्ट आहे या निर्णयाप्रत ते आलेले होते. याउलट आपण 'घट्ट' असे व्यावहारिक राजकारणी (Realpoltiker) असले पाहिजे अशी त्यांची इच्छा होती. परंतु



अनुक्रमणिका

असे होते तरी ते कम्युनिस्ट पक्षात दाखल होणार नव्हते. तसे त्यांनी केले असते, तर आपल्या बुर्झ्वा स्वातंत्र्याचा त्यांनी त्याग केला आहे, असा त्याचा अर्थ झाला असता. त्यांच्या मते 'घट्ट' अशा व्यावहारिक राजकारणी व्यक्तीला निदान इतिहास हा कोणत्या दिशेने चालला आहे हे माहिती असल्याकारणाने, त्या चालत्या गाडीत ते उडी मारणार होते. (अल्जेरियात जे फ्रेंच वसाहत करून राहिले होते. त्याना PLED NOIR (पिअद नुआर) म्हणत. (चिखलाचे पाय) यातील बहुतेक जण अनवाणी व पायाला कायम चिखल लागलेला आहे अशा अवस्थेतील शेतकरी होते म्हणून ते 'चिखलाचे पाय' वाले)

आदर्श समाज-समीक्षक कसा असावा याचे वर्णन सार्त्र यांनी अनेक वेळा केले होते. या वर्णनानुसार सार्त्र स्वत: खरोखरच वागले का? याबद्दल शंका घेण्यास भरपूर जागा आहे. 'आपल्या स्वत:चे कुटुंबीय, जमात, सामाजिक पर्यावरण (background) यापासून फारकत करून घेणे, हा ज्यांचा सामजिक धर्म व मिशन आहे' तो समाज-समीक्षक' असे सार्त्र यांनी समाज-समीक्षकाचे वर्णन केलेले आहे. त्याजबरोबर 'कसलीही दयामाया न दाखविणारी' अथक टीका आणि विश्लेषण यांना समाज-समीक्षकाला सामोरे जावे लागते'. सार्त्र यांचा जन्म बुर्झ्वा वर्गात झाला होता म्हणूनच त्यांच्या आत्मटिकेत या वर्गाचा द्वेष करणे अंतर्भूत होते. परंतु कसलीही दयामाया न दाखविणाऱ्या टिकेस सामोरे जाऊन, सार्त्र हे कोणत्याही फ्रेंच सांस्कृतिक परंपरेशी फारशी फारकत करून घेत नव्हते. ही परंपरा प्रख्यात फ्रेंच लेखक प्लोबेर यांच्याशी जाऊन भिडेल इतकी ती जुनी होती; व ती शास्त्रपूतही झाली होती. या कारणासाठीच फ्लोबेरबरोबरचे द्वेष-प्रेम यासारखे व्यामिश्र संबंध, सार्त्र यांचे सर्व जीवन व्यापून होते. अल्जेरियन युद्ध काळात फ्रान्समध्ये प्रत्यक्षात अस्तित्वात असलेल्या राजकीय-सामाजिक परिस्थितीच्या संदर्भात सार्त्र यांच्या भूमिकेचा विचार केला तर काय आढळते? ती भूमिका 'एकला चलोरे' यासारख्या धीरोदात्त नायकाची होती का? एखाद्या द्रष्ट्या भविष्य-वेत्याची आदब त्या भूमिकेत होती का? समाज-समीक्षक कोणास म्हणावे या संदर्भात सार्त्र यांची जी विशिष्ट भूमिका होती. त्यासंबंधी एका राजकीय समीक्षकाने लिहिले होते की "समाज- समीक्षक' होणे हा एक HEROIC प्रकल्प आहे. त्यातून 'हिरो' तयार होतात. हा हिरो आपल्या समाजापासून अलगपणे उभा असतो. त्याची बांधिलकी त्याच्या साक्षेपी तत्त्वाशी असते'' या राजकीय समीक्षकाला नेमके काय सांगायचे आहे? 'सार्त्र' यांचा 'हिरो' या स्वरूपात आपण स्वीकार करावा असे हे राजकीय समीक्षक सांगत आहेत का? ते काय सांगत आहेत हे तितकेसे स्पष्ट नाही. परंतु त्या विधानापासून सार्त्र हे 'हिरो' होते याचे जोरदार सूचन आहे. प्रत्यक्षात परिस्थिती काय होती?

सार्त्र हे आपल्या समकालिनांबद्दल सर्वस्वी वेगळी भूमिका घेणारे होते म्हणजेच ते अगदी एकटे होते असे जर आपण मानणार असलो तर आपणास तत्कालीन आम फ्रेंच जनता, आपल्या फ्रेंच साम्राज्याचे काही झाले तरी, कितीही प्रयत्न करावे लागले तरी त्याचे

रक्षण केलेच पाहिजे या विचाराने खरोखरच भारलेली होती, ही गोष्ट गृहीत धरावी लागेल. पण प्रत्यक्ष वस्तुस्थिती काय होती? तत्कालीन फ्रान्समध्ये वेगळेच वातावरण होते. फ्रेंच उत्तर- आफ्रिकेत जे फ्रेंच सैन्य लढत होते, त्यांच्या हालचालींबद्दल फारच कमी प्रचार फ्रान्समध्ये होत होता. अनेक परकीय नागरिकांच्याही ही वस्तुस्थिती चांगलीच लक्षात आली होती. त्याकाळी एकामागून एक फ्रेंच सरकारे आली व गेलीही. पण त्यापैकी एकाही सरकारने फ्रेंच उत्तर आफ्रिकेत जे काही घडत होते, त्याबद्दल फ्रेंच जनतेला सांगितले नाही व आठवणही करून दिली नाही, याचे कारण काय असेल? त्यापैकी प्रत्येक फ्रेंच सरकारला आपण त्या दिशेने प्रयत्न केल्यास, फारसा प्रतिसाद मिळणार नाही, फारच बेताची सहानुभूती प्राप्त होण्याची शक्यता आहे हे चांगले ठाऊक होते. या कारणामुळे त्यांनी त्या दिशेने प्रयत्नच केले नाहीत. फ्रान्समधील वृत्तपत्रेही फ्रेंच-अल्जेरियन युद्धाबाबत उदासीन होती. त्या युद्धात फ्रान्समधील सरकारला पाठिंबा मिळावा यासाठी जन-जागरण करावे, जनतेला प्रोत्साहित करावे यासाठी ती प्रयत्नशील नव्हती. त्यांची भूमिका तटस्थतेची होती. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास सार्त्र यांच्या भूमिकेत 'हिरॉईक' असे खास काहीही नव्हते अल्जेरियातील बंडखोरांची तरफदारी करणारे लेखन करून, उत्तर आफ्रिकेतील फ्रेंच-अल्जेरिया युद्धाच्या संबंधात फ्रेंच– सरकारविरुद्ध भूमिका घेऊन फ्रेंच जनतेचा राग आपल्यावर सार्त्र ओढवून घेतील असे त्या लिखाणात काहीही नव्हते. याउलट भूमिगत चळवळीत जे कोणी काम करत होते. त्यांना कितीतरी प्रमाणात प्रत्यक्ष धोक्यास सामोरे जाणे भागच होते. सार्त्र या भूमिगत चळवळीत कधीही नसल्याकारणाने तसे ते चांगलेच सुरक्षित होते. एवंच कॅप्टन ड्रेईफसच्या बचावासाठी उभ्या राहिलेल्या प्रख्यात फ्रेंच लेखक झोला व सार्त्र यांच्यात आपण गल्लत करता कामा नये झोला आम फ्रेंच जनतेच्या रोषाला सामोरे जात होते, त्यात अनुस्यूत असलेला धोका पत्करण्यास तयार होते. सार्त्र यांच्या बाबतीत तसे काहीही नव्हते.

सार्त्र आणि कामू हे ज्या 'जगात' वास्तव्य करून होते त्या 'जगा'ची आपण खरे म्हणजे कल्पना करण्याचा प्रयत्न केला तर आपणास काय आढळून येते? या ठिकाणी 'जग' हा शब्द अमूर्त असे भौगोलिक राष्ट्रीय आणि आर्थिक केंद्र या अर्थाने बंदिस्त करून वापरण्यात आलेला नाही. तो 'अस्तित्ववादी' अर्थाने म्हणजे प्रामुख्याने सामाजिक-सांस्कृतिक पर्यावरण या अर्थाने वापरलेला आहे. तसे केले म्हणजे मग सार्त्र यांना अभिप्रेत असलेल्या अर्थाने कामू हेच हिरो (समाज-समीक्षक) ठरतात. वरवर पहाता हे विधान चमत्कारिक आहे असे वाटेल याचे कारण सार्त्रनी वारसाहक्काने आलेल्या आपल्या सामाजिक मुळापासून मोठ्या धैर्याने आपणास अलग करून घेऊन ते स्वतंत्र झाले होते. याउलट कामूनी अल्जेरियातील त्यामानाने संकुचित व स्थानिक स्वरूपाच्या विश्वासापासून-फ्रेंच समाजापासून सर्वस्वी फारकत करून घ्यावयाचे नाकारले होते. यावरून 'समाज-समीक्षक' हे नाव सार्थपणे



अनुक्रमणिका

धारण करण्यास जी पूर्व अट होती ती सार्त्र पुरी करीत होते असे वरवर पहाता वाटेल. पण कामू आणि सार्त्र यांचे वास्तव 'जग' कोणते होते याचा आपणास विसर पडला नाही म्हणजे मग कामू हेच हिरो होते हे पटण्यास अडचण पडणार नाही. फ्रेंच बुद्धिजीवी-विचारवंत हे त्या काळी बहुतांशाने डाव्या गटाचे होते. अल्जेरियात वसाहतवादाविरुद्ध बंड करून युद्ध करावयास सज्ज झालेल्या अल्जेरियन-अरब जनतेच्या बाजूचे होते. म्हणजेच त्या युद्धास पाठिंबा देणारी भूमिका घेऊन सार्त्र त्या बुद्धिजीवी-विचारवंतांना साथ देत होते. थोडक्यात ते आपल्या जगातच राहत होते. सार्त्रनी त्या जगाशी फारकत करून घेतलेली नव्हती. तसे करताना, त्या विचारवंतांना सार्त्रनाही जे प्रिय होते त्याचा त्याग ते करीत नव्हते. थोडक्यात त्या बहुसंख्य बुद्धिजीवी-विचारवंतांचे जे विचार अगोदरच पक्के झाले होते, त्यांना आव्हान देण्यास सार्त्रची तयारी नव्हती. याचे कारण तसे केल्याने, आपण जे नियतकालिक चालवितो त्याच्या वाचकवर्गात घट होईल याची भीती सार्त्रना होती, म्हणूनच या बुद्धिजीवी-विचारवंतांच्या बाजूसच आपण नेहमी असावे याविषयी ते नेहमीच फार उत्सुक असत.

या विषयाची सखोल चर्चा ANNA BOSCHETTI अँना बॉसचेट्टी यांच्या The Intellectual Enterprise, Sartre and the Modern Times (बौद्धिक चळवळ, सार्त्र आणि आधुनिक काळ) या ग्रंथात करण्यात आलेली आहे. हा ग्रंथ इ. स. १९८५ च्या सुमारास प्रसिद्ध झालेला आहे. सार्त्र ज्या 'जगात' कार्यरत होते आणि तत्कालीन सामाजिक-सांस्कृतिक पर्यावरणाशी सार्त्र यांच्या संबंधाची, सुरुवातीपासून तो इ. स. १९५७ च्या अखेर पर्यंतच्या काळातील घडामोडीबाबत अगदी तपशिलात जाऊन या ग्रंथात चर्चा करण्यात आलेली आहे. या 'जगा'तील जनतेचे मत कोणत्या बाजूला झुकत आहे यावर सार्त्र फारच बारीक लक्ष ठेऊन असत. असे करून आपले वैचारिक तारू भरकटू नये याची काळजी ते घेत. या संबंधीचे या ग्रंथातील विवेचन चांगलेच सुस्पष्ट आहे आणि चांगले बोलकेही आहे. मार्लो-पाँन्टी हे सार्त्र यांचे एकेकाळचे फारच जवळचे सहकारी. पण फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाची जी 'पार्टी-लाईन' होती तिच्या विषयी या सहकाऱ्याचा भ्रम-निरास दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणात होत होता. विशेषत: मार्लो पॉन्टी यांची ही भूमिका उत्तर कोरियाने-दक्षिण कोरियावर स्वारी केल्यानंतरच्या काळात कोणाच्याही लक्षात येईल इतकी स्पष्ट होऊ लागली होती. या कारणाने सार्त्रच्या नियतकालिकाच्या कम्युनिस्ट वाचकांनी नापसंती व्यक्त करण्यास सुरुवात केलेली पाहून, सार्त्र यांनी मार्लो-पॉन्टी यांना 'ले ताम्प मोर्डेन' मधून चक्क हाकलून दिले होते.

सार्त्र ज्या 'जगा'त वावरत होते, त्याच 'जगा'त कामूंही वास्तव्य करून होते. एकाच प्रकारच्या बुद्धिजीवी-विचारवंताच्या पर्यावरणात ते दोघेही काम करीत होते. कामूंच्या एकंदर सर्वच प्रतिक्रिया या सर्वस्वी वेगळ्या प्रकारच्या असत. अल्जेरिया-फ्रान्स युद्ध व त्या संबंधीच्या कामूंच्या प्रतिक्रिया हे एक नामवंत उदाहरण आहे. खराखुरा 'स्वतंत्र्य' लेखक म्हणजे काय, हे जाणून घ्यायचे असेल तर कामूंकडेच वळावे लागते. अल्जेरियातील फ्रेंच

जमातीपासून सर्वस्वी फारकत करून घेण्यास नकार देऊन अल्जेरियातील अरब बंडखोरांना साथ न देऊन त्या अल्जेरियातील फ्रेंच समाजाच्या नशिबात जे काय वाढून ठेवलेले आहे, त्यास मी जबाबदार नाही, असे जाहीर करण्यास काम्यूनी नकार दिला होता. असे करीत असताना फ्रेंच सांस्कृतिक जीवनाच्या जगतात त्यांना तोवर जी प्रचंड प्रतिष्ठा (सार्त्र पेक्षाही ती कितीतरी प्रमाणात जास्त होती) प्राप्त करून घेतली होती, ती गमविण्याचा धोका आहे हे त्यांना चांगलेच माहीत होते. हे सारे ठाऊक असूनही त्या धोक्यास ते छातीठोकपणे सामोरे गेले. पण त्याजबरोबर अल्जेरियात 'चिखलाचे पाय' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या फ्रेंच जमातीबरोबरचा संघर्षही त्यांनी टाळला नाही. या समाजाची 'न्याय' या मूल्याबद्दल जी धारणा होती, तिला कामू यांचा विरोध होता. त्यांनी तसे जाहीरही करून टाकले होते. या कामू यांच्या धोरणामुळे अल्जेरियातील फ्रेंच जमात आणि फ्रान्समधील सांस्कृतिक जग या दोघांपासून ते दुरावले. थोडक्यात ते या सर्वच लोकांना 'परके' वाटत होते. न्याय व प्रेम या मूल्यांच्या ज्या प्रकारावर त्यांची श्रद्धा होती, त्यांच्या समर्थनार्थ ते आपल्या आयुष्याच्या अखेरच्या काळातही उभे राहिले होते. अगदी एकट्यानेच सर्व प्रतिष्ठेचा त्याग करून ते त्या संघर्षाला सामोरे गेले होते. सार्त्रनी जेवढे धैर्य दाखविले, त्यापेक्षा कामूंनी ज्या परिस्थितीत ती भूमिका घेतली होती, त्यासाठी कितीतरी अधिक धैर्य लागते. आपला प्रभाव जेणे करून कमी होईल अशी कोणतीही गोष्ट करण्यास सार्त्रनी नेहमीच नकार दिला होता. अशा संघर्षात्मक भूमिकेपासून त्यांनी नेहमीच फारकत करून घेतलेली होती. अगर ज्या कोठच्या गोष्टीचा त्याग केल्याने आपल्याला अगदी किरकोळ स्वरूपाच्या का होईना संघर्षास तोंड द्यावे लागेल. अशा एकाही गोष्टीचा सार्त्रनी त्याग केला नव्हता. एवंच दुसऱ्या महायुद्धानंतरच्या लगतच्या काळात परंपरागतपणे कामू यांची जी प्रतिमा जनमानसात त्यांच्या शत्रूंनी तयार केली होती ती किती चुकीची होती हे सार्त्र यांच्या एका उदाहरणावरून स्पष्ट होईल.

### चार

### कामूंची अल्जेरिया प्रश्नातील लढाई - कामू एक समाज-समीक्षक

लोकशाही या समाजव्यवस्थेवर नितांत श्रद्धा असलेले जे कोणी असतील, त्यातही जे कोणी डाव्या गटाचे स्त्री-पुरुष आहेत, त्यांच्या दृष्टीने कामू ही आदर्श व्यक्ती होती. अपघातात कामू यांना अकाली जो अर्थहीन असा मृत्यू आला, त्यामुळे त्यांचे लेखन आणि जीवन या दोन्ही गोष्टी चांगल्याच उजळून निघाल्या आहेत. कालांतराने त्यांचे जीवन व लेखन एक 'मिथ' होऊन बसले. कामूंच्या आणि आपला प्रत्यक्ष परिचय नसला तरी त्यांची आपली फारच चांगली ओळख आहे, असे प्रत्येक वाचकाला वाटते. हे असे वाटणे तसे वाजवीच आहे. याचे कारण कामू हे कोठच्या मूल्यांच्या रक्षणासाठी खडे होते हे आपणास माहीत आहे. ते तत्त्वनिष्ठ होते, व न्यायी गृहस्थ (JUST MAN) होते. हर्बर्ट लोटमन यांनी

कामूंचे जे चरित्र लिहिले आहे त्यावरून प्रत्येक आठवड्यातील सोमवार, मंगळवार, बुधवार .... थोडक्यात प्रत्येक दिवशी ते काय करीत असतील हे आपणास ज्ञात होते, एवढी बारीक-बारीक माहिती होऊनही त्यांच्याबद्दल जो 'मिथिक' स्वरूपाचा आदर आहे तो काही कमी होत नाही. या उलट या अत्यंत नेक व प्रज्ञावान माणसाच्या अंतर्मनात कोठच्या स्वरूपाचा संघर्ष चालू होता, याचे ज्ञान होते.

परंतु त्यांच्या आयुष्यात, अल्जेरिया-फ्रान्स युद्धाच्या काळी असा एक क्षण येऊन गेला की त्यावेळी कामूंनी तोवर ज्या तत्त्वांचा पुरस्कार केला होता, ज्यांच्यावर त्यांची नितांत निष्ठा होती, त्या तत्त्वाचा त्यांनी विश्वासघात केला, अशी तत्कालिन सर्वसामान्य जनांची समजूत आहे. त्यापैकी सार्त्र व सिमाँ द बुव्हार यांच्या टीकेबद्दल तिसऱ्या भागात विवेचन येऊन गेलेच आहे. कॉनॉर क्रुईज ओ'ब्रिअन (CONOR CRUISE O' BRIEN) या लेखकाने, कामूंवरील आपल्या छोटेखानी पुस्तकात कामूंच्या करारी ताबडतोबीचे (URGENCY) रूपांतर पोकळ बडबडीत झाले असे म्हटले आहे. वसाहतवादात अनुस्यूत असलेल्या क्रूरतेचे आकलन, तत्कालिन फ्रान्समधिल बुर्झ्वा वर्गाला झाले नाही, या बाबतीत तो वर्ग कसा असमर्थ ठरला, याची इ. स. १९५४ सालानंतरची अनेक उदाहरणे या पुस्तकात वाचकास पेश केली आहेत, परंतु कामूंना आलेल्या अपयशामुळे (?) त्यांच्याबद्दल निर्माण झालेल्या 'मिथ'ला एक प्रकारे बळकटीच येते. कामू हा गालबोट लागलेला हिरो - म्हणजे हा हिरो, तुमच्या-आमच्या सारख्या सामान्य मनुष्य होता असे वाटू लागते. परंतु त्यांना जे अपयश आले, ते अयशस्वी ठरले ते नेमके कसे व कोठे?

कामू यांचे अल्जेरिया-फ्रान्स युद्धकाळातील वागणे, त्यांचे धोरण, त्यांची भूमिका ही खरोखरच चुकीची होती का? खरे म्हणजे चूक कोठे असेल, तर ती कामू या नावांची 'मिथ' यात आहे. आपण त्यांना हिरो मानले नाही, त्या बंधनातून त्यांना मुक्त केले की आपणापुढे त्यांचे कोठचे चित्र उभे राहाते? इ. स. १९४० च्या सुमारास-म्हणजे दुसऱ्या महायुद्धाच्या काळात, जर्मन आक्रमकाविरुद्ध फ्रान्समध्ये चालू असलेल्या-वेळ प्रसंगी आपला जीवही गमवावा लागेल हे ठाऊक असूनही - भूमिगत चळवळीत ते सामिल होते. (सार्त्र कधीही नव्हते. आँद्रे मार्लो होते. कामू हे आँद्रे मार्लो यांना आपल्या अगदी सुरुवातीच्या दिवसापासून 'आपले' समजत होते) या काळात कामूंना हिरोचा मान प्राप्त होणे हे क्रमप्राप्त होते. न्यायी 'गृहस्थ'हा शब्द प्रयोग तितकासा चांगला नाही. याचे कारण त्या शब्दाचे द्वारा नैतिक निरपेक्षतावाद (MORALABSOLUTISME) सुचीत होतो, खरे म्हणजे कामू हे एक भले गृहस्थ होते, वाईट परिस्थितीतही ते आपल्या बहुतेक सहकाऱ्यांपेक्षा आणि समकालिनांपेक्षा अधिक चांगले होते असे म्हणणे हे अधिक संयुक्तिक व न्याय्य ठरेल. बुद्धिजीवा-विचारवंत या स्वरूपात रोजी-रोटी कमविणारे ते एक लेखक होते. एक जहाल समीक्षक होते. अशा प्रसंगात ते आपण होऊन जात की ज्यावेळी निवड करणे फारच कठीण

असते. काही वेळा कामूंनी माघार घेतली असेलही. पण रणमैदान सोडून ते कधीही पळून गेले नाहीत. प्रत्यक्ष व्यवहारात समीक्षा कशी असते, समीक्षेची बांधिलकी कोठच्या गोष्टींस असावयास हवी, तिच्या मर्यादा कोठच्या आहेत या संबंधात कामूंचा जो अनुभव आहे, त्यावरून प्रत्येकाला थोडेफार नक्कीच शिकता येईल.

कामू हे जुन्या फ्रेंच परंपरेचे प्रतिनिधी आहेत. साहित्यिक आणि नीतिवादी (MORALISTE) फ्रेंच समाजात मान-सन्मान असलेली ही परंपरा आहे. परंतु या परंपरेत काही मोहही अनुस्यूत आहेत. ईश्वराला साजेल अशा तऱ्हेच्या घोषणा करणे, हा त्यापैकी एक. इतरांप्रमाणे कामूंही या मोहाला बळी पडले होते. परंतु आपल्या स्वत:साठी म्हणून जी कार्यक्रमपत्रिका त्यांनी मान्य केली होती, जिच्यावर त्यांची श्रद्धा होती, तिच्याशी बांधिलकी पत्करून घोषणा करणाऱ्या त्या मोहाचा त्यांना प्रतिकार करावयाचा होता. आपण समाजापासून जर पुरेसे दूर उभे राहिलो, तर जगाकडे, ईश्वराला जसे या भौतिक जगाकडे पाहाता येते तसे आपणास खरोखरीच नैतिक (MORAL) जगाकडे पाहता येईल, असे कामूंना वाटत असे. कामू हे एकदा विमानाने अल्जेरियाहून पॅरीसला गेले. त्यानंतर त्यांनी आपल्या नोंदवहीत, नोंद केली की 'एवढ्या उंचीवरून निसर्ग या नावाची गोष्ट उरत नाही. खोल दऱ्या, डोळ्यांना सुखावणारे चढ-उतार, पार न करता येणारे ओढे, हे सारे सारे नाहीसे होते. उरते फक्त एक आकृती-नकाशा, थोडक्यात मानव हा ईश्वराच्या डोळ्यातून पहात असतो. मग त्याला असे आलोकन करता येते की, ईश्वराकडे अमूर्त दृष्टिकोनाशिवाय अन्य कोणताही दृष्टिकोन नसतो, ही काही चांगली गोष्ट नाही. (कामू नोंदवही १९४५ ते १९५१ पा. नं. १२२) भूगोलात हे जसे चांगले नाही, तसेच ते नीतिपर आयुष्यातही अधिक चांगले नसते.

प्रत्यक्ष संबंध आणि जवळीक यांची आवश्यकता खऱ्याखुऱ्या मदतीसाठी असते. (TRUE RELIEF) त्याच प्रमाणे खऱ्या नैतिकतेसाठी प्रेम आणि आपण ज्याच्यावर प्रेम करतो त्यात सामील होण्याची, अंतर्भूत होण्याची आवश्यकता असते. असे असले तरी सर्वसाधारण व सर्वमान्य नैतिकता म्हणजे काय या विषयीच्या सिद्धांतात हे विश्लेषण चपखलपणे बसत नाही. यदाकदाचित बसलेच तर अगदी अंग चोरून, अवघडल्यासारखे बसते. याचे कारण प्रेम ही भावना आपल्या जवळचे असे जे कोणी थोडे असेतात त्यांना नेहमीच झुकते माप घालते, कामूंनी लिहिले आहे, "प्रेम हा अन्याय आहे हे खरे, परंतु 'न्याय' असणे पुरेसे नाही." कामू एक लेखक हे विचारात घेऊन त्यांच्या कारकीर्दीचे खंड पाडले, तर दुसऱ्या कालखंडात THE PLAGUE, THE JUST ASSASINS आणि THE REBEL या कादंबऱ्यांचे लेखन ते करीत होते. त्या कालखंडात ठेवलेल्या ज्या नोंदवह्या आहेत,. त्यात प्रेम 'अन्याय' यांचा उल्लेख आहे हे खरे परंतु 'न्याय' असणे हे पुरेसे नाही या

विधानातून व्यक्त होणारा ताण त्या नोंदवह्यातील लिखाणात जे संविधान आहे; त्यात पुन्हा पुन्हा ठोसपणे नोंदविलेला आढळतो. कामूनी वेगवेगळ्या प्रकारची समीकरणे मांडून पाहिली. त्यात 'प्रेम' आणि 'न्याय' या तर्कबुद्धीला पटणाऱ्या आणि आपआपल्या क्षेत्रातही तर्काला धरून असणाऱ्या या दोन मूल्यात जो विसंवाद व ताण आहे, तो त्या समीकरणातही तसाच राहिलेला आढळतो. वास्तविक त्यांना हे सारे सव्यापसव्य टाळण्यासाठी खरे म्हणजे एक चांगला मार्ग होता. त्यानी फक्त एवढेच सांगावयास हवे होते की, ज्या 'न्याया'मध्ये 'प्रेमाला' काहीही स्थान नाही तो 'न्याय' असण्यापेक्षा 'अन्याय' असण्याचा संभव आहे. त्यांची या विचारावर श्रद्धा होती असे दिसते. परंतु त्यांचे जे टीकाकार आहेत वा होते ते ही गोष्ट नाकारतात.

अल्जेरिया-फ्रेंच युद्धाला कामूनी जो प्रतिसाद दिला, त्याच्यावर दोन प्रकारची टीका झालेली आहे. पहिला जो आक्षेप आहे त्यानुसार ते वस्तुनिष्ठपणे विचार करीत नाहीत, आपण ज्या प्रश्नाचा विचार करीत आहोत, त्याबद्दल नेमकेपणाने काय करावे हे सांगत नाहीत. एक प्रकारची ठोकळेबाज विश्वात्मकता म्हणजेच अवकर्षणता (abstraction) त्यात आहे. याच अवकर्षणतेबद्दल कामूंच्या मनात नेहमीच द्वेषभावना होती. नेमके याच अवकर्षणतेला कामूनी शरण जावयास हवे होते अशी या टीकाकारांची अपेक्षा होती. विश्वात्मकता याचा अर्थ नैतिकतेचा एकच नियम सर्वत्र सारखाच लागू केला पाहिजे असे या टीकाकारांचे म्हणणे होते. कामू सांगत होते, सर्व गोष्टीतील प्रत्येक गोष्ट लक्षात घेऊन त्या नियमाची अंमलबजावणी व्हावयास हवी. एखाद्या ढुड्ढाचार्याचा आव आणून, या टीकाकारांनी असे सांगितले होते की दडपशाही करणारे आणि दडपले जाणारे हे प्रत्यक्ष ज्या परिस्थितीत वावरत आहेत हे लक्षात न घेता या दोघांनाही एकच मानदंड वापरून कामू जोखीत होते. त्यांच्यावर दुसरा ओक्षप ते विवक्षित अंतर ठेवून परिस्थिती व घटना यांचे मोजमाप घेण्यात त्याना अपयश आल्याकारणाने, ते फार भावनावश होऊन, ज्याला मर्यादा नाहीत अशा प्रकारचा व्यक्तिवाद (Particularism) स्वीकारार्ह मानतात, या संबंधात आहे. कामू आपली नेहमीची पातळी सोडून खालच्या पातळीवर येतात आणि आपले नातेवाईक व मित्र यांचा बचाव करतात. हे दोन आरोप हे खरे म्हणजे एकच आरोप आहे. आपला व्यक्तिवाद (Particularism) लपविण्यासाठी कामूची विश्वात्मकता हा एक पडदा आहे; असा आरोप त्यांच्यावर करता येईल. ते ज्यावेळी 'न्याया'बद्दल बोलत असत. तेव्हा त्यांना अल्जेरियातील स्थानिक फ्रेंच जमातीबद्दलचे आपले प्रेम त्याना लपवावयाचे असते. सिमाँ द बुव्हॉर यांनी या संदर्भात लिहिताना म्हटले होते की मानवतावाद्याने (कामूनी) 'चिखलाचे पाय' असलेल्या फ्रेंच लोकांचा मार्ग मोकळा करून दिलेला आहे (चिखलाचे पाय असलेला लोकांनी थोडक्यात काहीही करावे !) यातूनच त्यांच्या शैलीदार लिखाणातील (Rhetoric) पोकळपणा – Bad faith 'शबल श्रद्धा' लपवाछपवी युक्त लेखन व विचार ढंगाचा उगम



अनुक्रमणिका

होतो. सिमाँ द बुव्हार यांनी त्याक्षणी कामू हे 'न्याया'व्यक्तिरिक्त 'न्यायी' माणूस आहेत असे म्हटले होते.

कामू याना अल्जेरितील घटनासंबंधी काय म्हणावयाचे होते ते त्यांच्या Actuelles खंड तीन मध्ये वाचावयास मिळते. ते वाचल्यानंतर त्यात 'शबलश्रद्धा' दृष्टोत्पत्तीस येत नाही. Actuelles (विद्यमान काळ) मध्ये कामूंनी वेळोवेळी केलेली भाषणे, आणि वृत्तपत्रात लिहिलेले लेख एकत्रित करून छापलेले आहेत. या सर्व साहित्यात नैतिकतेबद्दल चिंतात्मक हुरहूर (anxieties) प्रथम वाचनातच आपल्यास आढळते. त्यासाठी खोलात अजिबात जावे लागत नाही. 'न्याय' आणि 'प्रेम' 'विश्वात्मकता' आणि 'व्यक्तिवाद' या साऱ्या गोष्टींचा अगदी खुलेआम पुरस्कार करण्यात आलेला आहे. त्यासंबंधीचा पुरावा अगदी लगेच हाती येईल अशा प्रकारे हा पुरस्कार करण्यात आलेला आहे. थोडक्यात येथे कसलीही 'लपवा-छपवी' नाही. काहीही दडविलेले नाही. या सर्व लेखातून आपणास काय आढळते? त्यातले चुकीचे कोणते आणि बरोबर काय? या संबंधीचा नकाशा तयार केला, तर त्यात प्रत्यक्ष भूमीवर काय अडथळे आहेत, हे लक्षात येत नाही. शिवाय हा नकाशा पुरेसा प्रातिनिधिक असतो असे नाही. 'समाज- समीक्षका'ला याविषयी सातत्याने जागरूक रहावे लागते. हे संभाव्य अडथळे पार कसे करावयाचे या संबंधीचे लिखाण या लेखातून आढळते. कामू यांचे विरोधक दोन प्रकारचे. त्यातल्या एका गटातले विरोधक, नैतिकता हा मानदंड वापरून, हे अडथळे दूर करण्याचा प्रयत्न करतात. दुसऱ्या गटातील लोक, तत्त्वप्रणाली वापरून तेच काम करू इच्छितात. हे दोन प्रकारचे समीक्षक ते कोणत्या प्रकारचे निष्कर्ष काढतात. त्या-वरूनच त्यांना दोन वेगवेगळ्या गटात पाठविले जात नाही. ते आपल्या समकालिनात व सहकाऱ्यात, नेमके कोठे उभे आहेत याचीही मदत त्याना अलग करण्याच्या कामी घ्यावी लागते. यापैकी कोणतीही भूमिका घेण्याआगेदर ही भूमिका कोणत्या मुद्यावर घ्यावयाची हे तर ठरले पाहिजे. कोठे? कामूचे विरोधक म्हणतात, 'अगदी जवळ जाऊन- तसे झाले म्हणजे मग तुम्ही प्राप्त परिस्थितीची भलावण करू लागता.' त्यावर चांगले दूर जाऊन अशी प्रतिक्रिया कामू व्यक्त करतात. तसे झाले म्हणजे मग त्यातून आतंकवादी निर्माण होतात. या दोन्हीही दृष्टिकोनातील कळीचा मुद्दा कोणता असेल तर हे 'अंतर' नेमके किती असावे हे ठरविणे हाच आहे.

Notebooks 1942 (नोंदवही १९४२) मध्ये कामूनी पुढील नोंद घेतलेली आहे. कालीस्पोने युलीसिसला निवड करावयास सांगितले. चिरंजीव होणे युलीसिसला पसंत आहे की त्याला आपली जन्मभूमी हवी आहे? मला 'चिरंजीव' व्हायचे नाही असे युलीसिस सांगतो. ओडीसी (ODYSSEY) या महाकाव्याचा सर्व अर्थ या घटनेतच आहे. कामूंचा सर्व-साधारण दृष्टिकोन यासारखाच होता. कामूना आपणास 'न्याया'ची प्राप्ती नेहमीच सातत्याने व्हावी ही गोष्ट आणि अल्जेरिया यात निवड करावयाची होती. सातत्याने नेहमी मिळणारा





सहभागी आहे'' यानंतरही पुन्हा एकदा ही प्रज्ञावान विदुषी आपणास सांगते की ''हे त्या रस्त्यावरचे सर्व लोक. . . हे सर्व खुनी आहेत. मीही त्यात आहे. मी फ्रेंच आहे. दृष्टीलाही असह्य असलेल्या एखाद्या व्यंगाची कबुली देताना ज्या महाभयानक वेदना होतात. तसेच (माझे) झाले आहे. या शब्दांचा उच्चार केल्यामुळे माझा घसा पोळून निघाला.'' या प्रदीर्घ विवेचनातून प्रज्ञावान श्रीमती बोव्हार या **आपल्या स्वत:च्याच** व्यंगाचे वर्णन करीत नाहीत का?

प्रज्ञावान श्रीमती बोव्हार यांची थट्टा करणे, हा हेतू या ठिकाणी नाही. त्यांच्या आत्मचरित्रात खोट्या घटनांची नोंद आहे असे नाही. पण त्यांच्या आयुष्यात घडलेल्या घटनांचे समर्थन जेणे करून होईल असा रंग त्या घटनांना त्या देतात, हे खरे आहे. त्यांचे आत्मचरित्र आश्चर्य करावे असे रसरशीत व खुल्या दिलाने लिहिलेले आहे. त्या तरल संवेदना असलेल्या लेखिका आहेत. **पण त्यांचे राजकारण व नैतिकता ही कमालीची कलाहीन होती.** तसे कानूंचे कधीही नव्हते. श्रीमती बोव्हार यांनी अल्जेरियाबाबत वाटणारी शरम व्यक्त केली आहे. पण ती शरम त्या ज्याप्रकारे 'आविष्कृत करीत आहेत, ती रोगट प्रवृत्तीची आहे. या दोन्ही गोष्टी इतर देशातही आढळतात. उदा. व्हिएटनाम युद्धाच्या काळात अमेरिकेतल्या डाव्या गटातील मंडळीतही या गोष्टी आढळून येत होत्या. याठिकाणी एवढेच सूचित करावयाचे आहे की समाज-समीक्षक होण्यासाठी सार्त्रनी सांगितलेल्या अटी या पूर्व-अटी नाहीत. समाज-समीक्षेची ती परिणती आहे. समाज-समीक्षक बनण्यासाठी समाजा– वरोबरचे आपले संबंध कोणी तोडून टाकतो असे नाही. समाज-समीक्षेची ती परिणती असते. समाज-समीक्षक जी टीका करतो त्याची ताकदच इतकी जबरदस्त असते की तो समीक्षक समाजावरोबरचे आपले संबंध आपणच तोडून टाकावेत का? असा विचार करू लागतो. परंतु समाजाबरोबरचे संबंध समीक्षकाने खरोखरच तोडून टाकले, तर मग ती टीका वा समीक्षा ठेचकाळेल, अडखळेल आणि अपशयी ठरेल. याचे कारण असे आहे की, टीका यशस्वी होण्यासाठी समीक्षकाला आपल्या समाज-बांधवात मानाचे स्थान असावे लागते. त्याचे असे आहे की समाजाबरोबरच्या आपल्या रिश्तेदारीचा– ती नसल्यास प्रश्नच उपस्थित होत नाही– फ़ायदा तो उठवीत असतो. समजा तो आपल्या समाज बांधवांचा द्वेष करीत असेल आणि त्यांच्यावरोबरचे संबंध त्याने तोडून टाकले असतील तर तो समीक्षक जे काही सांगतो आहे त्याकडे त्या समाजवांधवांनी काय म्हणून लक्ष द्यावे?

समाज-समीक्षेला योग्यपणे नेहमी केव्हा सुरुवात होते? हा प्रश्न उपस्थित करण्यापूर्वी या अगोदरच्या वाक्यात जो प्रश्न उपस्थित केला आहे त्याचा विचार करू या. तो प्रश्न धोरण विषयक आहे असे नाही, तर तो नैतिकही आहे का? या मुद्याचा फार विस्तृत नव्हे पण थोडक्यात विस्तार करण्यात येईल. समाज-समीक्षकाबद्दल सार्त्रनी आपणास काय सांगितले आहे? त्यांनी सांगितले आहे की समाज-समीक्षकाने आपण ज्या वातावरणात

वाढलो, शिक्षण घेतले, लहानपणी जेथे आपले संगोपन करण्यात आले, त्या पर्यावरणातून आपली सुटका करून घेतली पाहिजे. परंतु त्यानंतर विश्वात्मक तत्त्वांच्या जगतात प्रवेश करावयाचा नाही मग त्याने काय करायचे? प्रथम या समाज-समीक्षकाने स्वत:च विश्वात्मक बनणे अत्यंत आवश्यक आहे. या तत्वावरहुकूम होणाऱ्या राजकीय व्यवहारात (PRACTICE) त्याने सामील झाले पाहिजे. अशा प्रकारे हा समीक्षक जेव्हा जगाचे परिवर्तन करीत असतो. तेव्हा त्याने स्वत:तही परिवर्तन करून घेतले पाहिजे. हेच अधिक सोप्या भाषेत सांगावयाचे झाल्यास समीक्षकाने स्वत:जवळ असलेल्या आपल्या नैतिकतेच्या नकाशाशी सल्लामसलत करून, दडपले जाणारे आणि दडपशाही करणारे यांना अलग करणारी जी सीमारेषा असेल ती ओलांडण्याची तयारी केली पाहिजे. या संकल्पाची सिद्धी व्हावी यासाठी समीक्षकाने कोणते काम हाती घेतले पाहिजे? सार्त्र सांगतात. "दडपल्या गेलेल्या, कोणताही हक्क नसलेल्या, तळागाळातील वर्गावरोबर. . . समाज– समीक्षकाने. . . कोणतीही अट न घालता, अगदी प्रत्यक्ष असा सहकार केला पाहिजे, त्याच्याबरोबर संयुक्त आघाडी उघडली पाहिजे." परंतु हे करण्यासाठी त्या तळागाळातील वर्गावरोबर त्यांच्या वस्तीत जाऊन राहण्याची व त्यांच्यात काम करण्याची आवश्यकता नाही. कामू यांनी Guest (पाहुणा) या नावाची एक छान लघुकथा लिहलेली आहे. त्या कथेत दारयू (DARU) नावाचा एक शाळामास्तर आहे. त्याच्या सारखेच हे आहे. कोणत्याही प्रकारची अट नसलेली बांधिलकी पत्करूनही 'संकल्प सिद्धी' करता येते असे सार्त्र सांगत आहेत. थोडक्यात सार्त्रचे म्हणणे असे आहे की समीक्षकाने आपली राजकीय भूमिका बदलण्यासाठी आपले सामाजिक स्थान बदलण्याचे कारण नाही ! ते काहीही असो. असे असले तरी समीक्षकाला आपले स्वत:चे असे नवे आयुष्य निर्माण करावेच लागते आणि ही निर्मिती ही फारच कठीण गोष्ट आहे.

सार्त्रना अभिप्रेत असलेल्या या समीक्षकाने दैनंदिन जीवनात प्रत्यक्ष कसे रहावयाचे? या जीवनात त्याचे कॉमरेडस् कोण असतील? या समीक्षकाला जी सीमारेषा ओलांडण्याचा जबरदस्त मोह असतो, ती सीमा पार केल्यानंतर त्या दुसऱ्या बाजूला असलेल्या तळा–गळातील लोकात त्याला कधीही सामावून घेतले जात नाही. याचे कारण या समीक्षकाला त्या पर्यावरणाची सवय नसते आणि त्यात त्याला सहजपणे वावरता येत नाही. त्याच्याकडे असलेली त्या तळागाळातील लोकांबद्दलची अपार कणव, त्याची त्या वर्गाशी असलेली निष्ठा, आपुलकी, आणि यासारख्या अनेक भावनानी वा प्रत्यक्ष कृतीनींही या समीक्षकात व तळागाळातील ते वर्ग यांच्यात असलेली दरी सहजासहजी भरून येत नाही. सार्त्र आणखीही एक आशा व्यक्त करतात. ही बांधिलकी स्वीकारलेली जो बुद्धिजीवी– विचारवंत आहे. त्याने "समीक्षा, विश्लेषण, पृथक्करण,टीका करण्याबाबत आपले जे गुण व बुद्धी आहेत. त्यांचा कधीही त्याग करावयाचा नाही." आता हे असे होण्यात अर्थातच धरले तर चावते सोडले तर पळते अशा स्वरूपाच्या अडचणी आहेत. याचे कारण समीक्षकाचे हे जे गुण आहेत, ते





त्याच्या अवती-भोवती असलेल्या सामाजिक पर्यावरणाची व त्याचे ज्या प्रकारे संगोपन झालेले असते त्याची निर्मिती असते. त्याचे असे आहे की समीक्षकाने अत्यंत जहालपणे व पराकोटीने आपल्याला सदैव परिचित असलेल्या समूहापासून फारकत करून घेतलेली आहे. यानंतर तो एका नव्या, त्याला बौद्धिकदृष्ट्या हव्या-हव्याशा वाटलेल्या समाजात येऊन दाखल झाला आहे. असे झाल्याकारणाने 'तत्त्वप्रणालीत्मक' शिस्त या समीक्षकाला लावणे आवश्यक असते. त्याकाठी हा 'समीक्षक' एक उमेदवार आहे. यासाठीच त्याने कम्युनिस्ट पक्षात सामील झाले पाहिजे. असे आवाहन या युक्तिवादात अनुस्यूत आहे. गंमत अशी आहे की सार्त्र आणि सिमाँ द बोव्हार या दोघांनीही फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाची शिस्त पाळण्याचे टाळले होते. तसे होते तरी एक गोष्ट निश्चित, समीक्षा करण्याबावत त्यांची जी ताकद होती. तिला त्यांनी मोकळीक दिली होती असे म्हणता येणार नाही. सार्त्र आणि श्रीमती बोव्हार यांच्या जमेची एक बाजू आहे. ती म्हणजे फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाचे जे प्रचारक होते, त्यांना ते दोघे पेटी-बुर्झ्वा (कनिष्ठ मध्यमवर्गीय) बुद्धिजीवी विचारवंत आहेत असे नेहमीच वाटत असे! फ्रेंच-अल्जेरिया युद्ध चालू झाल्यानंतर सार्त्रनी एक कार्यक्रम जाहीर करून, आणखी एक जहाल पाऊल उचलले. अपराधी भावनेने, त्यांनी आपणा दोघांना (सार्त्र आणि श्रीमती बोव्हार) आम फ्रेंच जनतेपासून अलग करून घेतले आणि अल्जेरियन स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या एफ. एल. एन. संघटनेस आपला पाठिंबा जाहीर केला. **पण हे करताना त्या संघटनेची कार्यपद्धती व कार्यक्रम याबाबत टीका– समीक्षा करणारा एक शब्दही उच्चारला नाही हेही तितकेच खरे आहे.**

अर्थात हे दोघे अल्जेरियाला कधीही गेले नाहीत. त्या ठिकाणच्या कॅफे आणि नृत्य– गृहातून त्यांनी बॉम्ब ठेवले नाहीत. परंतु ही अशी जी कृत्ये अल्जेरियात केली जात होती त्यांना पॅरिस येथील आपल्या सुरक्षित आरामशीर घरात बसून ते दोघे पाठिंबा देत होते. फ्रान्सवरोबरचे संबंध त्यांनी तोडून टाकले होते हे खरे आहे. परंतु तसे होते तरी ते फ्रान्स मध्येच राहिले होते. अर्थात तेथे राहून आपल्या स्वत:च्या (?) सरकारी धोरणाविरुद्ध ते मोठ्या निग्रहाने आणि काही वेळा मोठ्या हिमतीने टीका करीत. समाज– समीक्षकाच्या आदर्श प्रतिमेचे सार्त्रनी जे वर्णन केले होते. त्यात त्यांचे वागणे अगदी चपखलपणे बसत होते. काही चुकीच्या गोष्टी करणारे जे कोणी होते, त्यांच्यापासून या दोघांनी स्वत:स अलग करून घेतले होते आणि अल्जेरियात जे कोणी स्थानिक गौरवर्णीय रानटी वा बारबेरीयन्स होते, त्यांचा या दोघांनी निषेध केला होता. ते दोघे त्याकाळी जे काही सांगत होते. त्यात सत्याचा भाग बराच होता. यावद्दल वाद नाही पण त्यांनी त्या जे बरेचसे काही सांगितले नाही, तो भागही चांगलाच,– सार्त्र ज्या भागाचा निषेध करीत होते– त्या भागाइतकाच किमानपक्षी मोठा होता. त्यांना यावाबत ते मुखर होण्यात जे अपयश आले, त्याचा अत्यंत घनिष्ट संबंध त्यांची जी 'आत्मटिका' होती, तिच्या जहाल प्रकृतीशी होती. या दोघांनीही

स्वत:स फ्रेंच जनतेपासून अलग करून जे नवे (?) संबंध प्रस्थापित केले होते त्याची किंमत त्याना मोजावी लागली होती. एक पेटी-बुर्झ्वा बुद्धिजीवी विचारवंत अधिक अधिक गोष्टी साध्य करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारा लेखकही आपण स्वत: समाज-सनीक्षक आहोत असा शोध लावतो. ही झाली अस्तित्ववादी परिभाषा. याच परिभाषेत सार्त्र व श्रीमती बोव्हार यांचा विचार केला, तर मग एक गोष्ट मान्य करावी लागेल. या अस्तित्ववादी परि-भाषेत मानवी आयुष्याचा विचार करता, या दोघांना मोजावी लागणारी किंमत तशी अल्पच होती. हा सर्वच प्रकल्प 'हिरो' निर्माण करील असा आहे. त्यातून 'हिरोच' निर्माण होऊन बाहेर येतो. हा हिरो आपल्या समकालीन बांधवापासून अलग होऊन बाहेर अगदी दूर गेलेला आहे आपल्या नैतिक तत्त्वांशी ज्याने आपल्याला बांधून घेतले आहे, असा हा हिरो. परंतु यानंतर मात्र ईश्वराप्रमाणे या हिरोला अमूर्त, अवकृष्ट (Abstract) असा दृष्टिकोन स्वीकारावा लागतो. सार्त्रनी फ्रान्स-अल्जेरिया युद्धाच्या काळात जी भूमिका घेतली होती ती समाज-समीक्षकाची कशी नव्हती, ते याबाबतीत हिरो नसून कामूच कसे हिरो होतो याची चर्चा कामूचे टीकाकार : सार्त्र या विभागात करण्यात आलेली आहे. पुनरुक्ती होईल म्हणून ती उद्धृत करण्यात आलेली नाही. एरवी येथे चर्चेत जो मुद्दा आहे त्याला ती प्रस्तत आहे.

बुर्झ्वा फ्रान्सपासून सार्त्र व श्रीमती बोव्हार यांनी फारकत करून घेतली होती. त्यांना अल्जेरियन होणे शक्य नव्हते. अशा या हिरोला आपल्या तत्त्वप्रणालीच्या दृष्टिकोनातून हे जग अगदी सपाट आहे असे दिसते. एफ. एल. एन. ही संघटना म्हणजे स्वातंत्र्याचे प्रतीक. फ्रान्समधील आणि इतरत्र असलेले फ्रेंच नागरीक हे फॅसिस्ट आहेत. (भाई डांग्यानी जय-प्रकाशाना फॅसिस्ट म्हटले होते. अजूनही काही लाल निशाणी लोक म्हणतात. त्याची आठवण भारतीयांना या ठिकाणी व्हावी !) एखाद्या चळवळीत वा संघर्षात जो कोणी त्या संघर्षाचा ठिकाणी प्रत्यक्ष हजर राहून सामील झालेला नसतो, त्याला दूर अंतरावर राहून राजकीय निर्णय घेणे हे कमालीचे सोपे असते. हे निर्णय घेणाऱ्या व्यक्तीच्या केसालाही धक्का लागणार नसतो. समाज-समिक्षकाने एक विविक्षित कळीचे (Critical) अंतर ठेवावयाचे असते, त्याचा हा परिणाम समजावयाचा का? श्रीमती बोव्हार यांनी लिहिले होते. "माझ्या दृष्टीने मुसलमानांचे (अल्जेरियातील) जीव हे माझ्या देशबांधवापेक्षा कमी महत्त्वाचे नाहीत." गंमत कशी आहे ते पहा. श्रीमती बोव्हार फ्रान्स हा आपला देश समजत नव्हत्या. मग त्यांचा देश कोणता अल्जेरिया – तसे असले तर अल्जेरियतील 'चिखलाचे पाय' असलेल्या तळा-गाळातील फ्रेंच माणसाबद्दल त्याना कर्तव्य नव्हते. थोडक्यात आपल्या बाजूचे जे कोणी तळागाळातील लोक असतील ते संत वा विरुद्ध बाजूच्या तळागाळातील लोक हे गुंड. खरे म्हणजे श्रीमती बोव्हार कोणत्याही – वंश, धर्म वा जात – यांच्या जीवाला फारसे महत्त्व देत होत्या याबद्दल फारच थोडा पुरावा उपलब्ध आहे. अल्जेरियातील फ्रेंच नागरिकांवर, अल्जेरियातील मुसलमान जे दहशतवादी हल्ले करीत होते त्याबद्दल श्रीमती बोव्हार यांना

काहीही कर्तव्य नव्हते. परंतु फ्रेंच नागरिकाकडून कोणा अल्जेरियन मुसलमानाला मृत्यू आला तर श्रीमती बोव्हारबाईंचा राग अनावर होत असे. अर्थात फ्रेंच माणसाकडून फार मोठ्या संख्येने अल्जेरियन मुसलमान मारले जात होते; आणि त्यातल्या अनेकांना कोणालाही राग येईल अशा प्रकारे ठार करण्यात येत होते या गोष्टीबद्दल कधीही वाद होणार नाही. एफ. एल. एन. संघटनेत जी अंतर्गत यादवी युद्धे होती, त्यातली निष्ठुरता, जुलूम जबरदस्ती, अमानुषता श्रीमती बोव्हार बाईना चांगल्या प्रकारे ज्ञात होती. परंतु त्याविषयी मौन धारण करणे त्यांनी पसंत केले होते. या ठिकाणी जॉर्ज ऑरवेल यांच्या Homaqe to catolina या पुस्तकात फ्रँको विरुद्ध जे डावे लढत होते त्यांचा काटा कसा काढता येईल याबद्दल लाल निशाणी कम्युनिस्ट कसे प्रयत्नशील होते व त्याबद्दल तत्कालीन लाल निशाणी कसे मूग गिळून बसले होते याची आठवण जो वाचक लाल निशाणी नाही त्याला होईल. एफ. एल. एन. विजयी झाल्यानंतर अल्जेरियातील तळागाळातील 'चिखलाचे पाय' असेलल्या फ्रेंच नागरिकांच्या नशिबी जी संभाव्य कत्तल होती, थोडक्यात त्या तळागाळातील लोकांच्या भविष्यात काय वाढून ठेवलेले होते त्याबद्दल तळागाळातील लोकांबद्दल प्रेम व कणव असलेल्या श्रीमती बोव्हारबाईंच्या मनात निसटताही विचार आला होता असे दिसत नाही. म्हणजेच त्यांचा तथाकथित करोल. नि:पक्षापातीपणा घसरत घसरत त्याची परिणती विचाराधीन असलेल्या घटनेबद्दल 'मला त्याच्याशी काहीही कर्तव्य नाही' अशा निर्दयतेत झाली होती. श्रीमती बोव्हारबाई या फ्रान्स-अल्जेरियन युद्धाबद्दल कमालीच्या भावविवेशतेने लिहितात. पण या भावना लक्षात घेऊनही जी गुंतागुंत 'प्रेमात' असते तिचा स्पर्शही त्यांना झालेला नाही, अशा प्रकारे त्या लिहीत होत्या, हे अगदी उघड आहे. ई. एम. फॉरेस्टर या प्रख्यात इंग्लिश कादंबरीकाराने संदेश दिला होता. "फक्त संबंध वा दुवे दाखवून द्या" (Only connect) श्रीमती बोव्हार बाईंचा फ्रान्स-अल्जेरिया युद्धाचा वृत्तांत वाचीत असताना, फॉस्टर यांच्या आदेशातील ताकद कोणासही अनुभवता येते.

क्रमशः

---

कोणाबद्दलही व कसल्याही गोष्टीविषयी असलेल्या आदराचा त्याग करणे हे इतिहासकाराचे पहिले कर्तव्य आहे.

**–ज्यूलस मिगलेट (प्रख्यात फ्रेंच इतिहासकार)**

---

सत्य आपल्या बुटाचे बंद बांधते आहे, तोवर असत्य गोष्ट वा बोलणे जगाची प्रदक्षिणा करून परत मुळ जागेवर येते.

**–मार्क ट्वेन (प्रख्यात अमेरिकन लेखक)**



अनुक्रमणिका

# क्लिओपात्रा

## प्रकरण ५वे

-डॉ. मीना वैशंपायन

क्लिओपात्राने आपले आत्मचरित्र पुनः पुनः लिहिले. ज्यावेळी मृत्यू दाराशी होता, तेव्हा सुद्धा तिचा शांतपणा आणि तिचे चातुर्य, प्रदर्शनाची हौस तशीच कायम होती. आपल्या मृत्यूचेदेखील तिने असेच स्मरणीय प्रदर्शन केले.

क्लिओपात्राचा खाजगी डॉक्टर म्हणून काम करणाऱ्या ऑलिम्पसने काही आठवणी लिहिल्या आहेत. त्या आठवणींचा आता जरी काहीच भाग शिल्लक नसला आणि कोणताच मागमूस लागत नसला तरी अशा आठवणी आपण वाचल्या आहेत असे प्लुटार्क सांगतो. ऑलिम्पस क्लिओपात्राच्या अगदी निकटच्या वर्तुळात वावरत असल्याने, त्याच्या आठवणी अधिक तपशीलवार आणि सत्याच्या अधिक जवळ जाणाऱ्या असाव्यात असे गृहीत धरता येईल. तिच्या शेवटच्या दिवसांचे त्याने रंगवलेले चित्र अधिक स्पष्ट असावे, पण ते फारसे आनंददायी नसावे असे दिसते. पण क्लिओपात्रा ही शेवटपर्यंत एक तत्त्वशून्य, निष्ठाहीन आणि विलासी, ऐषारामी स्त्री होती असे चित्रण करणाऱ्या निष्ठुर लेखकांपेक्षा ऑलिम्पसचे वर्णन वेगळे, अधिक विश्वासार्ह असणार. त्याने अँन्थनीचं वर्णन केलं आहे ते त्याचा आत्महत्येचा प्रयत्न अयशस्वी झाल्यानंतरचं ! आपला आत्महत्येचा प्रयत्न असफल झाल्यावर अँन्थनीला शारीरिक दुःख असह्य झाले, आणि तो गडाबडा लोळू लागला, मदतीसाठी हाका मारू लागला पण त्यावेळी घाबरलेले सारे नोकर घराबाहेर पळून गेले असं तो म्हणतो. योगायोगाने ज्या स्मारकाच्या वास्तूत क्लिओपात्राने आश्रय घेतला होता, त्याच वास्तूत त्याला आणले गेले.

"त्यावेळी तिथे जे हजर होते, त्यांच्या म्हणण्यानुसार, तेथील दृश्य अतिशय करुण होतं. अँन्थनी इतका केविलवाणा दिसत होता की पूर्वी कधी त्याला तसे पाहिल्याचे स्मरत नाही. रक्ताने तो पूर्णपणे माखलेला होता, मृत्युयातनांशी झुंज देत होता आणि राहून राहून क्लिआपोत्राकडे पाहून आपले बाहू पसरण्याचा प्रत्न करत होता; पण त्याचे ते बाहू हवेतच अधांतरी राहात होते. एका स्त्रीच्या शक्तीपलिकडचेच ते काम होते. पण क्लिओपात्राने महत्प्रयासाने दोन्ही हातांनी तो दोर पकडला, हातांच्या जोडीला तिने आपल्या चेहऱ्यावरील स्नायूंचा वापर केला. ते स्नायू आधीच अतिताणाने वेडेवाकडे झाले होते. कसेबसे तिने त्याला वर खेचले. खाली जमिनीवर उभी असणारी माणसे आरडाओरड करून तिला पाठिंबा दर्शवीत होती, जणू तिचे दुःख, तिच्या यातना आपल्या आवाजांमध्ये वाटून विभागून घेत

होती.''

एकदा त्याला वर खेचून घेतल्यावर तिने अंगावरचे कपडे फाडून त्यांच्या अंगावर आच्छादन घालण्याचा प्रयत्न केला. अतीव दु:खाने तिने उर बडवून घ्यायला सुरुवात केली आणि त्याच्या रक्तात हात बुडवून आपल्या चेहऱ्यावर फासून घ्यायला सुरुवात केली अ‍ॅन्थनीने 'वाईन'ची मागणी केली. एकतर त्याला तहान लागली असावी किंवा वाईन प्यायल्यामुळे आपल्याला मृत्यू चटकन येईल असे त्याला वाटले असावे. यानंतर लगेचच त्याचा मृत्यू ओढवला.

क्लिओपात्राने दरवाज्यातूनच ऑक्टेव्हियसच्या माणसांना बोलावले. दुसऱ्या वेळी जेव्हा ती त्यांना हाका मारू लागली, तेव्हा त्यांच्यातील एकाने त्या इमारतीला चिकटून एक शिडी उभी केली, तो वर चढून आला आणि तिला आश्चर्य वाटावं अशा पद्धतीने दारातच बोलत उभा राहिला. तिने स्वत:ला भोसकून घेण्याचा प्रयत्न केला पण त्या माणसाने दोन्ही हातांनी तिला धरली, तिची तलवार काढून घेतली आणि तिने आपल्या कपड्यात आणखी एखादे शस्त्र लपवलेले नाही ना हे पाहण्यासाठी तिच्या वस्त्रांना चाचपून पाहिले.

ती आता पकडली गेली, एकदम आजारी पडली. आधी अ‍ॅन्थनीसाठी ऊर बडवताना, छाती फाडून घेताना तिला संसर्ग झालाच होता. त्यानंतर तो जंतुसंसर्ग वाढत गेला. तिने अन्नत्याग केला. पण ऑक्टेव्हियसने तिच्या मुलांना धमकावून तिच्यासमोर आणले आणि तिचे उपोषण संपवण्याची तिच्यावर जबरदस्ती केली. जेव्हा जेव्हा ऑक्टेव्हियस तिला भेटायला येई तेव्हा ती अगदी सैलसर अशा घरगुती पोषाखात असे, तिचे केस अस्ताव्यस्त असत. ती स्वत:ला त्याच्या पायांवर घालून घेई. (दिओ कॅशिओने तिचे धूर्त चित्र रंगवले आहे आणि ती आपल्या या जेत्याला आपल्या जाळ्यात ओढण्यासाठी अलंकारादींचा वापर करीत असे म्हटले आहे, त्याच्याशी हे चित्रण फार विसंगत आहे) अ‍ॅन्थनीच्या थडग्यापुढे दारूचा नैवेद्य दाखवावा व ती ओतावी यासाठी ती ऑक्टेव्हियसजवळ परवानगी मागे. तिथे तिने एकदा एक दु:खभरे पण उच्च दर्जाचे भाषण केले. त्या भाषणाचा शेवट तिने ''अ‍ॅन्थनीला उद्देशून असा भावपूर्ण केला''– मला कुठेतरी लपव आणि मला इथे तुझ्याजवळच चिरनिद्रा घेऊ दे. कारण मला आता जाणीव झाली आहे की, मी आजवर सोसलेली हजारो दु:खे ही तुझ्या विरहाच्या या थोड्याच दिवसांच्या दु:खांच्या तुलनेत फारच फिकी आहेत. तुझ्याशिवाय जगणे खरंच फार अवघड आहे.'' त्यानंतर परत आपल्या कैदखान्यात येऊन तिने मृत्यूची तयारी केली आणि अतिशय धैर्याने मृत्यूचा स्वीकार केला.

या मृत्यूच्या निश्चित क्रमाबद्दल मात्र शंका आहे. अंजिरांच्या टोपलीतून आणल्या गेलेल्या विषारी सापाची शक्यता, प्लुटार्क मान्य करतो, पण त्याचवेळी त्या गोष्टीत इतर शक्यतांनाही जागा ठेवतो. खरी गोष्ट कुणीच सांगू शकत नाही. आणखीही एक शक्यता सांगितली जाते की, क्लिओपात्राने एका पोकळ, कंगव्यात विष लपवून, तो कंगावा



अनुक्रमणिका

आपल्या केसांमध्ये अडकवून ठेवला. खरी गोष्ट कोणती हे निश्चितपणे सांगणं कठीणच आहे. कारण प्रतयक्ष तिच्या मृत्यूच्या क्षणी हजर असणाऱ्या दोन साक्षीदारांपैकी कुणीच नंतर खरं सांगण्यासाठी, फार काळ जगलं नाही. प्लुटार्क म्हणतो – "तिने (क्लिओपात्राने) स्नान केले, जेवण केले. आपल्या सर्व नोकरांना जायला सांगितले. तिच्या विश्वासातल्या, निष्ठावान दोघी दासी फक्त तिच्याजवळ होत्या. मग तिने दरवाजे बंद केले." ऑक्टेव्हियसचे संदेशवाहक दूत तिथे येऊन पोहोचेपर्यंत ती मृत्यू पावलीच होती आणि इरास आणि चार्मियन या तिच्या दासी मृत्यूपंथाला लागलेल्या होत्या.

या दूतांच्या दृष्टीला कोणतं दृश्य पडलं असेल? क्लिओपात्राच्या सर्व प्रदर्शनीय दृश्यांपैकी सर्वात शेवटचं आणि कदाचित सर्वात सुंदर असं दृश्य या दूतांच्या स्वागतासाठी सज्ज होतं. इजिप्तची ती राणी मृतावस्थेत एका सुवर्णासनावर पहुडल्यासारखी झोपली होती. आत्यंतिक थकलेली, उपाशी राहिलेली, स्वत:चा विच्छेद करून घेतलेली अशी ती क्लिओपात्रा ! पण मृत्यूसाठीसुद्धा तिने आपला सारा साजशृंगार केला होता. आपला राजेशाही वेष तिने परिधान केला होता आणि ते दूत जेव्हा आत आले तेव्हा चार्मियन आपल्या स्वामिनीचा मुकूट थरथरत्या हातानं नीट बसवत होती. कोणत्याही खास, विशेष समारंभप्रसंगी क्लिओपात्रा कोणता वेष करीत असे हे आपण पूर्वी बघितले आहेच. तो पेहराव इसीस देवतेचा होता. त्या देवतेच्या पेहरावात, मुकूटधारी, विशेष साजशृंगारल्यालेली ती राणी क्लिओपात्रा आपल्या संपूर्ण वैभवानिशी, दैवी स्वरूपात दैवी सम्राज्ञीपदाच्या ऐटीत मृत्यूला सामोरी गेली.

आपल्या मृत्यूसाठी तिने जे साधन निवडले होते, त्याने तिच्या मृत्यूतली प्रतीकात्मता पूर्ण झाली आणि तिने घेतलेली भूमिका पूर्णत्वास पोहोचली. प्लुटार्कच्या म्हणण्याप्रमाणे तिच्या दरवाजावरील रक्षकांनी, करंडी घेऊन आलेल्या एका इजिप्शियन शेतकऱ्याला दाराशीच अडवले होते. ज्यावेळी त्या रक्षकांनी त्याला अडवून प्रश्न विचारले तेव्हा त्या करंडीतली वरची पानं बाजूला करून त्याने त्यांना करंडीतले अंजीर दाखवले. ते पाहिल्यावर त्या अंजिरांच्या मोठ्या आकाराबद्दल त्या रक्षकांनी आश्चर्य दाखवले. त्यावर त्या शेतकऱ्याने त्यांना अंजीर चाखून पाहण्याचीदेखील परवानगी दिली. प्लुटार्क सावधातेने म्हणतो, "एका निवेदनानुसार तो विषारी साप त्या करंडीतल्या पानांखालीच दडलेला होता." त्यानंतर न्याय–वैद्यकशास्त्राचा जो पुरावा दाखवला गेला तो अत्यंत अपुरा होता.

"त्या स्मारकाच्या संपूर्ण वास्तूत नंतर तो साप कुठेही सापडल नाही. पण त्याच्या काही खुणा सापडल्या असाव्यात. ज्या खोलीत क्लिओपात्रा होती त्या खोलीच्या खिडक्या समुद्राकडे तोंड करून उघडणाऱ्या होत्या. त्या बाजूच्या समुद्रकाठावर या खुणा सापडल्या त्यावरून तो साप तिथून गेला असावा. काही लोक म्हणतात की, क्लिओपात्राच्या दंडावर दोन अस्पष्ट, फिकट असे व्रण आढळून आले. ते सर्पदंशानं झालेले असावेत. ऑक्टेव्हियस सीझरनेदेखील यावरच विश्वास ठेवला होता. ज्यावेळी त्याने विजयोत्सव साजरा करण्यासाठी

मिरवणूक काढली त्यावेळी त्याने सापाचा विळखा अंगाभोवती असणारी क्लिओपात्राची प्रतिमा मिरवुणकीत उभी केली होती.''

क्लिओपात्राच्या बाबतीत हा जो 'ॲस्प' म्हणजे विषारी साप – शब्द वापरला जातो. तो प्राणिशास्त्रदृष्ट्या संदिग्ध, मोघम शब्द आहे, कारण उत्तर आफ्रिकेतील सर्पांच्या अनेक उपजातींसाठी तो वापरला जातो. 'Cerastes Vipera' हे प्राणिशास्त्रातलं नाव ज्या सर्पाला दिलं जातं तो सर्प 'क्लिओपात्राचा सर्प' म्हणून ओळखला जातो. खरं म्हणजे त्याच्या ज्या अनेक जाती आहेत त्यापैकी कोणत्याच जातीच्या सर्पाने क्लिओपात्राला मारले असणे शक्य नाही. या सर्पाचं गरळ म्हणजे रक्तातलं विष ! त्यामुळे आत्यंतिक वेदना होतात आणि त्या जळल्यासारख्या, आग पडल्यासारख्या होतात. जिथे दंश झाला असेल तिथून त्या झपाट्याने पसरत जातात. ज्या माणसाला हा दंश झाला असेल त्याला ग्लानी येते, मळमळतं आणि अतिशय तहान लागते. रक्तात लगेच गुठळ्या होतात. जिथे दंश झाला असेल तो अवयव निळाजांभळा होतो आणि सुजतो, विद्रूप दिसू लागतो. त्या माणसाला सारख्या उलट्या होतात. सारखी लघवीला लागते, आणि शुद्ध हरपण्यापूर्वी पोटातील सारी घाण बाहेर पडते. अशा प्रकारचा मृत्यू हा फार भयानक असतो. क्लिओपात्राला जे मरण हवं होतं ते तिच्या आधीच्या थाटाला, प्रतिष्ठेला शोभेसं, तिच्या दिमाखाला साजेसं ! ती मृत्यूनंतर जशा अवस्थेत दिसली असं सांगितलं जातं, ती अवस्था तिच्या इच्छेतली, स्वप्नातली, रेखीव अशीच होती.

याउलट नागांचं जहर हे मात्र (रक्तवाहिन्यांमध्ये जाणारं नसून), मज्जातंतूमध्ये शिरणारं असतं. त्यामुळे दंश झालेल्या भागातील पेशींना कोणतंही नुकसान होत नाही. दंश झालेल्या ठिकाणी थोडीशी वेदना होते. पण त्या माणसाच्या अंगावर फक्त दोन व्रण दिसतात ते नागाच्या दातांचे असतात. त्या विषामुळे गुंगी येते तशीच ग्लानी येते. त्या माणसाच्या पापण्या जडावतात, झोपेत असावं तशी ती व्यक्ती दिसते. खरं म्हणजे त्याचं शरीर लुळं पडलेलं असतं. तो हळूहळू 'कोमा'मध्ये जातो आणि मृत्यू पावतो. क्लिओपात्राला असं मरण हवं असणं हेच स्वाभाविक आहे. ज्या सर्पानं तिचा जीव घेतला तो नाजाहाजा (Najahaja) नावाचा इजिप्शियन नाग असावा. सर थॉमस ब्राऊने यांनी अनेक चित्रांमधल्या, पेंटिंग्जमधल्या विसंगती आपल्या एका निबंधात दाखवून दिल्या आहेत. त्या निबंधाचं नाव आहे– 'Of many things questionable which are found in pictures.' यात त्यांनी म्हटलं आहे की, क्लिओपात्राच्या चित्रांमध्ये नेहमी तिच्या वक्ष:स्थळावर, किंवा हातावर केवळ काही इंच लांबीचा, ठिपके अंगावर असणारा जो साप दाखवतात तो चुकीचा असतो. तिचा आणि तिच्या दोन दासींचा जीव घेण्याइतकं गरळ ओकणारा नाग हा कमीतकमी सहा फूट लांब असला पाहिजे. दुसऱ्या बाजूला प्रॉपेर्शियस, होरेस आणि व्हर्जिल यांच्या मते तिला कमीतकमी दोन सर्पांनी दंश केला असावा. सर्वात लहान, माणसाला मारू शकणारा नाजाहाजादेखील चार फूट लांब असतो. सुरक्षारक्षकांनी ज्या शेतकऱ्याला पाहिले व अडवले

असे सांगितले जाते, त्याच्या हातात असणाऱ्या करंडीत केवळ भल्यामोठ्या आकाराचे अंजीरच होते असे नव्हे तर त्याच्या हातातील करंडीदेखील असाधारण आकाराची असावी.

इजिप्शियन नाग हे इजिप्तच्या राजघराण्याचं आगळंवेगळं चिन्ह होतं. वॅडजेतदेवीचं ते पवित्र जनावर होतं आणि सम्राटाच्या भुवईवर ते असे, फणा उभारून; सम्राटाच्या / सम्राज्ञीच्या शत्रूंवर गरळ ओकण्याच्या तयारीत असे. वॅडजेन ही नाईल नदीच्या खालच्या बाजूस राहणाऱ्या लोकांची देवी होती. तिच्या भक्तगणाची परंपरा प्रागैतिहासिक काळापासून चालत आली होती. तिची परंपरा पुढे इसीसच्या संप्रदायात विलीन झाली. या इजिप्शियन नागाच्या, इसीस देवतेच्या नावासकट कोरलेल्या प्रतिमा व्हॅली ऑफ द किंग्जमध्ये सापडतात. क्लिओपात्रामुळे हा विशिष्ट जातीचा नाग प्रसिद्ध पावला आणि इसीसचं लाडकं, पवित्र जनावर म्हणून तो सर्वत्र ओळखला जाऊ लागला. पॉम्पे या चित्रकाराने काढलेल्या भित्तीचित्रात ह्या देवतेने त्या नागाला हातात धरलेलं आहे आणि त्याची शेपटी तिच्या मनगटाभोवती गुंडाळलेली आहे. त्या देवतेची प्रेषिता- (म्हणजे क्लिओपात्रा) हिने बरोबर तशीच नक्कल केली. इ. स. च्या दुसऱ्या शतकातील एका दगडी शवपेटीवर अशीच एक प्रेषिता- धर्मगुरू दाखवली आहे आणि तिने हात पुढे केलेला आहे. त्यापुढे केलेल्या हातावर एक सर्प वेटोळं घालून बसला आहे असे चित्र त्या शवपेटीवर आहे.

ज्यावेळी रोमन दूत, सैनिक त्यादिवशी क्लिओपात्राच्या खोलीजवळ- महालाजवळ पोहोचले तेव्हा तिने इसीस देवतेसारखा पोषाख केला होतो आणि तसाच मुकूटही घातलेली होता. तिने आपल्या हातात कडं, (बांगडीसारखं) कंकण घातलं असण्याची दाट शक्यता आहे. पण ते कंकण, सर्पाच्या वेटोळ्याचा रूपात असावं. इसीसशी परिचित, तिचं चिन्ह असणाऱ्या जनावराशी साम्य दाखवणारं ! दिओ कॅशियस वर्णन करतो त्यानुसार, ऑक्टेव्हियस इजिप्तविजयाची जेव्हा मिरवणूक निघाली तेव्हा कोचावर - आसनावर मृतावस्थेत असणाऱ्या क्लिओपात्राची प्रतिमा कारागिरांमार्फत तयार केली गेली. या कारागिरांनी जी प्रतिमा तयार केली ती त्या रोमन दूतांच्या वर्णनावर हुकूम असणार. इसीसच्या रूपातली- इसीसचा अवतारच अशी क्लिओपात्रा ! मायकेल ग्रँटने सूचकपणे म्हटले आहे की, "त्या प्रतिमेने पुढच्या व मागच्या सर्वच प्रेक्षकांनी फसवले आहे, त्यांचा गैरसमज करून दिलाय." प्रॉपेर्शियसच्या सिंथिया या नायिकेसारख्या ज्या इतर रोमन स्त्रिया होत्या त्यांना, इसीसच्या भक्तांना, क्लिओपात्राच्या हातावरील त्या सर्पाचा अर्थ व महत्त्व बरोबर कळलं असतं. पण इतिहासाची साधनं गोळा करणं, ऐतिहासिक नोंदी करणं, ही कामं आजवर पुरुषच करीत आले, त्यामुळे प्रॉपर्शियससारख्यांच्या नजरेतून ती गोष्ट निसटली असावी. आपल्या प्रेमिकेच्या समर्पणाबाबत अत्यंत आतुर झालेल्या प्रॉपर्शियस यावेळी बहुधा आपली विवेचकबुद्धी गुंडाळून बसला असावा.

तो म्हणतो -

"त्या पवित्र विषारी सर्पांनी केलेले



अनुक्रमणिका

तुझ्या बाहूंवरील दंशव्रण मी पाहिले.
त्या गुप्त वाटेवरून चालताना तुझे
पाय गळूनच गेले असावेत.''

होरेसच्या सदतिसाव्या 'ओड'मध्ये (व्यक्तिपर कवितेत) काहीशा अशाच ओळी आहेत.

''तिचा सारा देह त्याजहराने
गिळकृंत केला होता तरीही
अविचल धैर्याने तिने
ते भयंकर सर्प हाताळले.''

'एनीड' या काव्यातील व्हर्जिलने केलेला एक उल्लेख असा आहे - 'मृत्यू होऊन आलेले ते जुळे सर्प' - (यात क्लिओपात्राला ऑक्टियमपर्यंत नेली आहे). क्लिओपात्राच्या मृत्यूचा तत्कालीन कवींनी केलेला, समकालीन दृष्टिकोन दाखवणारे उल्लेख हे असे, एवढेच आहेत. ते कदाचित गैरसमजावरदेखील आधारलेले असतील. जेव्हा प्रॉपर्शियस 'मी पाहिलं' असं म्हणतो, तेव्हा त्याचा अर्थ त्याने त्या विजयोत्सवी मिरवणुकीतील प्रतिमा पाहिली असा ही होऊ शकतो. त्यानं पाहिलं हे जरी खरं मानलं तरी इजिप्शियन धर्मातील संदर्भांशी प्रतिमांशी त्याचा फारसा परिचय नव्हता, त्यामुळे त्यानं जे पाहिलं त्याचा अर्थ त्याला समजला नाही. मादाम तुसांच्या मेणाच्या प्रतिमांसारखंच, त्या मृत्यूदृश्याला त्यानं मूळ मृत्यू- दृश्याचं प्रतिनिधित्व दिलं. देवतेची प्रतिमा एवढंच त्याला कळलं. ग्रँटचं म्हणणं जर बरोबर असेल तर प्रॉपर्शियसच्या अज्ञानाने एका चुकीच्या समजाला जागा करून दिली आणि तेव्हा पासून आजपर्यंत तो (गैर) समज तसाच टिकून आहे.

हे जरी सारं खरं असलं तरी क्लिओपात्राच्या मृत्यूचा जो पारंपरिक समज आहे त्याला देखील चांगला, पक्का आधार आहे. मृत्यूचा तो काही असामान्य प्रकार वा असाधारण मार्ग नव्हता. ग्रीक वैद्यकाबद्दल लिहिणारा गॅलेन हा लेखक म्हणतो. त्याप्रमाणे सर्पदंशाने मृत्यू ही गोष्ट त्याकाळी सामान्य होती. प्राचीन अलेक्झांड्रियामध्ये ही मुख्य शिक्षा मानली जाई. शिवाय ती अमानुष नव्हती. शिवाय अशा प्रकारचा मृत्यू क्लिओपात्राने हेतुतः स्वीकारला नाही असे जरी गृहीत धरले तरी हे तर खरंच होतं की, तिने तिच्या नेहमीच्या आवडीप्रमाणे सारा काही भव्यदिव्य थाटमाट केलाच होता. ज्या देवतेचा मानवी अवतार असे ती स्वतःला मानीत असे, त्या देवतेच्याच प्रिय जनावराने केलेल्या दंशाने आलेला मृत्यू ! या मृत्यूलाही मग प्रतिकात्म अर्थ आला. एवीतेवी तिची मृत्यूपासून सुटका नव्हतीच. पण या सर्पदंशाच्या घटनेमुळे तो अटळ मृत्यू आशादायी पण बेपर्वा घोषणेसारखा सामोरा आला.

१९२० साली ए. जे. बेथेल या नावाच्या अभ्यासकाने एक दुसऱ्याच टोकाचा विचित्र 'शोध' लावला. त्याचं संशोधन अजून प्रकाशित झालं नसलं तरी ब्रिटिश ग्रंथालयात ते सुरक्षित आहे. या बेथेलच्या विद्वत्तेबद्दल दुमत होणार नाही, पण त्यांच्या सामान्य व्यवहारी

बुद्धबद्दल मात्र नक्कीच होईल. त्याने म्हटले आहे की, इ. स. पूर्व ३० मध्ये, अलेक्झांड्रिया-मध्ये क्लिओपात्रा मुळी मरण पावलीच नाही. त्यांचं म्हणणं की, तिचं थडगं कधी सापडलंच नाही. प्लुटार्क म्हणतो, त्याप्रमाणे समुद्रकाठावरील खुणा म्हणजे सर्पाचा माग, त्याच्या खुणा नसून क्लिओपात्रा त्या बाजूने सटकली असावी आणि तिच्या पाऊलखुणा त्या समुद्रकिनाऱ्या-वर असाव्यात. समुद्रमार्गे तिने पलायन केले असे बेथेल यांचे म्हणणे आहे. आकडे-शास्त्राचा थातुरमातुर आधार घेत, आणि आपली कल्पनाशक्ती मोकाट सोडीत बेथेल म्हणतात,– नव्हे सिद्ध करतात की,'क्लिओपात्राने पुढे दोन महत्त्वाच्या कारकीर्दी, राजवटी उपभोगल्या. थ्रिआ मौसा या नावाने तिने पर्थियाच्या 'फ्राटेस' या राजाशी लग्न केले; आणि पुढे त्याच्यापासून 'फ्राटासेस' नावाचा जो मुलगा झाला, त्याच्याशीही लग्न केले. त्याहून विचित्र असा शोध जावईशोधच म्हणा– बेथेलने मांडला. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे, तिने–क्लिओपात्राने आणखी एक व्यक्तित्व धारण केले– ते म्हणजे व्हर्जिन मेरीचं; आणि तिने येशू ख्रिस्ताला जन्म दिला.

येशू ख्रिस्त मुळामध्ये ज्यू नव्हता हे दाखवण्यासाठी बेथेलने हा आटापिटा केलाय, तेव्हा त्याचा फार गांभीर्याने विचार करायची गरज नाही. पण त्याने ज्या तपशिलांचा विचार करून आपली कल्पनाशक्ती लढवली आहे. त्यावरून क्लिओपात्राच्या मृत्यूमधली गूढता, रहस्य यांचं स्वरूप लक्षात येतं हे खरं ! ऐतिहासिक नोंदी, दस्तावेज यामध्ये जेव्हा काही रिकाम्या जागा राहतात, किंवा जिथे संदिग्धता असते, तिथेच कल्पनाशक्तीच्या स्वैर संचारास वाव मिळतो. काही असो, क्लिओपात्राला आपल्या मृत्यूबद्दल इतर लोकांच्या मनात ज्या कल्पना निर्माण व्हाव्यात असे वाटत होते, तशाच कल्पना बेथेलच्या मनात निर्माण झाल्या होत्या असे वरवर पाहता तरी वाटते. सर्पदंशाने तिचा मृत्यू झाला असे कळताच तिच्या इजिप्शियन रयतेच्या मात्र लगेच ध्यानात आलं असेल की, ती अशा प्रकारे मरणं शक्यच नाही. ती मेली नाहीच. तिला अमरत्व मिळालंय आणि ती पुन्हा आपल्या येणार आहेच.

युरेयस किंवा नाजाहाजा हा नाग राजघराण्याचं चिन्ह आणि इजिप्तच्या सम्राटांचा रक्षणकर्ता मानला जातो. हा नाग केवळ आपल्या दृष्टिक्षेपानेदखील एखाद्याला मारू शकतो अशी ग्रीकांची श्रद्धा होती. त्यामुळे ते त्याला 'बेसिलिस्क' म्हणजे 'छोटा राजा' असे म्हणत असत. एक प्रकारे त्याच्या राजप्रवृत्तीचं निदर्शक असे हे नाव होते. प्राचीन इजिप्शियन भित्तीचित्रांमध्ये हा नाग नंदनवनातील रायांचं रक्षण करताना दिसतो. अग्नीने लपेटलेल्या जिभा असणारे ड्रॅगन म्हणजे या नागाचेच वंशज असावेत. हे स्पेरिडसच्या बागांच्या दरवाजांसमोर हे ड्रॅगन रक्षण करण्यासाठी उभे असत. शिवाय इजिप्शियन मृताच्या पुस्तकात असं म्हटलंय की, नाग कात टाकतो आणि पुन्हा जोमाने आयुष्य जगायला लागतो, पुन्हा तरुण होतो, हे अमर आयुष्याचंच प्रतीक आहे. किमयाशास्त्रावरील क्रमिक पुस्तकांसारख्या एका प्रमाणग्रंथात एक छोटंसं पान क्लिओपात्राच्या नावे आहे. त्यात तिच्या इतर चिन्हांबरोबरच 'आरोबूरोज' (Orobouros) या सर्पाचा समावेश आहे. हा सर्प स्वत:ची

शेपटी गिळतो आणि आपलं वेटोळं पुरे करतो. या वर्तुळामुळे तो अमर, शाश्वत आयुष्याचं प्रतीक ठरतो. (क्लिओपात्राला या पुस्तकासंबंधी काही ममत्व असो, नसो, पण तिला त्यामागील प्रतीकात्म अर्थ नक्कीच समजला असेल.) एका खांबाभोवती गुंडाळलेला युरेयस इजिप्शियन मानदंड ठरला आहे. उत्साही, सळसळत्या, अविनाशी आयुष्याचं तो प्रतीक आहे. हाच युरेयस पुढच्या देवतांच्या हातात दिसणाऱ्या दंडाचं पूर्वचिन्ह होतं असं म्हणता येईल. ग्रीक देवतांच्या हातात जो दंड असे त्यावरची चिन्हे म्हणजे युरेयसची सुधारित आवृत्ती होय. हा दंड मर्क्युरी देवतेच्या हातात असे. जखमा भरून येण्यासाठी जी देवता मदत करी, त्या ॲस्कलेपायस या ग्रीक देवतेच्या हातात हा दंड असे. वैद्यकाचा शोध लावणाऱ्या 'हर्मिस ट्रिस्मेगिस्टस' याच्या हातात हा दंड असे. इस्त्रायलमधील बालकांच्या रक्षणासाठी मंतरलेल्या काठीसारखा रक्षक म्हणून या दंडाचा उपयोग मोझेस करीत असे. मोझेसने एक पितळी सर्पाकृती तयार करून त्या दंडावर बसवली होती. इसीसचं रूप असणारी क्लिओपात्रा एका अर्थानं अमरच होती. पण मृत्यूसाठी तिने युरेयसला निवडल्यानं, त्याला कवटाळल्यामुळे तिनं आपल्या मृत्यूनंतरच्या जीवनाची तरतूद करून ठेवली. प्लुटार्क म्हणतो, "क्लिओपात्राच्या सर्पाची तुलना इजिप्शियन लोक सूर्याशी करतात कारण तो कधी वृद्ध होत नाही, कलेकलेने कमी-जास्त होत नाही." क्लिओपात्राने ज्या सुवर्णयुगाचं स्वप्न पाहिलं होतं, त्या युगाचं चिन्ह असणारा तो युरेयस सूर्याप्रमाणेच अमर होता. त्याला मृत्यू आला तरी तो केवळ नव्यानं चिरंजीवित्व प्राप्त होण्यासाठीच ! त्या युरेयसकरवी स्वत:ला दंश करवून घेण्यात क्लिओपात्राने जणू काही जाहीररित्या असं सांगितलं की, 'ऑक्टेव्हियसच्या क्षुद्र, ऐहिक सत्तेपासून मी मुक्त आहे. माझ्यावर त्याच्या सत्तेचा परिणाम होणार नाही.' ती स्वत: आणि इजिप्त यांना कुणी धक्का लावू शकणार नाही, त्यांचा चुराडा करू शकणार नाही, त्यांचा पराभव करू शकणार नाही. हे सारं तिने तिच्या दृश्यभाषेत सांगितलं. या भाषेवर तिची किती हुकूमत होती हे आपण पाहिलंच.

क्लिओपात्राच्या या अविचल धैर्याचं रोमन कवींनी तोंड भरून कौतुक केलं. तिच्या धाडसाला त्यांनी दाद दिली. होरेस म्हणतो – "मरणासाठी कृतनिश्चयी अशी ती खरोखरीच शूर होती." परंपरेने सांगितलेली सर्पाची कथा जर खरीच असेल, तर तिच्या आत्महत्येमागे केवळ धैर्य नाही, इतरही काही आहे. आपल्या घरावरील कडक पहाऱ्याची पर्वा न करता, शारीरिकदृष्ट्या दुर्बळ असून, शत्रूच्याच विळख्यात असून, तिने स्वत: स्वत:च्या मृत्यूची तयारी अगदी निश्चयपूर्वक पण शांतपणे केली. पुन्हा ही सारी योजना तिने अतिशय नाट्यपूर्ण रीतीनं, स्वत:च्या नशिबाची घडण स्वत:च करतो आहोत अशा रास्त अभिमानाने, काहीशा अहंमन्यतेने ती पार पाडली. चित्रं, इतिहास यातून आपल्याला ओळखीची झालेली क्लिओपात्रा अतिमानवी वाटते, कृत्रिम निर्मितीसारखी वाटते. एखाद्या सर्वसामान्य मानवाच्या फारच पलीकडची वाटते. याचं श्रेय तिला, तिच्या व्यक्तित्वाला द्यायला हवं. ही प्रतिमा तिची तिनं तयार केलीय. तिने आपल्या आयुष्यात बुद्धीचा, सूक्ष्म विचाराचा उपयोग केला, तसेच

तिच्याजवळील कल्पक द्रष्टेपणाचाही केला. तिच्या या द्रष्टेपणाची मर्यादा युरोप आणि आशिया यांना व्यापून राहिली होती, स्वर्ग आणि पृथ्वी यांनाही तिनं आपल्या कवेत घेतलं होतं. तिनं स्वत:साठी एक भूमिका निवडली, उत्कृष्टरित्या ती भूमिका तिनं निभावली. वरवर पाहता ती भूमिका जशी आकर्षक होती तशीच तिच्या अंतरंगात ती अर्थपूर्ण होती. तो द्रष्टेपणा तिच्याजवळ कायमच राहिला. तिच्या एवढ्या ऐटदार मृत्यू सोहळ्यातदेखील स्वत:ची गोष्ट संपादित करायचं, ती सजवायचं काम ती विसरली नव्हती.

---

**रिचर्ड हेबेर** –Richard Heber (१७७३ ते १८३३) यांनी एकदा असे म्हटले होते की प्रत्येक सज्जन गृहस्थाकडे (Gentelman) पुस्तकाच्या तीन प्रती असावयास हव्यात. एक दाखवेगिरीसाठी एक ते पुस्तक आपणाकडून वाचावयास नेणाऱ्यासाठी आणि एक प्रत्यक्ष आपल्या स्वत:च्या उपयोगासाठी. हेबेर यांच्या या उद्गारावरून मला विसाव्या शतकाच्या आरंभीच्या काळातील हार्वर्ड विद्यापिठातील प्राध्यापकांची आठवण येते. त्या काळी हार्वर्ड विद्यापिठातील बरेचसे प्राध्यापक हे केवळ आपल्याला मिळणाऱ्या वेतनावर अवलंबून नव्हते. त्यातल्या बहुतेकांकडे उत्पन्नाची इतर साधने होती. **कालवर्ट बुशनेल हार्ट** हे त्या काळातील इतिहासाचे एक प्राध्यापक. ते देखील त्याना जे पुस्तक हवेहवेसे वाटे, त्याच्या तीन प्रती नेहमीच विकत घेत. याचे कारण देताना ते सांगत टिपणे काढणे हे मला फारच कंटाळवाणे वाटते. या तीन प्रतीतल्या दोन प्रती त्यातील पाने फाडण्यासाठी होत्या; आणि एक प्रत घरातील शेल्फवर ठेवण्यासाठी. त्यांच्या संशोधनाच्या कामात, त्याना जी सामुग्री हवी असे ती अनेकवेळा अर्थातच पाठपोट छापलेली असे. – म्हणून दोन प्रती फाडण्यासाठी. संशोधनासंबंधी एक जुनी *व्याख्या* आहे. प्रा. हार्ट यांनी ती जरा सुधारली होती एवढेच, माझ्या तरूणपणीदेखील ही जुनी व्याख्या प्रचलीत होती. "अन्य लेखकांनी आपल्या ग्रंथातून जे लिहिले आहे, ते आपल्या हस्ताक्षरात उतरवून घेणे म्हणजे संशोधन" अशी ती जुनी व्याख्या.

एवंच् तत्कालीन जंटलमेनना संशोधनासाठी खूपच सुविधा उपलब्ध होत्या.

**किंग्ज कॉलेज केंब्रिज** **डॅनिएल वेब**

---

मौखिक संपर्क हा आम जनतेला गटागटात एकत्रित करतो. लिखाण करणे आणि वाचन करणे या सामान्यपणे एकट्यानेच करण्याच्या क्रिया आहेत. पण त्या मनाला आपल्या स्वत:-कडेच, पुन्हा एकदा वाचन ही क्रिया चालू असताना वा ती संपल्यानंतरही पुन्हा एकदा भिरकावून देतात. हे प्रा. वाल्टर जे ओंग यांचे विधान सत्य आहे. पण बऱ्याचशा प्रमाणात ते अगदी सर्वस्वी शुद्ध स्वरूपात सत्य आहे असे नाही.

**–प्रा. वाल्टर जे ओंग यांचा एक टीकाकार.**

# नोंदवही

## कॅथरीन कुकसन - बहुप्रसवा लेखिका

**-सौ. सुमती जोशी**

कॅथरीन कुकसन म्हणजे विसाव्या शतकातील प्रकाशन व्यवसायातील एक चमत्कार होता यात शंकाच नाही. इ. स. १९५० साली वयाची चाळीशी उलटल्यावर तिने आपल्या लेखनास सुरुवात केली. आपल्या लेखनसामर्थ्यावर कुकसनने लाखो पौंड कमावले. पण त्या कर्तृत्वाबरोबर अभावाने आढळणारे दातृत्व कुकसनजवळ होते. ऑक्सफर्डमधील सेंट हिल्डा या महिला कॉलेजला कुकसनने एक लाख पौंडाची देणगी दिली. शिक्षणक्षेत्रात स्त्रियांना आपला पाठिंबा दर्शविण्यासाठी तिने ही देणगी दिली होती. तसेच सदरलन्ड विद्यापीठालाही वाचनालयाचा विस्तार करण्यासाठी तिने दोन लाख पौंड दिले. १९९८ च्या जून महिन्यात वयाच्या ब्याण्णवाव्या वर्षी त्यांनी या जगाचा निरोप घेतला. या दरम्यान कॅथरीन कुकसन यांच्या एकूण सत्त्याण्णव कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. या कादंबऱ्यांच्या एकशे तेवीस कोटीहून अधिक प्रती विकल्या गेल्या आणि अजूनही त्या कादंबऱ्यांना मागणी आहे. त्यापैकी साध्या बांधणीतील काही कादंबऱ्या आणि पुठ्ठ्याच्या बांधणीतील दोन कादंबऱ्या (द अपस्टार्ट आणि बाँडेज ऑफ लव्ह) सध्या 'उत्तम विक्री होत असलेल्या' पुस्तकांच्या यादीत समाविष्ट झाल्या आहेत. वाढते वय आणि ढासळणारी प्रकृती यांची युती झाल्यावरही कॅथरीन कुकसन प्रतिवर्षी तीन ते चार कादंबऱ्या लिहीत असे. तिच्या या गतिमान लेखनाशी जुळवून घेणे आणि त्याच वेगाने त्या प्रकाशित करणे ही तारेवरची कसरत करताना तिच्या प्रकाशकांची दमछाट होत असे. अजूनही कुकसनने लिहिलेल्या नवनवीन शीर्षकांच्या अनेक कादंबऱ्यांचा अनमोल ठेवा आज या प्रकाशकांजवळ शिल्लक आहे. कुकसनच्या कादंबऱ्या वाचण्यासाठी उत्सुक असलेल्या तिच्या चाहत्यांच्या हाती हा अनमोल ठेवा हळूहळू येईल. तिच्या हयातीत प्रसिद्ध करावयाच्या राहिलेल्या या कादंबऱ्यांच्या वाचनाचा आनंद तिच्या पश्चात् त्यांना लुटता येईल. वाचकांनी कुकसनची कादंबरी वाचावयास घेतली की वाचून पूर्ण केल्याशिवाय ती त्यांना ठेववत नसे. त्यामुळे कुकसनच्या चाहत्यांची 'खुशी- ही झांबियाच्या हायकमिशनची 'नाखुशी' ठरण्याची शक्यता होती. एकदा तर हायकमिशनरने लेखिकेला प्रत्यक्ष पत्र पाठवून विनंती केली. 'श्रीमती कुकसन, आपण कृपा करून इतकी पुस्तके लिहू नका कारण माझ्या माणसांकडून काम करून घेणे मला अशक्य होत आहे.'' वाचकांवर मोहिनी घालणाऱ्या आणि वाचकांना मंत्रमुग्ध करणाऱ्या लेखनाची ही आगळीवेगळी पोचपावती !



अनुक्रमणिका

ऐतिहासिक कल्पित आणि परिणामकारक लेखनाचा एक स्वतंत्र ठसा कुकसनने निर्माण केला. निष्ठुर दैववाद आणि तडजोड न करता येणारी नीतिमत्ता विंबवणाऱ्या तिच्या पुस्तकातून प्रामुख्याने व्हिक्टोरियन काळातील कष्टकरी स्त्रियांच्या खडतर जीवनाचे दर्शन वाचकांना घडते. सर्व प्रकारचा हिंसाचार, विवाहबाह्य संबंध आणि लैंगिक विकृती या सर्वांचे रेखाटन ती फारच निर्भयपणे करीत असे. दाहक गरिबीमुळे निर्माण होणारा जीवनकलह आणि हाल यांचे वर्णन कुकसन आपल्या लेखनात अत्यंत उत्कटतेने करीत असे. स्वत: सोसलेले कटु अनुभव ती शब्दबद्ध करीत होती असं म्हटलं तर वावगं ठरणार नाही. कॅथलीन जोन्स यांनी कॅथरीन कुकसन यांचे चित्तवेधक चरित्र लिहिले आहे. अत्यंत दु:खीकष्टी पूर्वजीवनात कुकसनला किती हालअपेष्टा सोसाव्या लागल्या त्याचे दर्शन आपल्याला या चरित्रातून होते. तरीपण 'पूर्वायुष्यातील या दु:खमय जीवनावरील 'उतारा' म्हणून मी लेखन केलेले नाही'' असे ती ठासून सांगत असे. परंतु पूर्वायुष्यातील राक्षसी अनुभवांचे मनात खोलवर रुजलेले भूत काढून टाकण्यासाठी मात्र मी या कादंबरीलेखनाच जरूर उपयोग करते असा कबुलीजबाब तिने वारंवार दिला आहे.

कॅथरीन कुकसन हिचे माहेरचे नाव केटी मॅकम्युलेन. केटी अवघ्या सात वर्षाची होती तेव्हांची गोष्ट. समवयस्क मित्रमैत्रिणींबरोबर खेळण्याचा निरागस आनंद लुटण्याचं वय. पण केटीच्या नशिबी ते भाग्य नव्हतं. खेळताना मैत्रिणींशी भांडाभांड्या झाल्या. रागाच्या भरात मैत्रिणीनी केटीला डिवचलं, ''तुला बाबाच नाहीत.'' सर्वज्ञात असलेलं कटु सत्य केटीला खेळाच्या मैदानात असताना असं अचानक समजलं. रोझ आणि जॉन हे प्रौढ वयाचं दांपत्य म्हणजे आपले आईवडील आहेत असं केटीला वाटत होत पण हा गैरसमजुतीचा बुडबुडा असा अचानक फुटला. प्रत्यक्षात रोझ ही केटीची आजी (आईची आई) आणि जॉन हे केटीचे सावत्र आजोबा होते. त्यांचा मुलगा जॅक हा तिचा भाऊ नसून सावत्र मामा होता. त्यांची मोठी मुलगी 'केट फॉसेट' हिला लहानगी केटी आपली 'ताई' समजत होती. परंतु प्रत्यक्षात 'ताई' नसून तीच आपली 'खरी आई' आहे हे केटीला उमगलं. अत्यंत कोवळ्या वयात झालेल्या या मानसिक आघातामुळे केटीचे जीवन उद्ध्वस्त झाले. मैदानावरून धावत जाऊन तिने आपले घर गाठले. मागीलदारच्या एकांत असलेल्या खोलीत स्वत:ला कोंडून घेतले. ''आपल्याला वडील नाहीत, आपले वडील कोण हे आपल्याला माहीत नाही.'' ही वस्तुस्थिती तिला आताच समजली होती. आपल्या अनौरसत्वाच्या घोर आपत्तीचा खरा अर्थ जाणून घेण्याचा ती प्रयत्न करून लागली. ''या घटनेमुळे आपण आपले व्यक्तीमत्त्व गमावले आहे.'' अशी खंत आणि त्याची सल केटीच्या मनात पुढे आयुष्यभर राहिली.

मुली मोठ्या झाल्या की आपल्याला जमेल ती नोकरी करीत आणि आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र होत. फॉसेटनेसुद्धा गावातील एका खानावळीत मदतनिसाची नोकरी धरली. तेथेच तिच्या राहण्याची जेवणाखाणाची सोय होती. जवळच्या किल्ल्यातील नाचगाण्याच्या समारंभाला ती हजेरी लावीत असे. मौजमजा करण्यात तिचे आयुष्य चालले होते. पण एक दिवस अचानक आपण 'गर्भवती' झालो आहोत असे केटच्या लक्षात आले. जनलज्जेपासून



अनुक्रमणिका

स्वत:ला वाचवण्यासाठी घरी परतण्यावाचून केटला दुसरा पर्याय उरला नव्हता. सावत्र वडिलांचा राग, त्यांनी केलेली मारपीट सहन करत केटला पुन्हा एकदा घरच्या घुसमटवणाऱ्या वातावरणात राहावे लागले. होणाऱ्या अपत्याचा पिता एकदा केटला भेटला. तिच्याशी विवाहबद्ध होण्याचे वचन त्याने दिले. परंतु नंतर मात्र पुन्हा तोंडही दाखवले नाही. खोटा पत्ता देऊन त्याने केटची दिशाभूल केली. आपल्या प्रियकराने केलेल्या प्रतारणेमुळे केटला– कॅथरीनच्या अवघ्या एकोणीस वर्षाच्या आईला– स्वत:च्या पायावर उभे राहण्या-शिवाय गत्यंतर नव्हते. तेव्हा तीने कॅथरीनला स्वत:च्या आईच्या रोझच्या स्वाधीन केले. स्त्री-सुलभ हवेहवेसे वाटणारे मातृत्त्व नाकारण्याशिवाय केटजवळ पर्याय उरला नव्हता. वाढत्या वयामुळे रोझला नातीचे संगोपन करण्याची जबाबदारी पेलेनाशी झाली तेव्हा केटने घरातील दैनंदिन कामकाजाचा ताबा घेतला. लहानग्या कॅथरीनला खरी परिस्थिती समजल्यावरसुद्धा घरात उघडपणे या विषयावर कधीही चर्चा झाली नाही. किंबहुना कॅथरीन तीस वर्षाची झाल्यावर तिने केटकडून– आपल्या आईकडून स्वत:च्या जन्माचे रहस्य व त्याबद्दलचा तपशील प्रयत्नपूर्वक वदवून घेतला. कॅथरीनजवळ स्वत:च्या जन्माचा दाखला सुद्धा नव्हता. त्यामुळे नोकरी शोधताना जागोजागी तिच्यावर नामुष्कीची वेळ येई. आपले वडील कोण याबद्दलच्या अनिश्चिततेचा एक फायदा मात्र कॅथरीनला झाला. वडिलांबद्दलच्या काल्पनिक प्रतिमा ती आपल्या मनात निर्माण करू लागली. आपले वडील कदाचित रॅव्हन्सवर्थच्या किल्ल्यामधील उच्च अधिकारी असतील किंवा एखादेवेळेस ते तेथील सामान्य नोकर असतील असे तर्कवितर्क तिच्या मनात रुंजी घालू लागत. आपले खरे घर हे नव्हे. जर स्वत:च्या जीवनाला अर्थ प्राप्त करून द्यायचा असेल तर आपण हा परिसर सोडून दुसरीकडे गेले पाहिजे अशी तीव्र इच्छा तिच्या मनात निर्माण झाली.

तिच्या घरातले सारे वातावरण एक प्रकारच्या शरमेने कलंकित झाले होते. घरात गरिबीचे अधिराज्य होते. कॅथॉलिक धर्मभावनेचा जबरदस्त पगडा प्रत्येकाच्या मनावर होता, लैंगिक इच्छांचा कोंडमारा झाल्यामुळे एक प्रकारचा अस्वस्थपणा आणि तणाव जाणवत होता. अनेक अनुत्तरित प्रश्न आ वासून उभे होते आणि कटु स्मृती पावलोपावली जाचत होत्या. कॅथरीनच्या जन्मानंतर केट आजारी पडली. मातृत्वाचा अव्हेर केल्यामुळे केट कॅथरीनला स्तनपान देण्यास असमर्थ ठरली. स्तनपान न दिल्यामुळे दूध साठून तिचे स्तन दुखू लागले आणि तिला ताप येऊ लागला. त्यावेळी तिच्या सावत्र वडिलांनी तिची व्याधी दूर करण्यास मदत केली. कॅथरीन मोठी झाल्यावर जेव्हा तिला ही हकीकत समजली तेव्हा तिला उद्विग्नता आली. आपल्या सावत्र आजोबांच्या घृणास्पद कृत्याची तिला शिसारी वाटू लागली.

लहानपणीच्या या फसवणुकीमुळे आई आणि मुलगी यांच्यातील परस्परसंबंध अत्यंत तणावपूर्ण झाले. कॅथरीनच्या अस्तित्वामुळे तिच्या आईच्या आयुष्याची नासाडी झाली. याउलट केटच्या हृदयशून्य वर्तणुकीमुळे आणि कॅथरीनचे मातृत्त्व फेटाळल्यामुळे तिच्या मुलीची प्रमाणशीर, आरोग्यदायी वाढ झाली नाही. त्यामुळे याही काळात भलताच अनवस्थाप्रसंग कॅथरीनवर ओढवला. पौगंडावस्थेत अचानक सुरू झालेल्या रक्तस्त्रावामुळे



अनुक्रमणिका

घाबरून ओरडत कॅथरीन रस्त्यावर आली. आपण आता नक्कीच मरणार आहोत असे तिला वाटले. वयात येताना ज्या सावधगिरीच्या प्राथमिक स्वरूपाच्या सूचना प्रत्येक आईने आपल्या मुलीला दिल्याच पाहिजेत त्या कर्तव्यात केट अपयशी ठरली होती. या आणखी एका घटनेवरूनही केटने कॅथरीनडे संपूर्ण दुर्लक्ष केले, तिला आईची माया दिली नाही. हे उघड होते. कॅथरीनच्या मनात आपल्या आईविषयी पराकोटीच्या तिरस्काराची भावना होती. म्हणून केट जेव्हा आपल्या मुलींकडे राहायला जात असे तेव्हा कॅथरीन आपल्या पतीला शयन-कक्षाच्या दरवाजाला कुलूप घालावयास सांगत असे. अर्धवट झोपेत आपण उठलो तर प्रत्यक्ष आईचा खून करू की काय अशी भीती कॅथरीनला वाटत असे.

कॅथरीनने आपला स्वत:चा उत्कर्ष कसा करून घेतला आणि ती सर्वोत्तम लेखिका कशी झाली ही एक अलौकिक कहाणी आहे. कॅथरीनच्या लहानपणी तत्कालिन नागरिकांना स्थानिक श्रमिक संस्थांबद्दल एक प्रकारची भीती वाटत असे. अशाच श्रमिक संस्थेतर्फे एका लाँड्रीमध्ये 'मॅनेजर-व्यवस्थापिकेचे' काम कॅथरीनने स्वीकारले. येथील कार्यानुभवाच्या जोरावर देशातील इतर अनेक ठिकाणी तत्सम काम मिळवण्यासाठी कॅथरीन अर्ज करू लागली. अखेर ती 'हेस्टिंग्ज' येथे आली. मोठेपणीच्या आपला बहुतांश काळ कॅथरीने हेस्टिंग्ज येथेच व्यतीत केला. आपल्याजवळच्या तुटपुंज्या पैशांनी तिने एक मोठे वसतिगृह खरेदी केले. याच ठिकाणी 'नॅन स्मिथ' या प्रभावशाली महिलेशी तिचा परिचय झाला. पुढे या परिचयाचे रूपांतर दाट मैत्रीत झाले. नॅन स्मिथने वसतिगृह उत्तम प्रकारे चालविण्यास कॅथरीनला बहुमोल सहकार्य केले. कॅथरीनचे बालपण आणि पौगंडावस्थेपर्यंतचा काळ यात कॅथरीनला खूपच मानसिक आघात सोसावे लागल्यामुळे तिचे आप्तस्वकीयांशी असलेले संबंध नॉर्मल राहिले नाहीत. 'कोणताही पुरुष आपल्याकडे बघत असला तर तो आपल्या लैंगिकदृष्ट्या खुणावत आहे.' अशी तिची भावना होत असे. कॅथरीन लहानपणी नेहमीच आपल्या आईजवळ झोपत असे. त्यामुळे आपल्यावर वर्चस्व गाजवणाऱ्या कोणत्याही स्त्रीच्या सान्निध्यात मी रात्र घालवणे शक्य नाही असे ती निक्षून सांगत असे. नॅन स्मिथ हिच्याबरोबर कॅथरीनचे समलिंगी संबंध आहेत असे इतरांना वाटत असे. पण कॅथरीन हा आरोप स्पष्टपणे नाकारत असे. कॅथरीनने जेव्हा गणिताच्या तरुण शिक्षकाशी टॉम कुकसनशी विवाह केला तेव्हा नॅन स्मिथच्या मनात क्षोभ निर्माण झाला. तिचे मन दुखावले गेले. परंतु त्या दोघींवरील समलिंगी संबंधांचे आरोप नाहीसे करण्यासाठी 'नॅन स्मिथ'ला तिची जागा दाखवणे आवश्यक होते. यानंतर एकोणतीस वर्षांचा काळ गेला. नॅन स्मिथला फुफ्फुसाचा कर्करोग झाला होता. नॅन मृत्युशय्येवर अखेरच्या घटना मोजत होती. नॅनच्या मनातल्या जुन्या क्षोभाला एक वेगळे वळण मिळाले. अत्यंत काळजीपूर्वक निवड केलेल्या कॅथरीनच्या पत्रांचा गठ्ठाच तिने टॉम कुकसनच्या हाती सोपवला. कोणत्याही सर्वसामान्य विवाहसंबंधाना सुरुंग लावेल असा विषारी मजकूर त्या पत्रात होता. परंतु टॉमवर त्याचा काहीही परिणाम झाला नाही. ज्या लेखिकेने मानवी दु:खावर आधारलेले लेखन सदोदित केले, त्या लेखिकेला वैयक्तिक जीवनात साठ वर्षे एवढा दीर्घकाळ सुखसमाधानयुक्त वैवाहिक जीवन जगण्याचे भाग्य

लाभले. कॅथरीनच्या मृत्यूनंतर टॉमला तिच्याशिवाय जीवन जगणे असह्य झाले. तिच्या पाठोपाठ अवघ्या तीन आठवड्यात टॉमनेसुद्धा या जगाचा निरोप घेतला. साठ वर्षे बरोबर केलेल्या वाटचालीनंतरही टॉमने कॅथरीनची साथ सोडली नाही.

कॅथरीन कुकसन यांच्या चरित्राच्या प्रस्तावनेत लेखिका कॅथलीन जोन्स म्हणते, "ब्लूम्स-बरीमधील रहिवाशांनी एकमेकांशी पत्रव्यवहार करावा. एकमेकांबद्दल अत्यंत सफाईदारपणे लिहावे असे चरित्रकाराला वाटत असेल तरी ते त्याचे 'स्वप्नच' ठरेल. घराची झाडलोट करणाऱ्या, अंगमेहनतीची कामे करून उदरनिर्वाह करणाऱ्या श्रमजीवी रहिवाशांना वर निर्देशिलेले लेखन करण्यास वेळ कसा मिळणार? घरात आणावयाच्या वस्तूंची यादी जेमतेम खरडण्याइतकाच वेळ त्यांना कसाबसा मिळत असणार." सर्वसामान्य रहिवाशांनी केलेल्या थातुरमातुर नोंदी मिळवून आणि त्या पुराव्यांची छाननी करून लेखिकेने हे चरित्र लिहिले आहे. कुकसनने स्वत: धूसर लेखनाचे अगणित पुरावे निर्माण केले. कॅथरीनच्या आयुष्यात विशेष रस घेऊन तिच्याकडे लोकांचे लक्ष वेधले तेव्हा बराच काळ लोटला होता. तिचे जीवन जवळून पाहिलेल्या वयोवृद्ध मंडळींना तिच्याबद्दलच्या लेखनातील सत्या-सत्यतेची शहानिशा करता आली असती. परंतु दैववशात् ती मंडळी त्यावेळी हयात नव्हती. हे चरित्रलेखन करताना कॅथलिन जोन्सना कॅथरीन कुकसनच्या प्रकाशित झालेल्या आत्म-चरित्रातील अगणित घटनांची पुनर्मांडणी करावी लागली. कित्येक प्रसंगांचे स्वरूप बदलावे लागले. निश्चितपणे कॅथरीनच्या स्वत:च्या अनुभवांवर बेतलेल्या कितीतरी कादंबऱ्या विचारात घ्याव्या लागल्या. तिच्या अगणित मुलाखती आणि ध्वनिमुद्रित केलेली संभाषण अभ्यासावी लागली. कुकसनने अप्रकाशित असलेले आत्मचरित्र मोडीत काढण्यापूर्वी कमीत कमी आठ वेळा लिहिले होते. त्या लेखनाच्या अनेकविध प्रतींकडेही चरित्रकर्तीला बारकाव्याने लक्ष द्यावे लागले. "एका वाचनीय कथेची रचना करण्यासाठी कादंबरीकर्तीच्या धूर्तपणाचा मी उपयोग केला." असा कबुलीजबाब कॅथलीन जोन्स मोकळेपणाने देतात. कॅथरीन कुकसन यांनी स्वत:च्या जीवनातील जाहीर न केलेल्या कितीतरी घटना आपल्या लेखनात अप्रत्यक्षपणे सूचित केल्या होत्या. उघडकीस न आणलेल्या कितीतरी घटनांचे पुरावे आपल्या मृत्यूपूर्वी जाळून टाकले होते. कॅथलीन जोन्स म्हणते, "कॅथरीनच्या आत्मचरित्रपर लेखनाच्या अनेक प्रतींचा तुलनात्मक विचार करणे, त्यातील विसंवादी घटना बाजूला काढणे, त्या विचारपूर्वक गाळून टाकणे, परस्परविरोधी माहितीची शहानिशा करणे हे माझ्यापुढे एक फार मोठे आव्हान होते आणि त्याकरिता मला वकिली कौशल्य वापरावे लागले." हे चरित्र लिहिताना लेखिकेला आपले सर्व कसब पणाला लावावे लागले आहे. कॅथलिन जोन्सने ही केस नुसतीच जिंकली आहे असे नाही तर त्याप्रीत्यर्थ ती पारितोषिकास पात्र आहे

**टीप :** (तपशीलच्या दुसऱ्या अंकात डॉ. मीना वैशंपायन यांच्या 'असा हा वाचनछंद' या मालिकेत कॅथरीन कुकसन यांच्याबद्दलचा लेख, तसेच तपशीलच्या सातव्या अंकातील कुकसन यांच्या दानशूरपणाबद्दलची तळटीपही तपशीलच्या वाचकांच्या स्मरणात असेलच)

---



अनुक्रमणिका

